# जीते रहो, जिवा



( स्वतंत्र हास्यकथांचा संग्रह )

लेखक—प्रो. वि. मा. दी. पटवर्धन
कर्नाटक कॉलेज, धारवाड

प्रस्तावना—श्री. चं. वि. बावडेकर

सप्टेंबर १९३९

(पृष्ठसंख्या १७५) मूल्य १। रुपया.

## प्रो. वि. मा. दी. पटवर्धन

यांचीं पुढें प्रसिद्ध होणारीं पुस्तकें.

१ रंजना

रत्नेसारखीच एक नितांतरम्य कादंबरी

२ जिवाची मर्दुमकी

याचा परिचय करून द्यायला नकोच

३ गेल्या पंचवीस वर्षांत महाराष्ट्राच्या सामाजिक व वाङ्मयीन क्षेत्रांत माजलेले वाद.

# अर्पणकार्य



हंसण्याचें वावडें असणाऱ्या सर्व गंभीर
आणि अतिशिष्ट वाचकांना
सद्हेतुपूर्वक अर्पण.



वा. रे.

# ऐकलंत का?

या कथासंग्रहांतील एक प्रमुख व्यक्ति टाटासाहेब बिन्धुडबुध हायकोर्ट वकील, यांचा नि माझा लहानपणापासून दाट स्नेह. त्यांच्यावर आलेले अनेक पेच-प्रसंग मीं प्रत्यक्ष पाहिलेले आहेत व त्यांपैकीं कांहीं प्रसंगीं त्यांच्या बरोबरीनें त्यांतला बरा-वाईट अनुभवही माझ्या वांट्यास आलेला आहे.

**जिवा खानापुरकर** या विभूतीची टाटासाहेबांच्या घरांत स्थापना करायलाही मीच थोडाफार कारणीभूत झालेलों आहे. अन् खरोखर जिवा लाभला नसता तर माझा हा जिवाभावाचा जिवलग मित्र आजच्या घटकेला जिवंत राहिला नसता.

टाटासाहेब तसा मनाचा मोठा उदार. जिवानें निष्ठापूर्वक केलेली त्याची सेवा तो विसरला नाहीं. जिवाच्या आठवणींचें त्यानें एक टिपण तयार केलें व माझ्याजवळ दिलें. जातां जातां तो मला म्हणाला, "मित्रा, **जिवा** ही तुझी ठेव. तिचें हे व्याज तुला दिलें आहे. ठेव मात्र मिळायची नाहीं हं!" मीं तें टिपण वाचलें आणि गोष्टीरूपानें जिवाचें नांव मराठी वाङ्मयांत स्थगित करून टाकण्याचा निश्चय केला.

माझ्या आवडीचे पाश्चात्य विनोदी लेखक दोन. एक मार्क ट्वेन आणि दुसरा डॉ. पी. जी. वुडहाउस. पैकीं दुसऱ्याच्या विनोदी लेखनानें इंग्लंडच्या बुद्रुक गणल्या जाणाऱ्या प्राध्यापकांवरही केवढा परिणाम केला आहे हें त्यांनीं ऑक्स्फर्ड युनिव्हर्सिटीमार्फत या महान् विनोदी लेखकास "डॉक्टर ऑफ लेटर्स" ही बहुमानाची पदवी नुक्तीच बहाल करून त्याचा जो गौरव केला त्यावरून दिसून येईल. त्या प्रसंगीं केलेल्या भाषणांत युनिव्हर्सिटीचे एक डीन म्हणाले, 'What a pity it is that Wodehouse is not in attendance at Berchtesgaden to shake the grim solemnity out of its present occupant (Hitler)!"

वुडहाउसच्या लघुकथासंसारांत Jeeves या महापुरुषानें केवढी प्रचंड कामगिरी केली आहे हे सुज्ञ वाचकांना निराळें सांगावयास नकोच. सुप्रसिद्ध पाश्चात्य लेखक हिलेअर बेलॉक यांनीं जीव्हज्‌संबंधीं पुढील उद्‌गार काढले आहेत– " If in, say fifty years, Jeeves shall have faded, then what we have so long called England will no longer be !" दुसरे एक लेखक सॉमरसेट मॉघॅम हेही म्हणतात कीं, "जोंपर्यंत इंग्लिश लोकांमध्ये विनोदबुद्धि चमकत आहे तोंपर्यंत इंग्लिश वाङ्‌मयांत जीव्हज्‌चें स्थान अढळ राहील. " असो.

माझ्या मित्राचें टिपण पाहतांच जीव्हज्‌चें आमच्या **जिवा**शीं केवढें साधर्म्य आहे हें माझ्या लक्षांत आलें. या दोन महात्म्यांचीं नांवें जुळलीं, कार्यपद्धतिही जुळल्या. त्यांच्या स्वरूपांत आणि जीवनांतही मला बरेंच साम्य आढळलें. तेव्हां वुडहाउसनें ज्या तंत्रानें आपल्या जीव्हज्‌ या पात्राला रंगविला, सजविला आहे, त्या तंत्राचा अंगिकार मीं केला. मात्र आमच्या **जिवा**करतां रंगभूमि, तिची सजावट, आणि कथानकें हीं सर्वस्वीं स्वतंत्र बनविलीं. अशा तऱ्हेनें आमच्या **जिवाचें** हें महाभारत अगदीं स्वतंत्र असे घडलेले आहे, त्यांपैकीं एक पर्व आज या पुस्तकाच्या द्वारें मी माझ्या वाचकांना सादर करीत आहे. यांतील गोष्टी सहा वर्षांपूर्वी मुंबईच्या **विविध वृत्तानें** मोठ्या आपलेपणानें प्रसिद्ध केल्या होत्या.

या कथासंग्रहांत जर कोणाला विनोद आढळला व हसूं आलें, तर त्याचें उत्तरदायित्व आमचा कथानायक **जिवा** याच्याकडे नाहीं. त्याच्या जिवाची धांदल अशी उडालेली कोणाच्याच पाहण्यांत नाहीं. सबब हसूं फोडण्याचें सारें श्रेय त्याच्या धन्याकडे आणि धन्याच्या कांहीं शेदाडशिपाई आप्तसमूहाकडे जातें.

अलीकडे विनोदांतही मारामारी सुरू झाली आहे. विनोद केला असतां खर्ची कोण पडतो असा विनोदाचा म्हणे जमाखर्च मांडला पाहिजे. ज्यानें गालाला खळी पडते तो म्हणे खळी विनोद. खुद्‌कन हसूं येतें तो खुदबा. गुदगुल्या होणारा विनोद म्हणे गुदगुल्या. ज्यानें हास्याला उकळी फुटेल तो उकळी विनोद अथवा आधण्या विनोद. शेवटीं जो हास्यस्फोट उत्पन्न करतो तो सुरुंग्या विनोद, अशी विनोदाची वर्गवारी करण्यांत येऊं लागली आहे !

तसेंच विनोदाचें विच्छेदन करून त्याची चिकित्सा करण्याचाही पायंडा पडूं पाहत आहे. विनोद विशल्य आहे कीं दुशल्य आहे, व्याजोक्ति असल्यास सरळव्याज आहे कीं, चक्रवाढ आहे; सात्त्विक आहे कीं तात्त्विक आहे, प्रासंगिक कीं व्यासंगिक, शाब्दिक कीं हार्दिक असे अनेक प्रश्न उकरून काढून वादाचीं रणें माजविलीं जात आहेत. म्हणून माझ्या प्रेमळ वाचकांनो, विनंति हीच कीं, या प्रश्नांच्या वाटेला न जातां मोकळ्या मनानें हें पुस्तक वाचा. तरच कदाचित आपणास यांत विनोद सांपडण्याचा कांहींसा संभव आहे.

गोष्टींतील प्रसंग आणि पात्रें कल्पित आहेत. कोठें सत्यसृष्टीशीं साम्य आढळलेंच, तर ते स्वभावसादृश्यामुळें असणार. आमच्या बिन्बुडबुंधावर आलेले प्रसंग आपणां सर्वांवर निरनिराळ्या वेळीं आलेले असण्याचा संभव आहे. त्यामुळें कांहीं ठिकाणीं तुम्हांला बिन्बुडबुंधाच्या जागीं तुमचेंच छायाचित्र दिसेल. त्या प्रसंगीं तुम्ही हंसलां नसाल; पण आतां दूर राहून आपण त्या वेळीं जगाला कसें दिसलों असूं याची कल्पना मनांत आणा, म्हणजे पोटभर हसूं येईल.

तुमचें छायाचित्र तुम्हांला दाखविलें म्हणून रागावूं नका हं. कारण बर्नार्ड शॉच्या शब्दांत तुम्हांला एक प्रेमाची सूचना मला द्यायची आहे. ती अशी— If I make you laugh at yourself, remember that my business as a classical writer of comedy is " to chasten morals with ridicule." If I sometimes make you feel like a fool, remember that I have, by the same action cured your folly just as a dentist cures your tooth-ache by pulling out your tooth; and I never do it without giving you plenty of laughing gas.

**पोटभर हंसायला अगोदर रडावें लागतें. करुणरसानें ज्याच्या डोळ्यांना टिपें येतील, त्यांनाच विनोदानें खऱ्या हास्याच्या उकळ्या फुटतील. एवढें कशासाठीं सांगितलें, माहीत आहे का? म्हटलें, पुस्तकासाठीं थोडा पैका वेचतांना रडूं आलें, तर तेवढें मनावर घेऊं नका.**

माझे मित्र रा. **चंदुनाना** (मला त्यांचें घरचें नांव आठवत नाहीं. म्हणून हेंच ठोकून देतों, झालें !) **बावडेकर** हेही वुडहाउसचे मोठे चाहते आहेत. हास्यकथा वाचण्याचा त्यांचा व्यासंग माझ्यापेक्षां किती तरी दांडगा आहे. व्यावसायिक व प्रापंचिक आधिउपाधींच्या काळ्या कुट्ट ढगाला आपल्या अभिजात विनोदी वृत्तीनें रुपेरी किनार जोडून त्यांतून हास्यतुषार निर्माण करतांना मीं त्यांना किती तरी वेळां पाहिलें आहे. त्यांच्यासारख्यांनीं आढेवेढे न घेतां या पुस्तकाला अगदीं तत्परतेनें प्रस्तावना लिहून दिली हे मीं मोठ्या भाग्याचें समजतों. जिवाच्या पाठीवर त्यांनीं मारलेली प्रेमळ परंतु मार्मिक थाप वायां जाणार नाहीं. जिवा पुन: केव्हां तरी आपल्या भेटीला येईल.

निरोप घेतांना या पुस्तकाची आकर्षक छपाई नि सजावट करण्यांत माझे मित्र श्री. **रामभाऊ तटणीस** आणि श्री. **रघुनाथराव मोरमकर** यांनीं जे परिश्रम घेतले त्यांचा सादर उल्लेख केल्यावांचून राहवत नाहीं. सर्वांस प्रणाम.

आपला,

**वि. मा. दी. पटवर्धन**



# जिवाच्या पाठीवर थाप

वृत्तपत्रव्यवसायिकांवर सकृद्दर्शनी छाप पडावी अशीं वैशिष्ट्यें प्रथमपरिचयाच्याच प्रसंगीं जे कांहीं थोडे लेखक प्रकट करूं शकतात, त्यांमध्येंच माझे स्नेही श्री. वि. मा. दी. पटवर्धन यांची गणना होते. किंचित लोकविलक्षण असें वाटणारें त्यांचें दी. पटवर्धन ( दीक्षित पटवर्धन ) हें संयुक्त आडनांव व त्यापेक्षांही लेखावर तें कायम ठेवण्याचा त्यांचा आग्रह, ( कीं विनोद ? ) देशभक्तीच्या धंद्याखेरीज दुसऱ्या धंद्याची बात नसलेल्या कायदेभंगाच्या ऐन धुमश्चक्रींत **विविध वृत्ता**कडे त्यांनीं प्रथमच पाठवून दिलेला 'जराचा धंदा' हा लेख आणि त्याला जोडलेली त्यांची शास्त्रीय ज्ञान पारंगततेची पदवी, ह्या तीन गोष्टींमुळें त्यांचा हा पहिलाच लेख वाचून पाहण्यापूर्वीच तो नाकारण्याजोगा असणें शक्य नाहीं अशी दहशत माझ्या मनानें घेतली ! या दहशतवादाचाच पगडा बसून तो लेख यथावकाश प्रसिद्ध झाला. त्यानंतर "रसायनशास्त्रांतील तीन शिलेदार, नीळ, सॅकरिन व कापूर" यांनीं बेबंदशाही नाटकांतील आलमगीराच्या अरबाप्रमाणें आपले भाले माझ्यावर रोखले व १९३१ च्या खास अंकांत आपल्यासाठीं जागा करून घेतली. त्यानंतर असेच कांहीं शास्त्रीय व किरकोळ लेख त्यांनीं लिहिले आणि उच्च वाङ्मयांत भर घालण्यास अप्रत्यक्षपणें सहाय्य करीत असल्याचें समाधान मला मिळूं देऊन प्रसिद्धि प्राप्त करून घेतली. पण त्याच धांदलीच्या दिवसांत पटवर्धनांनीं आपलें साहित्यगुदामही **वृत्ता**च्या ऐसपैस जागेंत उघडण्याचा संकल्प करतांच सरकारच्या दडपशाहीच्या धोरणाकडे पाहणाऱ्या प्रागतिकांच्या ठरावाप्रमाणें मी एकदम चिंतायुक्त मनानें व सभय चित्तानें त्यांच्या हालचालींकडे पाहूं लागलों आणि त्यांच्या विनोदी गुदामांतील माल जेव्हां पुढें येऊं लागला, तेव्हां तो उतरून घेतांना आरोग्यखात्याच्या इन्स्पेक्टरची करडी नजर त्या मालावर ठेवली. शास्त्रीय लेखनाला प्रवेश मिळवून देणारा त्यांचा जुना परवल विनोदासाठींही त्यांना उपयोगांत आणूं देणें मला धोक्याचें वाटत होतें. कारण शास्त्रज्ञ व विनोद यांच्या संबंधांबद्दलच्या माझ्या कांहीं कल्पना ठाम होत्या. शास्त्रीय विषयाच्या

लेखक आणि विनोद यांचा संबंध न्यायविनोद, तर्कविनोद या ग्रंथांच्या नांवांतील विनोदाप्रमाणेंच विनोदी असतो, असा माझा ग्रह होता व गुदामांतील विनोदामुळें तो जरी बराचसा कमी झाला, तरी तो समूळ नाहींसा झाला नाहीं. पटवर्धनांनीं गुदामाला कुलुप लावल्यावर त्यांच्यासारख्या थोर शास्त्रीय पदवीच्या लेखकानें विनोदाचा पोरखेळ न खेळतां आइन्स्टीनच्या सापेक्षतावादाकडे वळून त्या शोधाची वाचकवर्गाला फोड करून दाखवावी अशी गर्भित सूचना त्यांना देऊन मी पाहणार होतों. पण तेवढा अवधि मला मिळण्यापूर्वींच आपल्या मालकाला घेऊन " जिवा "नें प्रवेश केला, व *Veni Vidi Vici* ही सीझरची दर्पोक्ति स्वतःही सार्थ ठरविली. शास्त्रज्ञ पटवर्धनांची विनोदवृत्ति ही नैसर्गिक नसून चुकून झालेली विनोदाची 'ग्रांथिक वाढ' असावी हा माझा तर्क जिवानें खोटा ठरविला. परंतु जिवाबद्दलची माझी पूर्ण संशयनिवृत्ति झाली नव्हती. त्याचा तोंडवळा वुडहाउसच्या सुप्रसिद्ध जीव्हजच्या तोंडवळ्याशीं जमत होता. मम्मुआत्याचें आलवान आँट ॲगाथाच्या वस्त्रभांडारांतील असावें असा भास होत होता, व टाट्र्नें जरी अस्सल पुणेकराचा कितीही आव आणला, तरी बावळटपणाव्यतिरिक्त त्याचे इतर गुणधर्म त्याच्या बतावणीला पोषक वाटत नव्हते. वुडहाउसच्या सर्व हास्यकथा मीं वाचलेल्या होत्या. पण जिवाशीं दोस्ती करण्यापूर्वी सर्व प्रकारचे संशय फेडून घ्यावेत म्हणून मी पुन्हा एकदां त्या सर्व वाचून काढल्या व पटवर्धनांचा जिवा जरी परिचित असल्यासारखा वाटला, तरी तो भ्रष्ट व सोंगाड्या नाहीं याची खात्री करून घेतली. जीवाबद्दल हळू हळू मला जिव्हाळा वाटूं लागला व आज तो माझा जीवश्चकंठश्च मित्र झाला आहे. जिवा वरच्या या लोभामुळेंच त्याच्या अबोलक्या कर्तृत्वाची तारीफ करण्याची संधि श्री. पटवर्धन यांच्या विनंतीमुळें मिळतांच मी फारसे आढेवेढे न घेतां तिचा उपयोग करून घेण्याचें ठरविलें.

उत्कृष्ट प्रतीचा विनोद स्वतंत्रपणें निर्माण करण्याची शक्ति श्री. पटवर्धन यांच्या ठिकाणीं असतां वुडहाउसच्या जीव्हजची पुसटती छाया तरी त्यांनीं आपल्यावर कां पडूं दिली हा प्रश्न साहजिकच मनांत येतो. स्वभावसादृश्यापलीकडे जीव्हजशीं जिवाच्या गोष्टींतील कथानकाचा यत्किंचितही संबंध नाहीं हें जरी खरें असलें, आणि वाङ्मयचौर्याच्या संकेतांचा न्यायनिष्ठुरपणें कीस काढूनही जिवाच्या गोष्टी हें वाङ्मयचौर्य ठरणें शक्य नसलें तरी कल्पनेची उसनवारी

तरी लेखकाच्या अंगाला चिकटविणें जड जाणार नाहीं. "Beautiful it is to understand and know that a thought did never yet die; that as thou, the originator thereof hast gathered it and created it from the whole past, so thou wilt transmit it to the whole future." या कार्लाइलच्या समर्थनाकडे बोट दाखवून जिवाच्या निर्मितींतील हा दोष पुसून काढतां येईल; पण जीव्हज हा देखील जिवाचा समकालीनच असल्यामुळें 'कल्पनेचें लोण पुढें पोंचविणें' या समर्थनाचा मात्र फायदा त्याला देतां येणार नाहीं. मग लेखकानें ह्या सर्व शंकाकुशंकांना जागा ठेवून देखील आपल्या स्वतंत्र कथानकांची शाल जीव्हजलाच कां पांघरूं द्यावी ? या प्रश्नाचें उत्तर लेखकाच्या अभिजात व सहृदय विनोदवृत्तींतच मिळूं शकतें. जीव्हजचें वैशिष्ठ्य त्रिकालाबाधित आहे. जीव्हज हा मनुष्यस्वभावाप्रमाणेंच एकदेशीय नसून सर्वदेशीय आहे व सर्व समाजांत वेगवेगळ्या क्षेत्रांत त्याचे अवतार दिसून येतात. पुष्कळांना तो आपला समानधर्मी वाटेल. आपलीच ती प्रतिकृति आहे असा त्यांना भास होईल. जीव्हज ही एक व्यक्ति या दृष्टीनें त्याच्याकडे पाहावयाचें नाहीं. ती एक संस्था आहे आणि या संस्थेच्या शाखा समाजांत सर्वत्र पसरलेल्या आहेत. ज्या परिस्थितींत जीव्हज वावरतो, ती सर्वत्र उपलब्ध असणारी परिस्थितीही विनोदनिर्मितीला अत्यंत पोषक आहे व म्हणूनच सहृदय वृत्तीच्या विनोदी लेखकाखेरीज त्या व्यक्तीचें आकर्षण दुसऱ्या कोणाला वाटणें शक्य नाहीं. या आकर्षणामुळेंच आपल्या निष्कलंक यशाचा विचार पटवर्धनांनीं गौण मनाला असावा अशी माझी कल्पना आहे.

पण जीव्हजचें अगर जिवाचें असें विलक्षण आकर्षण वाटण्याजोगें त्याच्यांत काय आहे व त्याच्या भोंवतालची परिस्थिति तरी विनोदाला अत्यंत पोषक कशी ? या प्रश्नाचा विचार करतांना विनोद कां निर्माण होतो याच्यापेक्षांही विनोद कोणत्या स्वभावधर्मांतून उत्कटवानें प्रकट होतो याचा विचार केला पाहिजे. श्री. न. चिं. केळकर, प्रो. चिं. वि. जोशी व श्री. अत्रे यांनीं वेगवेगळ्या प्रसंगीं विनोद-विषयाची जी सूक्ष्म व मार्मिक छाननी केली आहे, तींतही विनोदवृत्ति कोणत्या व्यक्तीमध्यें प्रकर्षानें आढळून येते, या एका महत्त्वाच्या अंगाचा विचार केलेला नाहीं. विनोद अपेक्षाभंगामुळें उत्पन्न होतो, प्रसंगानें निर्माण होतो, चमत्कृतिपूर्ण कोटीबाजपणामुळें निर्माण होतो, विसंगतीमुळें निर्माण होतो, व विकृतिमय विपर्यासानेंही

तो निर्माण होतो. पण विनोद शब्दजन्य व परिस्थितीजन्य असला तरी तो प्रसंगीं केवळ व्यक्तिजन्यही असूं शकतो कीं नाहीं ? 'महाराष्ट्राची विनोदबुद्धि' या विषयावर श्री. केळकर यांनीं रेडिओवर दिलेल्या व्याख्यानांत महाराष्ट्रांतील विनोदी वाङ्मयाचा फक्त आढावा घेऊन त्याच्या प्रगतीबद्दल समाधान व्यक्त केलें. पण इतर हिंदी प्रांतांशीं तुलना करतांना महाराष्ट्रांत विनोदबुद्धीची वाढ अधिक प्रमाणांत कां दिसते याचा ऊहापोह केला नाहीं. प्रांतविशेष हे ज्याप्रमाणे अलग-अलगपणें दिसतात, त्याचप्रमाणें व्यक्तिविशेष हेही वेगवेगळे दिसतात. पण अशा वैशिष्ट्याचीं कांहीं तरी कारणें हीं असलींच पाहिजेत कीं नाहीं ? आणि तशीं जर कांहीं स्वतंत्र कारणें असलीं, तर तीं दाखवितांही आलीं पाहिजेत. महाराष्ट्रीयांचें व्यक्तिवैशिष्ट्य अगर व्यक्तींनीं बनलेलें प्रांतवैशिष्ट्य इतर प्रांतीयांपेक्षां वेगळें आहे असें कबूल केलें म्हणजे त्या प्रांतांतील व्यक्तींचा वस्तू-कडे पाहण्याचा वेगळा दृष्टिकोण-मग तो भौगोलिक, आर्थिक अथवा राजकीय कारणांमुळें उत्पन्न झालेला कां असेना-मान्य केला पाहिजे, आणि असे जर वेग-वेगळे विशेष मान्य केले, तर त्याच रीतीनें सर्वसामान्य अखिल मनुष्यमात्राचाही विचार करतांना अशीच वर्गवारी पाडून विनोदभावना असलेल्या व्यक्तींचा एक वेगळा विशेष मान्य करण्यास हरकत असूं नये. मग तो व्यक्तिविशेष कुठें आढळून येतो ? या प्रश्नाचें जें उत्तर देतां येईल त्या उत्तरांतच जिवाच्या सर्वस्पर्शी वैशिष्ट्याचें रहस्य आहे.

हें रहस्य स्टीफन लीकॉक या सुप्रसिद्ध विनोदपंडितानें उकलून दाखविलें आहे. विनोदभावना उत्कटत्वानें कोणत्या परिस्थितींतल्या व्यक्तीमध्ये दिसून येतें याचें विवरण करतांना तो म्हणतो,

" Humour and disillusionment are twin sisters. Humour cannot exist along side of eager ambition, brisk success and absorption in the game of life. Humour comes best to those who are down and out or who have at least discovered their limitations and their failures. Humor is essentially a comforter, reconciling us to things as they are in contrast to things as they might be. "

आणि या विवेचनानंतर विनोदभावना ज्या व्यक्तीमध्यें आढळून येते अशा व्यक्तींची नामावळी त्यानें दिली आहे. पराभूत उमेदवार, पदच्युत राजे, पेटंट नाकारल्यामुळें चुरमुरे खात बसलेले संशोधक, भजीं-अंडीं खावीं लागल्यामुळें तोंड चुकवून पळालेले नट व सर्वसामान्यपणें अयशस्वी झालेले लोक व बेकार यांच्यामध्यें विनोदभावना उत्कटत्वानें वास करते असें त्याचें निदान आहे. रोमचा पोप, जाडे व लब्धप्रतिष्ठित विद्वान, हुतात्मे, समाजसुधारक, यशाचे व कीर्तीचे सोपान एकदांही कोलांटी खाल्ल्याशिवाय सतत चढत राहिलेले यशस्वी धंदेवाईक कारखानदार व व्यापारी या मंडळींत विनोदभावनेचा मागमूसही सांपडणार नाहीं, व सांपडलाच तर त्याचें प्रमाण अत्यल्प असेल असा त्याचा अभिप्राय आहे. लीकॉकची ही चिकित्सा व व्यक्तीच्या विनोदक्षमतेचें वर्गीकरण करतांना अस्तिपक्षीयांची व नास्तिपक्षीयांची त्यानें दिलेली ही यादी पाहिल्यावर जिवा या नांवानें जी संस्था निर्माण झाली, तिचें विनोदाच्या दृष्टीनें केवढें आकर्षण व महत्त्व आहे याचें सहज आकलन होईल. आक्रमणेच्छु अगर यशानें व विजयानें धुंद बनलेल्या व्यक्ति, समाज व राष्ट्र यांच्यामध्यें विनोदभावनेचा लवलेशही नसतो. विनोदाचें त्यांना कुपथ्य होतें. उलट त्यांच्या आक्रमणाची आग व असहाय्यतेचें दडपण यांच्यामुळें निर्माण झालेल्या परिस्थितीच्या खाणींतून विनोदाच्या हिरकण्या कशा चमकत बाहेर येतात, या दोन्हीं परिस्थितींची निदर्शक अशीं कैक उदाहरणें दाखवितां येतील. जर्मनीच्या हिटलरशाही राजवटींत सार्वजनिक ठिकाणीं राजकारणाशीं संबंध येणारा विनोद पिकविण्यास डॉ. गोबेल्स यानें बंदी केली व बर्लिनच्या पांच प्रसिद्ध विनोदमार्तंडांना तुरुंगांची वाट दाखविली. 'We have no intention of allowing intellectual good-for-nothings to make insane remarks about our state and public institutions' असें कारण देऊन ही बंदी समर्थनीय कां याचा खुलासा "These measures have become necessary because danger has arisen that the Nazis annoyed by jests would resort to self-defence" या शब्दांत त्यानें केला आहे. विनोदबद्धकोष्ठतेचा राष्ट्रीय विकार यापेक्षां अधिक विकोपाला जाऊं शकेल काय? पण असें असूनही या परिस्थितींत देखील नाझी जर्मनींत विनोदाचे स्फुल्लिंग उडतांना आढळतातच कीं नाहीं? तशा तऱ्हेचा अनुभव शाळाखात्यांतील एका नाझी इन्स्पेक्टरलाच आला. नाझीवादाचे संस्कार कोवळ्या बालमनावर व्हावे या हेतूनें या

वादाचे पाठ शाळांतून देण्यांत येतात. नाझी दृष्टिकोणांतून व्यवहारांत घडणाऱ्या प्रसंगाकडे पाहतां यावें व तात्पर्य काढतां यावें म्हणून नित्य प्रसंगाची एक नोंद विद्यार्थ्यांना वहींत ठेवावी लागते. या वह्या एका शाळेंत तपासतांना उपरिनिर्दिष्ट अधिकारी एका विद्यार्थ्याकडे आला व त्याची वही त्यानें पाहिली. या वहींत एके ठिकाणीं पुढील नोंद होती.

"Today our cat save birth to three nice kittens.
They are all black and all Nazis."

ही नोंद वाचल्यावर इन्स्पेक्टरनें त्या विद्यार्थ्याची पाठ थोपटली व त्याच्या राष्ट्रप्रेमाचें कौतुक केलें आणि जास्त उत्कठेनें तो पुढील पानें चाळूं लागला. आठदहा पानांनंतर त्यानें पुढील मजकूर वाचला.

"Today the kittens opened their eyes but father says they have now become anarchists. "How?" I asked him and he says, "They can no longer remain Nazis, because they have opened their eyes." आणि ही नोंद वाचल्यानंतर त्या इन्स्पेक्टरचा चेहरा कसा झाला असेल आणि त्या विद्यार्थ्याच्या दुर्दैवी पित्यावर कोणता प्रसंग ओढवला असेल याची कल्पनाच केली पाहिजे!

मनुष्यस्वभावांतील याच क्रियाप्रतिक्रियेच्या द्वंद्वामुळें व्यक्तिजन्य विनोदाला उठावणी मिळते व म्हणूनच जिवाचें व्यक्तिवैशिष्टय व त्याची परिस्थिति हीं दोन्हींही विनोदाला पोषक झालीं आहेत. भंपक धन्याचा जिवा हा एकनिष्ठ नोकर आहे. आपल्या मर्यादा त्याला कळतात. धन्याचा उथळपणा, त्याचा हेकेखोर-पणा, आचरट आत्मविश्वास ह्या त्याच्या दुर्गुणांची त्याला जाणीव आहे, परंतु धनी जरी आपल्याला सामान्य नोकरापेक्षां अधिक लेखीत नसला, तरी त्याचे दुर्गुण घराच्या चार भिंतींआडच राहावे, त्याचें जाहीर प्रदर्शन होऊं नये, हा आपला उच्च सेवाधर्म पाळण्यासाठीं तो तत्पर असतो. धन्यानें भानगडी कराव्यात व जिवानें त्या परस्पर निस्तराव्यात असा या धनी-नोकरांतील अलिखित करार असतो. पण धन्यापुढें आपला वरचढपणा दिसूं नये म्हणून फक्त 'होय व नाहीं' या मोजक्या शब्दांपलीकडे आपलें बुद्धिवैभव अगर कल्पनावैभव तो खुलें करीत नाहीं. उलट शक्य तितकें वेडप्याचें सोंग त्याच्यापुढें आणून धन्याच्या भंपकपणाची (Vanity) तो खुशामतच करतो.

" जिवा, मघापासून मी पाहतों आहें या तीन माशा सारख्या भुणभुण करून त्रास देत आहेत. त्यांना हांकून दे पाहूं " असें टाट्नें सांगितलें तर तोंडावरचा बावळटपणाचा मुखवटा कायम ठेऊनच तो विचारील, " माशा साहेब? पण साहेब, त्यांतल्या बाईमाणसांनाही हांकून देऊं? "

" बाईमाणसें? या माशांतही माद्या व नर आहेत? तूं कसं ओळखतोस? " त्यावर जिवा म्हणेल, " साहेब, या दोन माशा तर सारख्या आरशाभोंवतींच मगापून घोंटाळताहेत आणि हा तिसरा पठ्ठ्या साहेबांनीं काल आणून टांगलेल्या मिस अस्मानताराच्या फोटूवरतीच बेभान होऊन पडला आहे. "

या उत्तरांतील मार्मिकपणा टाटूला आकलन होणार नाहीं व जिवाच्या चेहऱ्यावरील निर्विकारपणामुळें मार्मिकपणाशीं नातें असलेलें उत्तर तेथून निघेल हा संशयही त्याला येणार नाहीं. " काय खुळा तर्कटी प्राणी आहे? माझ्याकडे आहे म्हणूनच निभाव लागला आहे." असें मनाशीं म्हणत व जिवाची कींव करीत टाटू आपल्याच औदार्यावर संतुष्ट राहील. " जिवा, ही नवी दुर्बीण किती छान आहे, नाहीं? चार मैलांवरचं सुद्धां अगदीं जवळ व स्वच्छ दिसतं " असें म्हणून टाटूनें जिवाचा अभिप्राय विचारला, तर मालकाच्याही पुढें एक पाऊल टाकून तो म्हणेल, "होय साहेब, काल गच्चीवर जाऊन मी जंगली म्हाराजाच्या कोपऱ्याला दुर्बिण लावली आणि साहेब, देऊळ तर जवळ आलंच, पण त्यांत चाललेली पुराणिकबुवाची कथा देखील गच्चीवर बसून मला छान ऐकायला मिळाली. "

' बंदे हुशार रहना बे, साहेब राजी रखना बे ' हें त्याचें संत कबीराप्रमाणेंच पण नोकरीपेशाचें एकमेव तत्त्वज्ञान आहे. आदर्श नोकराप्रमाणें तो सावध, अल्पसंतुष्ट, क्षमाशील, धन्याच्या हिताला जागणारा व जपणारा आणि अबोलक्या कार्यक्षमतेचा विनयशील असा मूर्तिमंत पुतळा आहे. पण एवढेंही असून त्याची कार्यपद्धति मात्र स्वतंत्र आहे. तो नुसताच हुकमाचा ताबेदार नाहीं. धन्याचे हुकूम तो अक्षरशः अंमलांत आणील, पण त्याचे हुकूम अंमलांत आणतांना जर धन्याच्या हिताला ते विरोधी आहेत असें त्याला वाटलें, तर ते बाह्यतः अंमलांत आणले जात आहेत असें दाखवूनही ते सफल होऊं नयेत अशी गुप्त व खासगी व्यवस्था तो मोठ्या दूरदर्शीपणानें करून ठेवील. अशा प्रसंगीं मात्र, ऐकावें धन्याचें

करावें मनाचें अशी त्याची कार्यपद्धति राहील. आणि धन्याच्या भानगडींचा शेवट गोड होऊन जर धन्याला त्या भानगडींतील जिवाच्या कर्तबगारीचा कयास लागला तरी देखील ती जाणीव देऊन धन्याला तो लाजविणार नाहीं. उलट कपिलाषष्ठीच्या योगानें कृतज्ञतेचे दोन शब्द धन्याच्या तोंडून बाहेर पडलेच तर त्याला स्वतःलाच लाजल्यासारखें वाटेल. अर्थात् धन्याच्या भानगडी निस्तरण्यासाठीं धूर्तपणें आपल्या मनासारखे व्यूह निर्माण करण्यांत जिवाची होणारी धडपड आणि नोकर किती जरी कार्यक्षम असला तरी तो नोकर आहे व आपण कसाही असलों तरी त्याचे धनी आहों ही जाणीव त्याला देण्यासाठीं टाट्र प्रकट करीत असलेलें घरंदाज असें मालकशाही धोरण या दोन वस्तूंच्या लढयांत जे जे चमत्कृतिपूर्ण व विनोदी प्रसंग घडून आले, त्या प्रसंगांवरच ह्या पुस्तकांतील गोष्टींची उभारणी झाली आहे.

जिवाच्या स्वभावधर्मामुळें त्याच्याबद्दल सहानुभूति वाटते; पण आपल्या सहानुभूतीचा तो भुकेलेला नाहीं. मायदेव कवींनीं त्याच्याकडे पाहिलें तर “ अंतर कालवुनी आंसवें येती मन्नयनीं ” असे उद्गार ते काढतील. पण खुद्द जिवा यशवंत कवींच्या शब्दांत “ नको मारूं मज दया दाखवून ” असेंच डोळे मिचकावून सांगेल. आपल्या सभोंवतालच्या परिस्थितींत विनोद व कारुण्य यांचा असा चमत्कारिक मिलाफ झालेला आहे कीं या दोहोंच्या सीमारेषा कुठें भिडल्या आहेत तें सांगणें कठीण झालें आहे. आपला ‘ ॲडमिरेबल ’ क्रायटन तीन वेगवेगळ्या परिस्थितींत दाखवितांना बॅरीनें याच मिलाफांच्या छटा नाजुकपणें व्यक्त केल्या आहेत. क्रायटनची व जिवाची जात एकच, पण नोकराचा धनी बनण्याची पॅसिफिकमधील ओसाड बेटावर क्रायटनला मिळालेली संधि जीवाला मिळाली नसली, तरी आला प्रसंग पुनः हंसतमुखानें साजरा करण्याची उभयतांच्या मनाची स्थितिस्थापकता जगाच्या सहानुभूतीबद्दलची त्यांची बेपर्वाईच व्यक्त करते. ज्या परिस्थितीबद्दल खेद वाटावा, त्याच परिस्थितीकडे थोडयाशा तात्त्विक व स्थितप्रज्ञ दृष्टीनें पाहिलें कीं ‘ कंटकशल्यें बोथटुनि’ त्या परिस्थितींतील विनोदाचा आस्वाद घेतां येतो. म्हणूनच मला वाटतें, हृदयस्पर्शी करुणरसाचा यशस्वीपणें उठाव करणाऱ्या लेखकालाच विनोदनिर्मितींतही तेवढेंच यश येतें. कोल्हटकर, गडकरी व अत्रे यांनीं हें दुहेरी यश मिळविलें आहे. आणि रत्ना व त्रिकोण या करुणरम्य कादंबऱ्या लिहिणाऱ्या पटवर्धनांनींही जिवाशीं व टाट्रशींही समरस होऊन त्यांच्या

सहाय्यानें उत्कृष्ट अशा दर्जाच्या विनोदावर आपला हक्क शाबीत केला आहे. तथापि निर्मळ विनोदाच्या दृष्टीनें पटवर्धनांनीं कोल्हटकर, गडकरी व अत्रे यांच्याही पुढें एक पाऊल टाकलेलें आहे असें म्हणण्याचें धाडस मी करतों. कोल्हटकर, गडकरी यांच्यांतील तेजस्वी साहित्यगुण व भाषेची सफाई पटवर्धन यांच्यामध्यें नसेल; पण विशिष्ट संदेश सांगून समाजसुधारणेला हातभार लावण्याच्या ध्यासामुळें कोल्हटकरादि विनोदपंडितांच्या विनोदांत क्वचित् प्रसंगीं जी कलाहानि झाली आहे, ती पटवर्धनांच्या या हास्यकथांमध्यें आढळणार नाहीं. निर्भेळ विनोदी हास्यकथा लिहिण्याच्या बाबतींत फक्त प्रो. चिं. वि. जोशी हेच एकटे पटवर्धनांपेक्षां सरस ठरतील. कोल्हटकर–गडकऱ्यांचा विनोद हा मराठीच्या विनोदी वाङ्मयांतील प्रचारकी विनोद आहे आणि त्या प्रचारकार्यांत वाहून जातांना गडकऱ्यांना तर कलेचें व आपल्या भूमिकेचेंही पूर्ण विस्मरण पडल्याचें कांहीं प्रसंगीं आढळून येतें. ह्या विधानांत अतिरंजितपणाचा अगर अतिशयोक्तीचा लवलेशही नाहीं हें दाखविण्यासाठीं गडकऱ्यांच्या 'ठकीचें लग्न' या लेखमालेंतील एक उताराच मी येथें उद्धृत करतों. ठकीच्या लग्न जुळविण्याच्या मोहिमेंत असलेला बाळकराम त्या मोहिमेंत आलेल्या अनुभवांचें विनोदी भाषेंत वर्णन करतां करतां चिडून एवढा बेभान झाला, कीं त्या अवस्थेंत बाळकराम केव्हांच अंतर्धान पावून समाजसुधारक गडकरी तेथें अवतीर्ण झाले व त्यांनीं एकदम व्यासपीठ गांठलें ! हे समाजसुधारक व्याख्यानाच्या आवेशांत म्हणतात,

"आपल्यापुढें गुडघ्यांत मान घालून बसलेल्या त्या हतभागी प्राण्याची जी हेटाळणी चालते, आणि जें अनादरपूर्वक फिदीफिदी हंसणें उकळतें, तें पाहून त्या चढेल चटोरांचा व त्याच्या सल्लागार मंडळाचा तिट्कारा आल्यावांचून राहत नाहीं. त्या वेळीं स्वतःची बुद्धिमत्ता व चाणाक्षपणा दाखविण्यासाठीं त्या गरीब जनावरावर वाटेल त्या प्रश्नांचा मारा होतो. या बाबतींतील कांहीं कांहीं आचरट व अत्यंत निंद्य प्रकार वेळोवेळीं पाहिल्यावरही त्यांबद्दल दोन शब्द लिहिल्यावांचून कसें राहवेल ? अशा अवघड परीक्षेंत सांपडलेल्या त्या मुक्या अर्भकाच्या मनाची काय दशा होत असेल बरें ? 'अडकली गाय आणि फटके खाय !' अशा वृत्तीनें धरणीमातेला दुभंग व्हावयाला–आपल्या हृदयाप्रमाणेंच दुभंग व्हावयाला–ती

विनवीत नसेल काय ? बाजारांत आठ–बारा आण्यांची निर्जीव बाहुली विकत घेण्यापूर्वी ती पाहतांना तिच्या कपड्यांना मळके हात न लावण्याची आम्ही जपून सावधगिरी घेतों आणि जन्माची सोबतीण पाहतांना तिच्या हृदयाच्याही चिंध्यापांध्या करतांना आम्ही मागेंपुढें पाहत नाहीं ! माझ्या दयाशील वाचक भगिनींनों ! स्त्रीजातीचा अभिमान धरा ! अगदीं नाइलाजामुळें कां होईना–पण अशा रीतीनें आपल्या पोटच्या गोळ्याचें प्रदर्शन करावयाला तयार होणाऱ्या ' घर 'च्या मंडळींच्या आड या, आणि दुसऱ्याच्या आंतड्यांची अशी हेटाळणी करावयास सरसावणाऱ्या आपल्या उच्छृंखल मुलांभावांना आळा घाला. ”

या तळमळून निघालेल्या उद्गारांचा एका विनोदी लेखाशीं संबंध असेल अगर विनोदी लेखांतीलच तो भाग असेल असें बजावून सांगितलें तरी तें कोणाला खरें वाटेल काय ? विनोदशून्य व्यक्तींमध्यें समाजसुधारकाची लीकॉकनें केलेली गणना किती वास्तव आहे याचाच हा एक पुरावा म्हणतां येईल. विनोदी भूमिका करतांना संयम सुटून कलाहानि कशी होते हेंच दाखविण्यासाठीं हा उतारा मीं दिला आहे.

अर्थात् प्रचाराचें एक साधन या नात्यानें जरी विनोदाचा अवलंब आद्य विनोदपंडितांनीं मराठी वाङ्मयांत केला असला, तरी निर्भेळ हास्यकथांची भर घालून विनोद ही एक स्वयंपूर्ण अशी सुंदर कलावस्तु बनविण्याचा त्यानंतरच्या लेखकांनीं प्रयत्न केला. त्यांच्या प्रयत्नांमुळेंच विनोदाला मराठी वाङ्मयांत स्वतंत्र असें मानाचें स्थान प्राप्त होऊं लागलें आहे. मराठीचें विनोदी वाङ्मय अल्प आहे. विनोदाच्या सूक्ष्मातिसूक्ष्म छटांनाही स्वरूप देईल अशी सुगमता मराठी भाषेमध्यें अजून निर्माण झालेली नाहीं. अशा स्थितींत जिवाचें आगमन केवळ अभिनंदनीयच नाहीं, तर तें विलोभनीयही झालें आहे. प्रो. पटवर्धन यांच्या कल्पनावैभवानें व सहृदयतेनें मराठीच्या हास्यकथांमध्यें यापेक्षांही जास्त मोलाची व महत्त्वाची भर पडो आणि निर्मळ हास्याच्या मेजवानीनें मराठी वाचकांचें मानसिक व शारीरिक आरोग्यही सुधारो अशी इच्छा जिवाच्या पाठीवर स्नेहाची थाप मारतांना मी व्यक्त करतों.

५–६–३९ **खं. वि. वावडेकर**

---

# कपिलाषष्ठी



ज्ञानप्रकाश कचेरींत तटा करून जाहिरातीबद्दल एक अक मोफत मिळविला आणि मी घरीं आलो. दारावर पाटी होती–"टाटासाहेब बिनबुडबुंध, हाय-कोर्ट वकील." खालीं "घरीं नाहीत" असे होते, त्याचे " आहेत " असें केलें आणि मीं माझ्या ऑफिसरूममध्ये प्रवेश केला.

"वरकाम करण्याला एक हुषार व प्रामाणिक नोकर पाहिजे. पगार लायकी-प्रमाणे. T. B., C/o ज्ञानप्रकाश." अशी ती ठराविक छापाचीच जाहिरात होती. "ख्वाय लेकाचे, किती बजावलं तरी प्रमुख ठिकाणीं जाहिरात टाकतील तर शपथ !" असे पुटपुटत मीं ती पुन्हा वाचली. त्या जाहिरातीचा मला विलक्षण अभिमान वाटला.

नांव टाटा पण हातीं टाटोळा !
प्लेग पुरवला पण हा टी. बी. नको बुवा !
मागे बच काय तो कमी आहे.
टी. बी. म्हणजे टोळभैरव......

अशा प्रकारच्या कोटया माझ्या नांवावर करून मला नेहमी हिणविणारे माझे दोस्त बेटन आणि पेटन ही जाहिरात पाहून कसे खजील होतील याचा विचार करीत मीं स्टोला कांकडा लावला.

तसें पाहिलें तर वरीलपैकीं पहिला शेरा माझ्या परिस्थितीला गैरलागू नव्हता. अगोदरच पुण्यांतली कसबा पेठ–अन् तिच्यांतल्या एका गल्लींतल्या गल्लींत कमिटीनें राहण्याला धोक्याचें म्हणून डांबरी फुल्या मारलेलें माझे घर. धंद्याची पाटी दारावर लावून पुरतीं दोन वर्षेंही झालीं नव्हतीं. प्रॅक्टिस म्हणाल तर दांडगी,

म्हणजे हातांत कधीं न सांपडणारी ! वकिलीच्या कोर्सपासून परावृत्त करण्यासाठीं मुलाला पुण्यांतल्या कोणत्याही बापानें माझें उदाहरण दाखवून द्यावें. अशा स्थितींत वरील जाहिरात पाहिल्यावर एखादी यक्षिणीची कांडी तर मला सांपडली नाहीं ना, असें माझ्या मित्रांना वाटल्याशिवाय राहतें ना !

अंदरकी बात अशी कीं, नुसत्या कांडीचा नव्हे तर यक्षिणीचाच यांत संबंध होता. ती जिवंत असून माझ्यावर तिचा खडा पहारा असे. तिच्या व माझ्या दरम्यान नात्याचा बराच घोटाळा होता; पण आम्हीं तिला आत्या म्हणत असूं. ती खारला राहायची आणि तेथून दादरला रोज चालत यायची. तिच्या मृत्युपत्राचा मीच नायक असलों, तरी ती जिवंत असें तों आमचा वारसा कवडी किंमतीचाच होता. माझ्यावर आत्याचा लोभ कमी होता असें नाहीं; पण, "माझा टाटू थोरल्या माधवराव पेशव्यांसारखा होणार" या तिच्या महत्त्वाकांक्षेनें सगळी घाण होत असे ! आमच्या गुरुजींकडून तिनें त्या राजपुरुषाचें चरित्र मुद्दाम लिहविलें होतें. दर आठवड्याला या रा. पु.च्या चरित्रांतील उताऱ्यांनीं भरलेलें तिचें एक पत्र मला येत असे व त्यावर मला उत्तर हें लिहावेंच लागे. मम्मुआत्याची दादरची चाळ आणि खारीचें शेत हीं दोन सोनेरी ढापणें जर माझ्या डोळ्यांपुढें नसतीं, तर तिच्या त्या पत्तुरड्यावर या टाट्यानें नजरही टाकली नसती. मग उत्तर देणें लांबच राहो !

आमच्या समोरच्या माडींत नुकतेंच एक बिऱ्हाड आलें होतें. भुस्कुटे नावांचा एक म्हातारा पेन्शनर, त्याची बायको आणि वयांत आलेली त्याची लेक कपिला एवढेंच कुटुंब. म्हातारा म्हणें मुंबईच्या अकाउंटंटच्या हपिसांतून सेवानिवृत्त झालेला होता.

कुमारी कपिला भुस्कुटे दिसायला काळीसांवळी असली, तरी अंगापिंडानें माझ्या आवडीप्रमाणें अघळपघळ होती. नेहमीं हसतमुख असायची. समोरच्या खिडकींत ती उभी राहिली, म्हणजे खिडकीची चौकट तिच्यावर अगदीं मापें घेऊन बसविल्यासारखी दिसे. ती खिडकींत आली, कीं आम्हींही खिडकीचें झडप कलतें करून समोर नजर देऊन बसायचे. आमच्या गल्लीला भुस्कुटे मंडळीनें शोभा आणली असें मला वाटे.

परंतु हा विरंगुळा फार दिवस टिकला नाहीं. नवीन बिऱ्हाडाचें वर्तमान आत्याच्या कानावर कसें गेलें कोणास ठाऊक ? एकाएकीं तिच्या साप्ताहिकाचें दैनिक पत्र सुरू झालें आणि त्यांतही तांबड्या रेघा दिसूं लागल्या. असल्या विषयावर आत्याचीं मतें भयंकर होतीं. दर्शनी खिडक्या ताबडतोब बंद करून छपराला भगदाडें पाडा असें तिनें माझ्या घरमालकाला स्वच्छच लिहिलें ! पण त्याचें घरच असें चंद्रमौळी, कीं कुठलीही एक वीट काढता तर सारा इमला खालीं कोसळता. म्हणून त्यानें आत्याच्या सूचनेवर, टाटासाहेबांनीं खिडक्यांना चिकाचे पडदे लावावेत, अशी उपसूचना आणली !

घरमालक ऐकत नाहींसें पाहून आत्यानें नवीनच डाव रचला. आपल्याजवळचें भिक्षुकाचें एक शेंबडें पोर माझ्याजवळ ठेवण्याचें तिनें ठरविलें. हें पोर शेष या नांवानें पंचक्रोशींत प्रख्यात होतें. वरवर माझें घरकाम करायला म्हणून तो येणार असला, तरी खरोखरी माझ्यावर पाळत ठेवण्याचें काम तो करणार हें मी समजून चुकलों. त्याचा एक महिन्याचा पगार देखील आत्यानें अगाऊ पाठविला. त्याचा फायदा घेऊन आत्यावर मात करण्याकरितां मीं ही जाहिरातीची हिकमत लढविली. घरकामाला इथेंच चांगला माणूस स्वस्तांत मिळेल, बाहेरगांवचा कशाला, वगैरे साफसरणीचें एक पत्र आत्याला लिहिलें आणि लगेच जाहिरात देऊनही टाकली. आतां शेषाचा विळखा आपल्या नरड्याला बसायचा नाहीं या आशेनें मला समाधान वाटलें.

चहा संपतो न संपतो तोंच पेटनची " टाटासाहेब " अशी हाक ऐकूं आली. रस्त्यांत आपल्या पायचाकीवर बसून एक तगंडी समोरच्या गटाराच्या फरशीवर टेकायची आणि मोठमोठ्यानें गप्पा मारायच्या अशी त्याला वाईट खोड होती. मी खिडकींतून पाहिलों तों समोर भुस्कुटयांचें कन्यारत्न उभें ! बाहुलीच्या हौदावरील बाहुलीसारखी अगदीं निश्चल !! पेटननें हाका मारतां मारतां तिरप्या डोळ्यांनीं तिकडे नजर लावलेली. मी खिडकीजवळ जातांच गुलामानें एक तपकीरीचा बार नाकांत भरला आणि जीभ सैल सोडली. काय नाहीं नाहीं तें बोलत होता तो !

आमचा असला संवाद नेहमींच चाले. पण आतांची गोष्ट निराळी होती. समोर बिऱ्हाड आलें होतें. त्यांत कुलीन माणसें राहत. कदाचित् उच्चविद्याविभूषितही असतील. अन् त्यांची मुर्वत न ठेवतां या पोरानें असला चावटपणा करावा काय? अलीकडच्या पोरांना औचित्य कशाशीं खातात हेंच मुळीं कळत नाहीं. तरुण स्त्री ही प्रेमाच्या राज्यांत नेहमींच सम्राज्ञी असल्यामुळें ती केव्हांही आदरणीयच समजली पाहिजे....इत्यादि विचार माझ्या डोक्यांत येऊन मी पेटनवर डोळे वटारूं लागलों. पण तो कसला वस्ताद ! बरीच चर्पटपंजरी लावून शेवटीं त्यानें खिशांतून एक पुस्तक काढलें आणि "चौथें पान वाच लेका" असें सांगून सरळ वर भिरकावलें. अशा फेकलेल्या वस्तु झेलण्याची मला संवय नसल्यामुळें माझे हात हवेंतच फिरले आणि पुस्तक टपकन् रस्त्यावर पडलें. अन् तें पडण्याच्या आधींच तो गाढव पसार झाला.

बाप रे ! उताण्या पडलेल्या पुस्तकाकडे लक्ष जातांच माझ्या छातींत धस्स झालें. खिडकीच्या दांडीला गच्च धरून मी पाहूं लागलों. कव्हरावरचें तें नागवें कोल्हें ! "समाजस्वास्थ्याचाच" अंक खास ! साधारण दृष्टीच्या माणसाला स्पष्ट दिसावीं इतकीं तीं अक्षरें मोठीं होतीं. हरे राम ! कपिलेची नजरही त्या चोपड्यावर खिळून गेलेली दिसली. कोण शिसारी आली असेल तिला माझ्या मित्राची ! अन् त्याच्याबरोबर माझीही.

छे. छे. आशाच नको आतां तिच्या सहानुभूतीची. वाऱ्यानें पुस्तकाचें कव्हर फडफडत होतें. नग्न स्त्रीचें चित्र नसतें, तर पदरच उडतोय असें म्हटलें असतें मीं ! पेटनला मनांतून लाख शिव्या मोजल्या आणि ओशाळून खिडकी लावून घेतली.

दुसऱ्या दिवशीं झाल्या प्रकाराचा तिच्यासमोर नीट खुलासा करावा आणि मित्राच्या अमर्यादेबद्दल तिची क्षमा मागावी या हेतूनें खिडकींत चोरासारखा उभा राहिलों. तीही नेहमींप्रमाणें समोरच्या खिडकींत आली. पण आमचें तोंड उघडेल तर शपथ ! दोन तास तसेंच घालवले. परंतु तोंडांतून शब्द बाहेर पडेना ! !

जाहिरातीवरून तसे पुष्कळ लोक नोकरीची चौकशी करून गेले. पण माझ्या मनांत त्यांच्यापैकीं एकच इसम भरला. त्याचें नांव जिवा खानापुरकर. मुंबईंत दिवस काढले होते त्यानें. चांगला व्ह. फा. झालेला. गरीब असला, तरी रुबाब असा कीं, कुणाला वाटावें हा जहागिरदारच !! असेलही खरोखरच जहागिरदार कधींकाळीं. बाधलें असेल हें डिप्रेशन त्यालादेखील. पहिल्यांदा भेटायला आला तेव्हां वाटलें मातब्बर अशीलच आला जसा कांहीं ! मारे खुर्ची दिली त्याला बसायला. पण जेव्हां उभ्यानेंच त्यानें नोकरीकरितां विनंति केली, तेव्हां उमगलों ! बाकी त्यानें आदबीचा देखावा केला नाहीं. एक सुंदर बटमोगऱ्याचें फूल किंचित हसून मला नजर केलें आणि उभ्यानेंच नमस्कार केला. मी बाहेर निघालों तसें त्यानें तें फूल माझ्या बटनहोलमध्यें खोचून दिलें. पहिल्या सलामीला त्यानें "इंप" मारलें व मीं खूष झालों. पुढचा मागचा विचार न करतां त्याला मीं नोकरीस ठेऊन घेतला.

दुसऱ्या दिवशीं आमचें संभाषण झालें--

" जिवा ! "

" साहेब ! "

" तुला मीं ठेवलाय खरा...पण...पण तुला आमची मम्मुआत्या ठाऊक नाहीं." लगेच किती मूर्खासारखें आपण बोललों असें वाटून मी लाजलों.

" आहे साहेब ! " त्याचें उत्तर आलें.

मी चमकलों !

" आँ ? ती उंच नाकाची, आडव्या अंगाची, कपाळावर सातपुडा नि चेहऱ्यावर ठोक्यांचा हुंडा असलेली, गोरटेलेशी-सोवळी झालेली आणि सगळ्या बायकांत शहाणी मम्मुआत्या तुला माहीत आहे ? खरं सांग. थापा नही मंगता हं जिवा ! "

" बोलतांना त्या नाक फेंदारतात, साहेब. लांबून कोणाचाही वास येतो त्यांना ! "

" अरे वा ! जिवा, तूं अभ्यास केला आहेस मम्मुआत्याचा ? "

" रंगाऱ्याऱ्याच चाळींत जोगवा मागायला येत असत त्या ! "

" होय का ? तर मग ती तुला तेव्हांच पसंत करील ! "

" मीं त्यांना जोगवा घातलेला नाहीं साहेब कधींच ! "

" नसूंदे रे ! तिला काय आठवणार आहे, डोंबल ? मी देईन ठोकून तू हमेशा जोगवा घातलास असं. बरं झालं त्या शेषाची नजरकैद टळ्ली ! "

" तुमची कृपा साहेब ! " असें म्हणून जिवानें आवंढा गिळ्ला. त्याचा गुड गुड गुड असा आवाज झाला. हां, ही खोड काढणें जरूर होतें.

" माझ्यासमोर गुडगुडायचं नाहीं हं जिवा. मला नाहीं आवडत तसलं कांहीं."

" चुकलों साहेब. "

असें म्हणून तो घरांत जाणार इतक्यांत मला वाटलें कीं त्याला आपल्या विश्वासांत घ्यावा. म्हणून त्याला थांबवून विचारलें, " हें बघ जिवा, आपलं एखाद्या नाजुक वस्तूवर प्रेम बसलं. तिच्या नाजुकपणाला धोका लागूं नये म्हणून आपण जपत असलों, अन् आपल्या एखाद्या वात्रट मित्रानं मुद्दाम तिच्यादेखत अचरटपणा करून सगळा बिघाड केला...तर, अशा परिस्थितींत काय करावं ? "

" वाइट वाटल्यासारखं दाखवून त्या वस्तूची भरल्या तोंडी क्षमा मागावी, साहेब. म्हणजे तिच्या मनांतल्या कुशंका पळून जातील. "

" कुठं चौपाटीवर कीं काय ? " मी माझ्या नेहमींच्या मुद्द्यावर येऊन खकसलों, " जिवा, ही मुंबई नाहीं ! इथल्या पोरी तोंडी माफीला दाद देत नसतात. "

एकूण काय ? आग तशीच धुमसत राहिली.

भरीस भर म्हणून दुपारीं फुपाटा आला. गल्लींत एक टांगा उभा राहिला आणि पुणेरी टांगेवाल्याशीं बाहेरच्या पाव्हण्याची होणारी ठराविक बाचाबाची सुरू झाली.

" बोडक्याच्या पारापाशीं सांगितलं न् हिकडं कुठं आनलं घोडक्याच्या पिराकडं धा कोसांवर ? आन् हातावर दोन गिन्न्या टिचवता. त्याबी न्हाऊयात ना तुमच्या कड्डसरीला. हा, आज या धंद्यांत जलम ग्वला माजा. पर असं भाडं नव्हतं कुठं बगितलं. तरी सक्या सांगत व्हता, या बामनीनीचं भाडं नगं घेऊं म्हून ! " टांगेवाला म्हणत होता.

त्याला उत्तर–"चूप मेल्या, पुणं–मुंबई शतपावली करणारी मी, नी मला शहाणपणा शिकवतोस काय? घोडक्याचा पीरच सांगितला होता तुला. पण मेल्या, तुझे कान फुटले त्याला मी काय करणार ? काय माजलेत ग बाई हे टांगेवाले हल्लीं! आमच्या लहानपणीं एक आण्यांत चतुर्शिंगीला जायचा टांगा. दिवसेदिवस मिजास वाढतीय मेल्यांची. थांब हो. टाटलाच आणते बोलावून. फौजदार आहे तो, फौजदार. फरासखानाच दाखवला पाहिजे तुला मेल्या. भामटा कुठला साऱ्या मुलखाचा !! "

रणभेरीलाही मागे टाकणारा मम्मुआत्याचा तो आवाज मी ओळखला ! पुढें काय वाढून ठेवले आहे याची मला चांगली कल्पना आली. टोपी घालून खालीं गेलो. आत्याची वळकटी वर आणली. आत्याच्या मागोमाग आणखी एक "स्वारी" घरांत शिरली. मुंबईत असतो तर राणीच्या बागेंतील वानरांची कॉलनी चुकून उघडी तर राहिली नाहीं ना असे वाटले असते. त्या व्यक्तीचे कोणतेही दोन अवयव एका पातळींत नव्हते. टोपी होती कीं कसचे पुडके होते कोणास ठाऊक? तुळतुळीत गोट्याला करंजेल तेल लावलेले असून त्यावर घेरा ठेवल्यामुळे एकचतुर्थांश जमीन आणि तीन चतुर्थांश पाणी असा तो भूगोलाचा नकाशाच दिसत होता! पूर्व गोलार्धात डोळ्यांचीं खांचडे आणि नाकाचा हिंदुकुश अन् पश्चिम गोलार्धात भरगच्च गोंडेदार शेंडी. अहाहा! काय ध्यान दिसत होते ते! आगपेटी उघडतांना आपण आतले पुढं ढकलतो कीं वरचे मागे सारतों हें समजत नाहीं, तसे तो हसतांना त्याचे ओठ मागे जात कीं दांत पुढे येत ते कळेना. नखे कुरतडीत अगाला लचके देत आणि खांदे उडवीत तो माझ्यापुढे उभा राहिला.

"नमस्कार कर ना मेल्या तुझ्या काकांना" आत्याने सुचविले आणि ती तडक घरांत गेली.

"कसं काय शेष?" मीं भीत भीत विचारलें. तो शेषच असला पाहिजे अशी माझी खात्री झाली.

"अॅ, हॅा, ही ही ही!"

त्याचें हें उत्तर ऐकतांच कण्यावरून बर्फाचा खडा सरसरत जावा तसें मला झालें. पुढें मी कांहीं विचारणार तोंच उभें वेढलेली आत्या घरांतून [illegible]

माझ्यासमोर येऊन उभी राहिली. थेट फँटम ऑफ् धी ऑपेरा मधला लॉन चाने ! उभ्या डोळ्यांत लेव्हल बाटलीप्रमाणें फिरणारीं तीं बुबळें, कपाळावर सातपुडयांचे टप्पे व नाकाखालीं दोन छत्र्या उघडलेल्या ! आत्याचा तो चंडिकेचा अवतार मला कांहीं नवीन नव्हता.

“ ओहो च्या ! यमपुरींतला तुझा आवडता सीन करते आहेस वाटतें ? ” तोफेचा गोळा चुकविण्यासाठीं मी हंसून विषयपालट करूं लागलों; पण ती बोलेना. अर्थात् हें चिन्ह चांगलें नाहीं असें पाहून मीं पुन्हा म्हटलें, “ हातपाय धुतलेस का ? आं ? तुझी प्रकृति आतां बरी दिसतेय बुवा. वा. ! बाकी असणारच ती. घरचं निरसं दूध अन् मोकळी हवा......”

पण शेवटीं धुडुम झालेंच !

“ टाटया...तो कोण ? ”

“ हा होय ? हा तर आपला शेष ! ”

“ शेष नाहीं. तो...तो मेला इथं कसा ? ”

“ त्याचं असं झालं आत्या, इथं बाजारांत कोण गर्दी असते माहीतच आहे तुला. गावंढयावरून आला नि रस्ता चुकला बिचारा. ते रावबहादुर रोठे ! पशु-दया मंडळाचे चिटणीस ! त्यांना तो सांपडला आणि त्यांनीं गळ घातली याला ठेऊन घ्या म्हणून. म्हटलं अनायासं आपल्याला माणूस हवाच होता......”

“ फसवलं रे फसवलं तुम्हांला या भामटयानं ” एक टाळी वाजवून आत्या घशांत हरभरे भरडल्यासारखा आवाज काढून म्हणाली, “ अरे, हा दादरचा वात्रट, मला पुरा ठाऊक आहे. गांवढळ कशाचा ? चांगला ठक आहे ठक. माझ्या शाळिग्रामांना तो नेहमीं ताम्हनांत पाडायचा. पूजेला बसायच्या आधींच निवेद्य गिळायचा मेला. जुन्या गंधगोळ्या पाण्यांत भिजवून पारोशा देवांच्या कपाळीं टिकल्या लावी. छपरांतून विंचू पडायला लागले नि अंथरुणांत घोणी निघाल्या तेव्हां लक्षांत आलं माझ्या. नको ग बाई हा चांडाळ घरांत. भरल्या घरांत विघ्न हें. शेषालाच राहिलं पाहिजे तुझ्याजवळ ! ”

“ श्री चंडिकेची इच्छा ! ” मी उद्गारलों. होईल होईल वाटत होतें तेंच झालें. पुष्कळ वकिली करून पाहिली पण व्यर्थ ! आत्यानें म्हटलें तें म्हटलें.

अतिशय कष्टी होऊन मीं खुद्द जिवाजवळच बोलणें काढलें. " औट घटकेचंच राज्य झालं तुझं म्हणायचं ? "

" आत्यांचा हुकूम ! "

" वाईट वाटतं मला."

" मलाही. "

" तुझ्या खानापुरी डोक्यांतून एकादा उपाय निघतो का पहा ! "

" आपल्याला कदाचित् आजारी पडायला लागेल साहेब. " जिवानें थोडा विचार करून उत्तर दिलें.

" कशानं ? प्रेमज्वरानं कीं काय ? "

" तसंच कांहीं तरी."

"छट्. असलं सोंग आत्याच्यापुढं टिकायचं नाहीं, जिवा. प्रेमाचा ताप नळींत येत नसतो. अरे, हे प्रकार कादंबरी–नाटकांत ठीक. व्यवहारांत जमायचे नाहींत."

मग तुमचं तुम्हीच बघा, असा आविर्भाव करून जिवा घरांत गेला. मी विषण्ण मनानें खिडकींत उभा राहिलों. अरे, वा ! आज कपिलाषष्ठीचाच योग म्हणायचा. ती समोर उभी अन् चांगला नट्टापट्टा करून. गालांतल्या गालांत हसूं येत होतें. आज गौरबीर होती वाटतें तिच्या घरीं ?

जिवाच्या पहिल्या सूचनेची मला आठवण झाली. माफीची मात्रा सुरू करावी म्हणून मीं म्हटलें, " ॲ, शुक् शुक्. अहो, इकडे पाहा."

पण तिनें दाद दिली नाहीं. पुन्हा टाळ्या वाजवून ओरडलों, " जरा इकडे पाहतां का ? अहो, आज किनई सकाळीं "...पण छे. तिचें लक्ष रस्त्यावर खरकटें खाणाऱ्या एका गाईवर खिळून गेलें होतें. एकाएकीं तिच्या मनांत कसलासा विचार आला. घाईघाईनें घरांतून तिनें एक तपेली आणली आणि ती तडक जिना उतरूं लागली.

मला त्या गाईचा अतोनात संताप आला. दोन प्रेमी जीवांच्या खाजगी संभाषणांत तिला तोंड घालण्याचें कांहींच कारण नव्हतें. पशुदया मंडळाच्या लोकांना प्रेमी माणसांची अधिक दया येती तर ? तें कांहीं नाहीं. गाईला धक्का

शिकविलाच पाहिजे असा विचार करून मी हळूच खालीं गेलों. तिनें आपलें थोबाड आमच्या दारांतच घातलेलें होतें. काठी घेण्याची सोयच नव्हती. कारण आत्याला जनावराला मारलेलें मुळींच खपत नसे. तसेंच धोतर वर खोचून मी गाईची शिंगें पकडलीं आणि आतां एक सणसणीत मुस्कटांत देणार इतक्यांत तिनें माझ्या छातीवर मुसंडी मारली. पायाखालचे जाजम कोणी फरकन ओढून घ्यावे तसे माझे पाय एकाएकीं हवेत फिरूं लागले आणि देह तिच्या तंगड्यांत घोटाळू लागला. गाईचे खूर दुभंगलेले असतात हा वस्तुपाठ त्या वेळीं मला पटला !

तिच्या मागच्या बाजूस ताजें गोमूत्र धरण्याकरतां कोणी तरी नेहमीचे स्वर काढीत उभें होतें. गाईने केलेल्या धिंगामस्तीमुळें त्याच्या हातांतलें भांडें रस्त्यावर पडलें. गोमूत्र वाहून गेलें. "अग, हाइक् हाइइक् !" असे स्वर काढल्यानंतर भांडें उचललें गेलें आणि "काय उच्छाद आहे ग बाई या माणसांचा—गाय तरी बरी मुकाट्यानं गोमूत्र घेऊं देत होती. पण हे आले शौर्य दाखवायला." इत्यादि बडबड पिचऱ्या आवाजानें करीत गोमूत्र संपादक व्यक्ति पाय आपटीत समोरच्या घरांत गेली. माझ्या दृष्टिपथांत ती येतांच मला धक्का बसला. हाय ! माझ्या लाडक्या कपिलेच्या परोपकारी कार्याच्या आड मी आलों हं ? अरेरे ! समोरचीं घरें माझ्या डोळ्यांसमोर फिरूं लागलीं व माझी शुद्ध गेली..!

शुद्धीवर आलों त्या वेळीं मला पांघरुणांत गुंडाळलेलें होतें. डोक्यावर बर्फाची पिशवी, छातीवर डाक्टरांची कर्णनळी, आणि हाताला पट्टी गुंडाळलेली असा आमचा थाट होता. उजव्या बाजूला नाकाला पदर लावलेली आत्या, पायगती नखें खाणारा शेष आणि पलीकडच्या कोपऱ्यांत उभा राहिलेला जिवा अशा तीन व्यक्ति मला दिसल्या. हृदयावर आघात झाला आहे असें आपलें मत डॉक्टरांनीं बोलून दाखविलें. आत्याची लागलीच सरबत्ती सुरू झाली..."आघात कसला डोंबलाचा ? मूठ मारली हो माझ्या टाट्ला त्या सटवीनं. तो (जिवाकडे बोट दाखवून) नाठाळ म्हणतो, प्रेमामुळं आघात झाला न् डॉक्टर तुम्ही त्याचं ऐकतां. अरे जिव्या, प्रेमानं का कुठं माणसाची अशी अवस्था होते ? आम्हाला नव्हतं का प्रेम ठाऊक ? किती प्रेम करायचं असं इकडे माझ्यावर. भांडणंही व्हायचीं आमचीं अधून-

मधून. पण ढिम्म नव्हतं आमच्या देहाला. लोहाराच्या भात्याहून भक्कम होतं आमचं काळीज."

"अहो, या सटव्या अशाच डॉक्टर! तरणा ताठा पोर पहिलान् आणि केला न् आडवा चांडाळणीनं. आपल्या नकट्या नाकामुळं लगीन होईना म्हणून तरण्या पोरांच्यावर सूड. काय नट्टाफट्टा, काय मुरडणं, काय खिदळणं! मला ठाऊक हें सगळं. अशा कोंवळ्या पोरांना मुठी मारायच्याच या कैदासणी. डॉक्टर, मी तुम्हाला लिहून देतें, त्या कारटीनं टाट्टला मूठ मारली आहे मूठ!"

डॉक्टर बिचारे हो हो करून केव्हांच चालते झाले होते.

आत्यानें शेषाकरावीं भात, भाकरी, दहीं इत्यादि पदार्थ माझ्यावरून उतरून टाकले. लिंबू ओंवाळून त्याच्या फांका केल्या आणि खिडकीवाटे समोर फेकून दिल्या. दारांत सात सटवाया मांडून पुजल्या. समोरच्या घरावर नग्न बाहुल्या चितारल्या; पण व्यर्थ! माझी झोपेतली बडबड चालूच होती. कपिला रागानें माझी निर्भत्सना करीत होती आणि मी तिच्या विनवण्या करीत होतों. माझ्या प्रत्येक विनवणीबरोबर आत्या कपिलेचा उद्धार करीत होती.

संध्याकाळीं जिवानें मोठें धाडस केलें. अतिशय आदबीनें तो आत्याला म्हणाला, "मला मुठीचा मंत्र माहीत आहे बाईसाहेब!"

"तुला? अमंगळ गुंडाला?" आत्या खेकसली.

"जी होय बाईसाहेब."

"टाट्टला उठवणार तूं?" आत्याचे डोळे आश्चर्यानें विस्फारले.

"माणुस मिळालं तर उठवतों."

"माणूस? माणुस कशाला? शुद्धीवर आहेस ना, का मेल्या तुझंही डोकं फिरलं?"

"पूजाअर्चा करणारा कर्मनिष्ठ माणूस पाहिजे. टाट्टसाहेबांच्या अंगांत देवीचा संचार झाल्यावर मुठी परत येतील त्या झेलल्या पाहिजेत, बाईसाहेब."

"एवढंच ना. शेष, अरे शेष!"

नखें कुरतडीत डोळे तिरके करून शेष आत्यासमोर उभा राहिला. त्याला अगदीं हळुवार स्वरांत आत्या म्हणाली,

" जिव्या मंत्र घालतोय. टाट्च्या मुठी परतून येतील त्या झेल पाहूं. "

" कच्या झेलूं ? " त्या बावळटानें प्रश्न केला.

" अंगावर ! " जिवा गंभीर मुद्रा करून म्हणाला. " त्यांच्या अंगांत सटवाई शिरली कीं ते जोरजोरानं तुझ्या नाकातोंडावर, छातीवर बुक्क्या मारतील. एखाद्या गुच्च्यानं तुझे दांत देखील पडतील. पण ते सारं हूं की चूं न करतां सोसायचं. मंत्र संपेपर्यंत बोलायचं म्हणून नाहीं. नाहीं तर मंत्र फसेल..."

" फसला तर याद राखून ठेव जिव्या, माझ्याशीं गांठ आहे. हं शेष, अरे बाळ, पुढं हो पाहूं चटकन. चाकरीला राहायचं आहे ना तुला. मग धन्याचे दोन घेतले पाहिजेत. तसा तूं मार खाण्यांत अगदीं कच्चा नाहींस म्हणा. मुळशीच्या चळवळींत चांगलं टाळकं सडकलं होतं कीं......"

आत्याची चर्पटपंजरी चालू असतां शेषाच्या डोळ्याच्या भीतीनें कवड्या झालेल्या होत्या आणि तो एकेक पाऊल मागें सरकत होता. स्वयंपाकघराच्या दारापर्यंत तो गेला तेव्हां आत्याच्या तें लक्षांत येऊन ती कडाडली, " शेषा, झालंय् काय तुला पळायला ? चल पुढं ये, नि खा चार गुच्चे. आहे काय त्यांत ? "

" ॲ, ऑ,...ही ही ही...गुच्चे नको...आत्याबाई...मूठ नको..." असें केविलवाणे आवाज काढून शेषाने घरांत धूम ठोकली. " हात गुलामा ! " असें म्हणून कोपऱ्यांतली केरसुणी उचलून आत्या त्याच्या पाठोपाठ धांवली.

जवळ येऊन जिवानें माझ्या हातांत पानें असलेलें सोनचाफ्याचें टपोरें फूल दिलें. मीं त्याचा वास घेत विचारले,

" कोण देतं तुला हीं फुलं जिवा ? "

" कुणी नाहीं. आमच्या कपिलाताई ! "

" आं ? " मी ताडकन बिछान्यांत उठून बसलों व उद्गारलों, " क-कपिला-त-ताई ? समोरच्या ? "

" होय साहेब " असें म्हणून त्यानें खिशांतून एक बारीकसें पुस्तक काढलें व माझ्यापुढें केलें

मी स्वप्नांत तर नाहीं ना अशी शंका येऊन इकडे तिकडे पाहिलें. आश्चर्यातिरेकानें माझ्या तोंडून शब्द धडपणें बाहेर पडेनात. त्या दिवशींचा समाजस्वास्थ्याचाच अंक तो !

" क-कुठं मिळाला हा तुला ? " मीं कावऱ्या बावऱ्या नजरेनें चहूंकडे पहात प्रश्न केला.

" कपिला ताईनीं तुमच्याकडे द्यायला सांगितलं ! "

" छा ! अन् मी काय बाळबोध समजत होतों तिला ! " मीं म्हटलें,

" ताई म्हणण्यापर्यंत गट्टी केलीस हं तिच्याशीं ? "

" त्यांच्या वडिलांनींच तर माझा लहानपणीं सांभाळ केला ! आपल्याकडे नोकरी आहे ही बातमी त्यांनींच मला दिली. आमच्या ताई तशा फार हुषार अन् अगदीं मनमिळाऊ. म्हणून तर मी आपल्याला म्हणत होतों..."

" समजलों, समजलों जिवा आतां सारं कांहीं. " मी आनंदानें त्याला टाळी देऊन स्वगत म्हणालों, " हातांत आलेला हा परीस खापरखुंटी म्हणून टाकून देणार होती आत्या ! ! "

" जरा खिडकींत येतां साहेब ? तेवढीच मोकळी हवा ! "

" अच्छा " करून मी उठलों. चांगलाच हुरूप आला होता मला. जिवानें तें फूल माझ्या कोटाला लावून दिलें. समोरच्या खिडकींत ती उभी होती. माझ्या फुलाकडे नजर जातांच अशी गोड हसली, कीं वा ! अन् लगेच मंजुळ शब्द आले, " उगीच बोललें हो मी आपल्याला. बरं वाटतं ना आतां ? " मी हसून मान डोलवतांच पुढला प्रश्न आला, " पुस्तक मिळालं आपलं ? "

मी जेमतेम " यस् थँक्स " असें पुटपुटलों. आनंदाला पारावार उरला नाहीं. "वसंत ऋतुजी आये आये" गुणगुणत खोलीभर नाच आरंभला. रॅकेट काढून साफसूफ केली. बिछाना गुंडाळून टाकला आणि बुटांना खडू लावीत बसलों.

# जीते रहो जिवा !

आत्या जरा वेळानें शेषाच्या नांवानें खडे फोडीत खोलीत आली आणि उंदराच्या जागीं उंट दिसावा असा तोंडाचा चंबू करून उभी राहिली. तिला वाटलें मला वात झाला.

" घाबरूं नकोस आत्या. दुखणं पळालं. आतां दोन सेट ठोकतों पेटनला " मी म्हणालों आणि अर्रर्र करून जीभ चावली.

" पेटन कोण अन् सेट कसले ? " तिनें विचारलेंच.

" पेटन ? अग तो बापये भटजींचा पतंजली. फार जुन्या वळणाचा माणूस. माझा मित्र आहे. बुद्धिबळांत निष्णात. "

" अरे, पण टाटया इतक्यांत एक जीव जातो नि एक राहतोय अशी होती तुझी स्थिति ! "

" आतां साफ. जिवाचा मंत्रच तसा दांडगा ! "

" अग बाई, जिवा तूंच का ? टाटूची मूठ परत घेतलीस ? " आत्यानें जिवाकडे जरा कमी तिरसटपणें पाहत विचारलें.

" कसचं बाईसाहेब ! त्यांचा चाकर मी. शेष पळाला तेव्हां म्हटलं आपणच जमतं का पाहवं."

" अस्सं ? "

आत्याच्या घशांत हरभरे भरडण्याचें काम सुरू झालें. वेळेचा फायदा घेण्यासाठीं मी विचारलें, " मग काय आत्या, जिवालाच ठेवायचा ना माझ्यापाशीं ? हो. कारण समोर तें बिऱ्हाड आहे तोंपर्यंत केव्हां मूठ मारली जाईल याचा नेम नाहीं. माणसं मुठी मारण्यांत मोठीं वाकबगार दिसतात ! ! "

[illegible]तें " हुंऽऽऽ " केलें. जास्त बोलण्याची सोयच नव्हती. दुसऱ्या दिवशीं शेषासहीत आत्याला गाडींत बसवून आलों. घर निःशेष झालें तेव्हां बरें वाटलें. परत आल्यावर जिवानें निरोप सांगितला,

" कपिलाताईंना पुढचे अंक हवे आहेत ! "

" मिळतील, मिळतील. सर्व कांहीं आस्ते आस्ते होईल ! ! " मीं डोळे मिचकावीत उत्तर दिलें.

---

# गोविंद



आमच्या गल्लींतल्या मिडवाइफ मिस कोठे यांची नि माझी तशी ओळख नव्हती; पण—

एक दिवस " धि बोडकेपार टी हाउस " मध्यें सहज एक " सिंगल " भुरकीत असतां माझ्या कानावर पुढील संवाद आदळूं लागला.

" कहर झालाय् हो हल्लीं ! "

" कोणाचा ? गोविंदाचा कीं काय ? "

" दुसरा कुठचा ? कानांत बोळे घालतों तरी त्याचा आवाज कानाच्या पडद्या-पर्यंत जातोच. डॉक्टर म्हणतात, पडदा विरलाय् ! ( कानांत करंगळी हलवून ) स् स् ओय ! "

"अन् रडतो कीं हो मध्यान् रात्रीचा गळा काढून ! आमच्या हिनं तर अगदीं हाय खाल्ली आहे. "

" तें तरी बरं ! पण आमच्या हिला, तो गळा ऐकला म्हणजे टमरेल घेऊन धांवावंच लागत ! "

" ती दुपारीं कुठं तरी जाते पाहा चांगली दोन तास. "

" हंऽऽ ? मग करतां का तेवढं काम ? "

" कोण मी ? छे हो ! मी शिवत नसतों चातुर्मास्यात ! "

" बरं, तुम्हीं हो ? कांहीं विशेष नाहीं करायचं; पोत्यांत गुंडाळा नि भांडे-आळींत सोडून द्या. पुन्हा यायचा नाहीं ! "

" माझं किनी, ब्लड प्रेशर वाढलंय् अलीकडे ! "

" मग असंच करा ना ! इस्पितळांत टाका अडकावून ! "

" पण फी हो कोण भरणार त्याची ? "

" कसचे रे, तुम्ही पुणेकर ? यःकश्चित मिस कोठ्यांच्या यःकश्चित गोविंदाला भितां ? डरपोक सगळे ! "

" ओ ऽ हो. कोण, आपणच का हे ? संभाळा, वरचा दांत खालच्या कवळींत अडकून बसेल एखादे वेळेस. हॅः हॅः ! "

" अरे जा रे, मी पाहा उद्यां जातों सार्जंटकडे अन् कायमचाच निकाल लावून टाकतों ! "

".आणि तें नच जमलं, तर मी करंडींत घालून नदीच दाखवीन एकदम ! आहा ! काय डोळे चुरचुरताहेत जाग्रणानं ! "

शेवटीं सार्जंटाकडे डेप्युटेशन नेण्याचा ठराव पास होऊन कमिटी उठली.

"नाहीं चारली धूळ लेकांना तर नांवाचा बिनवुडबंधच नव्हे !" असें म्हणत मीही बाहेर पडलों. मिस् कोठ्यांसारख्या खानदानी मिडवाइफचा गोविंदासारखा झक्क कुत्रा सार्जंटच्या गोळीला बळी पडावा ही कल्पना माझ्या जातिवत बिनबुडबुंधी रक्ताला जाळूं लागली. तसा गोविंदा जरा दांडगाई करी; पण अजून त्याला त्याच्या सद्गुणी मालकिणीचें वळण नीट लागलें नव्हतें म्हणून !

मिस् कोठे राहत होत्या त्या वाड्यांत मीं पाऊल टाकलें मात्र ! तों गोविंदा टपकन् आडवा येऊन गुर्रर्र गुर्रर्र करीत माझ्या पोटऱ्यांचा वास घेऊं लागला. मला पुढें जाववेना ! भ्यालों असें नाहीं. परंतु त्या वात्रटपणा करणाऱ्या गोविंदाला चार गोष्टी सांगून त्याचें आयुष्य वाढविण्यास आपण मदत करावी असें वाटलें. मी म्हणालों,

" गोविंदा ! अरे घागरियाच्या छंदा, एक पाय "...

" गुर्रर्र "

" अरे बाळ, दे ही संवय सोडून ! आतां तूं थोरामोठ्यांच्या आश्रयाला आहेस ! असं करूं नये ! "

" ह्यां ऽऽ ! ह्यॉं ऽऽ "

" गोविंद, अरे तूं शिवाजीचा वाघ्या, न्यूटनचा डायमंड अगर युनिव्हर्सलचा रिन् टीन् टीन् या विभूतींसारखा कीर्तिमान होणार ना ! मग असा हूडपणा करून कसं चालेल ?"

" व्हाऊ ऽऽऽ ! व्हाऊऊ ऽऽऽ ! गुर्र्रर्र !" आतां गोविंदानें झेंपच टाकली. मी जरा भारदस्त असल्यामुळें विचारा मला बिचकत असावा. त्याला माझ्यापेक्षां कोणीतरी मायाळू शिक्षक हवा होता. मी परतलों. गोविंदा उड्या मारीत मला घरापर्यंत पोंचविण्यास आला. अन् त्यामुळें मीही चटकन् घरीं येऊन ठेपलों !

" जिवा, आपल्या आळींत आलेला आणि एवढ्यांत अप्रिय झालेला पाहुणा तुला माहित असेलच ! "

आपले डोळे लाल झालेत कीं काय तें आरशांत पाहत असतां जिवा म्हणाला, " गोंद्या, साहेब ! "

" जिवा, हा असभ्यपणा होतोय् ! गोविंदा म्हण ! "

" चुकलों, गोविंदराव साहेब ! "

" जिवा, त्याला सार्जंटाकडून गोळी घालून ठार मारण्याचा कट झालाय् ! जिवा, आपण गोविंदवाले आहोंत; बिनगोविंदवाल्यांचा कट आपण हाणून पाडला पाहिजे. जा, आतांच्या आतां मिस् कोठे यांच्याकडे जाऊन धोक्याची खबर दे !"

" काय करायचं साहेब आपल्याला मध्यें ? "

" जिवा, तूं भेकड आहेस ! बिनगोविंदवाल्यांना घाबरतोस ! "

" नाहीं साहेब, जाईन मी ! "

" अन् हें बघ जिवा, गोविंदरावांनाही जरा दोन शब्द सांगितलेस तर बरं ! "

" जी साहेब ! "

दुपारीं जिवा आला. मुसक्या बांधलेल्या गोविंदरावांना घेऊन आला. सार्जंट येऊन जाईपर्यंत त्यांना माझ्याकडे खाजगींत ठेवून घेण्याविषयीं मला मिस्. कोठ्यांनीं विनंती केली होती. कटाची बातमी ऐकतांच मिस् कोठे आळीकरांवर पुष्कळ घसरल्या; परंतु शेवटीं बिचारी अबलाच ती !

माझ्यासारख्याच्या मदतीची याचना तिला करावी लागली. तिच्या एकुलत्या एक कुत्र्याची बडदास्त ठेवण्यास मी खंबीर होतों. एक नाहीं, पन्नास सार्जंट आळी झाडून झटकून गेले असते म्हणून हा टाटा घाबरला असता काय? छे! नांव नका काढूं! टेबलावर उभे राहून मीं गोविंदरावांचें सिंहावलोकन केलें. " मुसक्या कशाला?" असें विचारतांच जिवा म्हणाला, " आज त्यांचा मौनाचा दिवस आहे.!" गोविंदा वीसनखी असून रंगानें भुरकट होता. डोक्यावर टक्कल होतें, त्यावरून चांगला पंडित असावा. " गोविंद " म्हणून मीं हाक मारतांच नाक मुरडून, आंठ्या घालून एखाद्या जज्जाप्रमाणें पाहण्याची त्याला लकब होती. शिवाय "कस्टम"च्या इन्स्पेक्टरप्रमाणें प्रत्येक वस्तूची हुंगून तपासणी करण्याच्या कामांत तो वाकबगार दिसला. सतरंजीवर पडलेली पिवळ्या हत्तीची पेटी त्यानें आपल्या तोंडानें खिडकीबाहेर झोंकून दिली आणि माझ्याकडे बारीक डोळे करून तो पाहूं लागला.

" जिवा, उद्यांपर्यंत सिगारेट आणायची नाहीं, समजलास?"

" जी साहेब !"

" याला कांहीं पथ्यबिथ्य?"

" फक्त बदामाची लापशी नि चिरोटे द्यायचे, आणि दिवसांतून एकदा लोभ्यांतून सॅनॅटोजन !"

" जिवा, माझ्या कपाटांत त्याची व्यवस्था कर; अन् आज पाहुण्यांना मेजवानी म्हणून सगळ्यांना बदामाची लापशीच होऊंदे !"

" साहेब !"

आमच्या पाहुण्यानें जिवाला मात्र रडकुंडीला आणलें. त्याचें कण्हणें कुंथणें तर सारखें चालू होतेंच ! पण पोट साफ व्हावें म्हणून पाण्याबरोबर थोडा मॅग्नेशिया घातला त्याचा परिणाम भलत्या प्रमाणांत सुरू झाला; आणि दरवेळीं आपल्या अघोर कृत्यावर मातीचें पांघरून घालण्याच्या नादांत गोविंदानें माझ्या जमिनीला व भिंतीला ठिकठिकाणीं भगदाडें पाडलीं! मी जरा कुठें फडक्यांचें "प्रतिभासाधन" घेऊन लवंडलों, तें त्याला आवडलें नाहीं; कपाळाला आंठ्या घालून त्यानें नाक

मुरडलें, डोळे दटावल्याप्रमाणें केले आणि जांभई दिली ; थेट कृष्णराव मराठे. मीं पुस्तक टाकून दिले. मला गोविंदाबद्दल भीतियुक्त आदर वाटूं लागला आणि त्याच्या डोक्यावरील टक्कलाची सयुक्तिकता पटली! आमच्या मम्मु-आत्यास शोभेसें हें जनावर आहे खरें, ही कल्पना माझ्या मनांत चमकून गेली.

दुपारीं सार्जंट आला. बिनगोविंदवाले त्याच्याभोवतीं जमले. मिस कोठ्यांच्या घराची पाहणी करून सार्जंट बंदुकीची नळी हालवीत बाहेर आला. मी मनांतून खुदकत होतों. बिनगोविंदवाल्यांचीं तोंडें मोदकांसारखीं झालीं होतीं. "व्हेअर इज दि ब्रूट? यू फूल्स्?" असें विचारून सार्जंट गुरकावीत होता. सगळे बेटे गोंधळून जाऊन कावरेबावरे पाहत होते. संध्याकाळपर्यंत सार्जंटनें आमच्या गल्लींत चकरा घातल्या. तो आला म्हणजे मिस कोठे घाबऱ्या होत. पण मी खिडकींतून त्यांना डोळ्यांनीं खूप धीर देत होतों. इकडे आमच्या पाहुण्यांची रस्त्यावर जाण्याची मर्जी जोरावत होती. "कु ऊ ऊं ऊं, क्यॉऽऽ ऑ" असे आवाज कपाटांतून ऐकू येत होते. रात्रीं कपाटाच्या दारावर नखांचा खर्रर्र खर्रर्र असा आवाज होऊं लागला. "उद्यां तुझ्या मालकिणीची व तुझी भेट करवतों बरं, गोविंदा" असें त्याला आश्वासन देऊन मीं निजलों.

दुसऱ्या दिवशीं उठलों तों गोविंदाचे कपाट उघडें होतें. आपल्यापेक्षां लवकर उठण्याची त्याची संवय पाहून मी ओशाळलों. बहुतेक स्वारी शौचमुखमार्जन आटोपून चहाची वाट पाहत बसली असेल या समजुतीनें मीं हाक मारली, "जिवबा!" जिवा डोळे चोळीत आला. त्यावरून तो आतांच उठला असावा हे उघड होतें. मी जरा दटावण्याच्या उद्देशानें म्हणालों,

"जिवा, अरे त्या जनावराची अक्कल घे! तुझ्यापेक्षां लवकर उठण्याची त्याला संवय आहे. अरे बाबा, मोठ्यांच्या घरचं वळणच निराळं असतं!"

"साहेब, मला भीति वाटते. गोविंदा निघून गेला असावा!"

"आँ! काय म्हणतोस, जिवा? गोविंद झोपेंत चालत असेल?"

"छे साहेब; तो जागा होऊन गेला असावा," जिवानें व मीं मिळून घराचा कानाकोपरा शोधला; पण व्यर्थ! मीं जिवाला मिस कोठ्यांच्याकडे तपासासाठीं

पाठविला. बिचारा चमत्कारिक तोंड करून पतंगासारखा भुरकन् परत आला, अन् त्याच्या मागोमाग एक वावडी फडफडत आली.

" का हो ?" वावडी कडाडली.

" ओ: ! आ: ! व्हेरी सॅारी ! बसा ना मिस कोठेसाहेब ! " मीं खुर्ची पुढें करीत म्हटलें. पण छे ! वावडीला धस गेला. खुर्चीला चाट बसली. " बऱ्या बोलानं माझ्या गोविंदाचं काय केलंत तें सांगतां कीं नाहीं ? "

" असं पाहा, गोविंदराव कुठं गेले तें मला देखील माहित नाहीं. काल रात्री-पर्यंत व्यवस्थित इथं होते. पण सकाळीं उठल्यावर "......मी हुंदके देत व रुमाल डोळ्यापुढें धरून पुढें म्हटलें, " फार गुणी होते ते; मिळतां मिळायचीं नाहींत अशीं जनावरं. वाईट वाटतं ! "

" व्याईईट व्याटतं ऽ ऽ ? " कोठ्यांनीं वेडावून दाखविलें.

" हं: हं:, आपण टॅाकींत पदार्पण केलंत तर फार पुढं याल ! "

कोठे पुढें झाल्याच; पदार्पणही झालें; पण आमच्या " टॅाकींत " झालें तें ! "ओ: ! किडनॅपिंगची केस आहे. फरासखान्यांत देऊं का वर्दी ?" मी कोठ्यांच्या मेंदूला आफ्रिकन जंगलांतून कसब्यांतील माझ्या ऑफिसांत आणण्याच्या इराद्यानें विचारलें.

" पोलिसांत ? गोळीला बळी द्यायचा वाटतं माझ्या गोविंदाला ? अग बाईऽऽऽ गोविंदाऽऽऽ गोविंदा ऽ ऽ ऽ गोविंदा रे ऽऽऽ ! कोणी दुस्वास केला तुझा ऽऽऽ"

कोठ्यांचा पॅाइंट माझ्या लक्षांत आला ! बिचारी निर्गोविंद होऊन धाय मोकलीत होती. मीं टॅाकी पुन्हा सुरू केली !

" आपण मुळींच घाबरूं नका, मिस् कोठे ! पुणं पालथं घालतों नि गोविंदाला शोधून आणतों ! हं, आवरा पाहूं शोक आतां ! "

" पण तो जिवंत हातीं लागेल का ?"

" नाहीं तर त्याचा मुड......अचेतन देह आपणास सुपूर्द करीन याची खात्री बाळगा ! "

रुमालांत तोंड खुपसून उसासे व हुंदके टाकीत मिस् कोठे घरीं गेल्या.

वास्तविक कुत्र्याचा नाद मला मुळींच नसे. परंतु अंगीकृत कार्याच्या यशासाठीं मी फुटाणे खात पुण्यांतील कुत्रे पाहूं लागलों. कांहीं ठिकाणचे कुत्रे अतिशय सभ्यपणानें "घ्या बुवा पाहून कांहीं आहे का तें!" असें म्हणून शिष्टाचार पाळणारे, तर कांहीं

"ए जंगली, क्या देखते रहे इधर? चल निकाल!" म्हणून अंगावर येणारे असे दोन्ही नमुने पाहिले. कित्येक ठिकाणीं कुत्र्याच्या मालकांना माझा भलताच वहीम येऊन ते माझ्या देखत आपल्या मुलांना घरांत बोलावीत आणि कित्येक ठिकाणीं "हा साला डिटेक्टिव्ह" म्हणून आवाज हळू काढून बोलत. एवढें सहन करूनही मृत अगर जिवंत गोविंदा हातीं लागला नाहीं. मिस् कोठ्यांना चुकविण्यासाठीं रात्रीं निजानीज झाल्यावर घरीं आलों.

"जिवा, गोविंदा नापत्ता आहे; कोणी जादूनें त्याचा बोकड वगैरे तर केला नसेल ना?" जिवाच्या मांत्रिक सामर्थ्याचा उपयोग करून घेण्याच्या उद्देशानें मीं विचारलें.

"छे साहेब! जादूनें शिंगें नि दाढी उत्पन्न होत नाहींत, साहेब!"

"मग?"

"त्याला नदींत तर बुडवला नसेल ना?"

मीं टणकन् उडी मारली. त्या चहाच्या दुकानांतील शेवटच्या पात्राचें भाषण मला आठवलें!

"जिवबा! तुलाही इनर व्हॉइस् आहे हं! बरं, तें एकदां होऊन जाऊं द्या! इंजीनियरिंग कॉलेजच्या हॉस्टेलांत जाऊन बेटनला एक बोट उद्यां रिझर्व करायला सांग! अन् हें बघ, तूं वल्हं पाहिलं आहेस?"

"मला रोविंग येतं, साहेब! पंटा सांगूं!"

"छे, भितोस कीं काय? अरे, बेधडक सिंगल स्कल सांग! हुं, जलदी!"

त्या दिवशीं संध्याकाळीं मीं, जिवा आणि एक पोतें हळूच क्लबावर दाखल झालों. बेटननें काम केलेंच होतें. बोटींच्या तांड्यांतील आमची स्कल नाइकानें

दाखवून देतांच आम्हीं उतरलों. चांगल्या जागेवरही माझा पुष्कळ वेळां तोल जात असे, तर त्या नावेच्या हालत्या बुडावर पाय कसा ठरणार ?

"आहे बुवा जिवा ! प्रोग्राम तर बेफाम जमला हं ! " म्हणून मी बळेंच जिवाच्या खांद्यावर हात टेकले. परंतु माझें वजन कुठें आहे ते त्याला कळलें असलें पाहिजे. कारण तो म्हणाला, "खालीं बसा, साहेब. म्हणजे झेंपांडें जाणार नाहीं."

"एः ! माझा झोंक जाणार हं जिवा ! अरे, रिगाटयांत आम्हीं कप मारलेत आणि धांवत्या स्कलमध्यें शीर्षासनं घातलीं आहेस. तूं पडशील म्हणून धरलं तुला ! " मी ऐटींत तंगडया पट्टयांत अडकवून स्लाइडिंग सीटवर विराजमान झालों. वल्हीं फिरवलीं आणि जिवाला बोट ढकलण्यास सांगितले. मला वल्हें लाठीसारखें फिरविण्याची जरा खोड होती, ती त्या वेळीं नडली: उजवें वल्हें गेलें बोटीखालीं आणि बोट फूटभर वर उडाली. डावें वल्हें निसटलें आणि तुरुतुरू तरंगूं लागले. होडी पुन्हा खालीं आली, त्याबरोबर मी रेसघोडयाच्या जांकीसारखा सफै हायजंप मारून पाण्यांत पडलों ! बरें झाले, जिवानें पटकन् कोटाची बाही पकडली म्हणून ! नाहीं तर मम्मुआत्याचा हा लाडका टाट्......"

"जिवा ! आम्हांला करेल्यांसारखीं वल्हीं फिरवायची संवय झालेली ! हे काम त्या मानानं फारच हलकं आहे. रँग्लर परांजपे सुद्धा प्रीव्हियसला गणित शिकवतांना ल्याचरल, समजलास ! मी धरतों रडर ! तूं पाहूं बरं कसा रो करतोस तें ! "

जिवानें हळूच बोट मध्यावर काढली, "जिवा, नदीच्या उजव्या बाजूनंच जायचं हं आपल्याला. रूल आहे तसा ! "

"जी साहेब."

"अन् पलीकडे संगमाजवळ बाबूराव फिरतो हं ! " हा बाबूराव म्हणजे, भाडयानें उतारू नदीपलीकडे घेऊन जाण्याचा मोठा मचवा !

"आपल्या हातांत रडर आहे साहेब ! " जिवा म्हणाला.

" पण गोविंदाला पाहण्यासाठीं खोल पाण्यांत नजर द्यावी लागते, जिवा ! " बोटींत बसलं कीं नेहमींच मी शिंतोडे उडालेल्या झुरळाप्रमाणं फडफडून थरारत असे. मला कल्पना सुचत. पाठमोऱ्या बसलेल्या जिवाला मी नदीच्या नियमाचीं, आजूबाजूच्या देखाव्यांचीं, आकाशांतील ढगांचीं, आणि पर्णकुटीचीं सटीक वर्णनें ऐकविलीं. शेवटीं "पर्णकुटी" या शब्दाच्या व्युत्पत्तीची मीमांसा चालू असतां माझें विवेचन वाहवत चाललें. मी आतां मम्मुआत्याच्या सॉयकॉलजीपर्यंत येऊन थडकलों आणि म्हणालों, " जिवा, मम्मुआत्याचा स्वभाव कांहींसा या विद्युल्लतेप्रमाणं "......माझें वाक्य पुरें होण्यापूर्वीच " कडाड् खर्रर्र " असा मोठा आवाज झाला. एकदम दचकल्यामुळे जिवाचें एक वल्हें निसटलें; मीं वर पाहिलें; पाहतों तों आमची बोट दुसऱ्या एका कोऱ्या करकरीत बोटीच्या पोटावर चोंचा मारीत होती. या बोटींत साहेब होता. हाताच्या बाह्या वर सारलेल्या, तोंड कलिंगडाच्या खापीप्रमाणें झालेलें, त्या खापींत अडकलेल्या दोनच पिंगट बिया, पण सुदर्शन चक्रासारख्या गरगर फिरणाऱ्या, अशा थाटांत उंच वल्हें उगारून तो तोंडानें फार भयंकर आवाज करीत होता; त्याच्यासमोर एक आंग्ल युवती डोळे पांढरे करून फोनोच्या तबकडीवर हात टेकून आपल्या चंबूसारख्या तोंडांतून शिटीसारखा आवाज काढीत होती ! अशा प्रसंगीं काय करावें लागतें तें माझ्यासारख्या वकिलाला आणि त्याच्या जिवासारख्या बगलबच्चाला सांगावें लागत नसतें. क्षणार्धांत दोघांनींही लोटांगण घातलें. आतां मीं त्या साहेबाला पुरा ओळखला. मी हळूच म्हणालों,

" जिवा, अरे हा तर तो सार्जंट ! " पुढें भाषण करण्यास सवड झाली नाहीं. कारण डोक्याच्या पाठभिंतीस टप्पल बसली. शुद्धि आहे तोंपर्यंत निदान त्या गोऱ्या युवतीला तरी पोटभर पाहून घ्यावें म्हणून " पार्डन् मॅडम ! " म्हणत पुढें वांकलों, आणि एकदम आश्चर्यचकित होऊन गेलों ! डोळ्यांवर विश्वास बसेना ! बोटीच्या तळाशीं आणखी एक व्यक्ति ऐषआरामांत पसरलेली असून तिचा जबडा वासलेला होता. जिभेचा लोळ लळलळत असून रागीट मुद्रेनें कान फिरवीत ती व्यक्ति एक मोठी जांभई देत होती. खास गोविंदरावच ते ! मी धिटाईनें उभा राहिलों आणि एका सभ्य स्त्रीच्या कुत्र्याला पळवून नेल्याचा त्या

जोडप्यावर आरोप केला ! साजटाचें वल्हें खालींच यायचें; पण वल्हें तें वल्हेंच. कुठें तरी अडकण्याचा गुणच त्याचा ! मॅडमनें माझी हकीकत नीट विचारून घेतली आणि ती संपतांच गोविंदाला आलिंगन देऊन अर्धवट किंचाळत ती म्हणाली, "ओ ! माय पुअर विली ! व्हाय ? आल्बर्ट, यू वेण्ट टु शूट अवर ओन विली ! ओ ! हौ क्रुएल ऑफ् यू ?" यानंतर कोठयांनीं केलेलाच अभिनय सुरू झाला. शेवटीं आल्बर्ट ऊर्फ सार्जंटाने जेव्हां "बिलीव्ह् मी डार्लिंग, आय वुईल नेव्हर शूट ए डॉग् अगेन्" अशी खात्री दिली तेव्हां करुणरस संपून शिष्टरस सुरू झाला. गोविंदाला ऊर्फ विलीला माझ्या घरांत मीं मेजवानी दिल्या-बद्दल आणि त्याला वांचविल्याबद्दल मॅडमनें गोड शब्दांत माझे आभार मानले ! मी त्या वेळीं अद्‌भुतरसांत डुंबत असल्यामुळें तें गोड होते कीं नाहीं हें मला तेव्हां समजलें नाहीं. पण जिवानें मागाहून त्याबद्दल हमी दिली म्हणून मी म्हणतों. पुढें विलीची व माझी विधिपूर्वक ओळख करून देण्याचें काम झालें. विलीचा पांगारकरी नूर एकदम बदलला; डॉ. सप्रूंचें हास्य त्यांच्या तोंडावर चमकलें आणि नको नको म्हणतांच स्वारी माझ्या गळ्यांत पडली. आणि अशा प्रसंगास मी अनभिज्ञ असल्यामुळें पटकन् माझें मुटकळें पाण्यांत पडलें. नाक, तोंड व कानाच्या बाटल्या पाण्यानें भरल्या आणि मिस् कोठयांबरोबर आपण आकाशांत वरवर चढत आहोंत असा भास होऊं लागला.

दुसऱ्या दिवशीं जागा झालों तेव्हां चांगलीं उन्हें पडलीं होतीं. घड्याळांत पाहतों तों दहा वाजलेले ! अंग झटकून उठलों आणि खिडकींत उभा राहिलों. तों कोठयांच्या दारांतून भुंकण्याचा आवाज चक्क ऐकूं येत होता. पायरीवर एक बिनगोविंदवाला भयभीत मुद्रेनें धोतर सांवरीत होता. मीं हाक मारली "जिवा !"

"जी साहेब."

मीं त्याला आदल्या दिवशींची सर्व हकीकत सांगितली. त्यांत मी स्वतः बोट वल्हविली, जिवा घाबरला, वगैरे गोष्टी घुसडून देण्यास चुकलों नाहीं. शेवटीं मी म्हणालों,

"असं चमत्कारिक स्वप्न मला पडलं, जिवा ?"

" स्वप्न नाहीं साहेब ! आपल्या पोषाखाकडे जरा लक्ष द्यावं ! "

मी ओशाळलों. स्लाइडिंग सीटवर तेलानें काळी झालेली माझी दुखांबी ऊर्फ शॉर्ट अजून तशीच होती.

" हं, मग गोविंदा ऊर्फ विली त्या सार्जंटाचाच ठरला हं ? "

" मला वाटलंच होतं त्याचं नांव गोविंदा नसावं असं !"

" मग आतां कोठ्यांच्या घरांतून कोण भुंकतंय् ? "

" गोविंदा, साहेब ! "

" काय म्हणालास, जिवा ? "

" काल क्लबावरून येतांना एक काळा कुत्रा मिस् कोठ्यांना आणून दिला, साहेब. अठरा नखी आहे, पण कचरापेटीपाशीं कधीं जात नाहीं. त्याला फक्त दिवसा घरांतूनच भुंकण्याची संवय आहे, साहेब ! रात्रीं तुपाची फक्त एक वाटी पिऊन निपचित पडतो. डोक्याला टक्कल नाहीं. अन् एक दोन मुळे कमी आहेत. अन्नाशिवाय इतर कशाचाही त्याला वास येत नाहीं. मीं पुष्कळ आग्रह केला कीं, या नवीन कुत्र्याचं नांव 'भास्करपंत' ठेवा म्हणून. पण त्यांचं आपलं 'गोविंद'च खरं ! आपल्याला मिस् कोठ्यांनीं चहाला बोलावलं आहे, साहेब ! "

" काय म्हणतोस जिवा ? आमच्यावर कृष आहेत तर ! एक्सलंट ! पण अरे हो, जिवबा, ध्यानांत ठेव ! विली हें नांव विसरून जा साफ ! "

" गेलों, साहेब ! "

" तुला माहित आहे त्याचं कारण ? "

" होय, साहेब ! आपल्या घरांत परधर्मी पाहुणा जेवला हें मम्मुआत्याच्या कानांवर जातां कामा नये, साहेब ! "

- — — -

# शेवगांठ्या ! !



रात्रीं नुकताच डोळा लागला आणि कोणी दार ठोठावलें कीं माझें मस्तक भडकतें. त्या दिवशीं तस्सें झालें ! मी डोक्यावरून पांघरूण ओढून पांच मिनिटें दाद दिली नाहीं तरी दारावरच्या कड्या थांबेनात ! आजपर्यंत जगांत झालेले बरेचसे खून रात्रीं झालेले आहेत. " दार उघडतांच काळा बुरखेवाला आंत घुसतो आणि नायक अगर नायिकेच्यापुढें लखलखणारा खंजीर धरून त्याच्या अगर तिच्या तोंडांत बोळा देतो " इत्यादि रोमांचकारक ( कारण ते दुसऱ्यावर आलेले ! ) प्रसंग अलीकडच्या वाङ्मयांत प्रत्यहीं दृष्टीस पडत असल्यामुळें, आयुष्य टिकविणें हें एखादी मोठी इस्टेट संभाळण्याइतकें कठीण आहे, हे मी समजून चुकलों होतों. रात्रीचें दार उघडणें याच कारणामुळे जिवावर येतें. अर्थात् जिवाला मीं उठविलें आणि त्या निशाचराला घालवून देण्यास सांगितलें ! परंतु तें जमलें नाहीं. जिवाला बाजूला सारून निशाचर माझ्या खोलींत घुसलें. कोण आहे म्हणून पाहिलें तों बेटन ! अन् तोही ओझें भरलेल्या बैलगाडीसारखा उल्हाल झालेला !

" का रे बाबा ? " मीं विचारलें.

" अगोदर पाणी ! " गाऱ्यागाऱ्या भिंगोऱ्या करून आला होता जसा कांहीं ! जिवानें आणून दिलेलें फुलपात्र तोंडाला लावून तो मटकन् खालीं बसला !

" काय झालं तुला ? " मीं विचारलें.

" कर्म ओढवलं न् काय ! "

" म्हणजे ? "

" तुझी वहिनी आज मला घरांत घ्यायला राजी नाहीं. "

" ए: ! बायको ना ती यःकश्चित्. तूं तर स्वतःला ॲथलेट म्हणवतोस ! " बेटनचें खरें नांव बन्या; पण हेवी-वेट-चँपियनशिप्मुळें आम्हीं त्याला बेटन केलें होतें.

" सगळ्या बायका सारख्या नसतात, महाराज ! "

मम्मुआत्याची मूर्ति माझ्या डोळ्यांसमोर उभी राहिली, म्हणून त्याचें म्हणणें मला पटलें.

" बरं बुवा ! काढ एक रात्र कशीवशी ! " मीं सुचविलें.

" एक रात्र काढली असती, पण..."

" ऑं ? "

" मला खुनी वेडाची लहर आली आहे अशी तिची समजूत झाली आहे. तुला होमिसायडल मॅनियाक माहित आहे ना ?-बस्, तसंच. "

मीं गादीवरून ताड्कन् उडी मारली ! या जातीचे वेडे पहिल्यानें असेंच शहाण्याचें सोंग करतात अन् सावज कावूंत आलें म्हणजे एकदम मानगूट आणि वस्त्याशीं गांठ ! विशेषतः बेटनचा हात खिशांत गेल्याबरोबर आतां लवकरच आपल्या डोळ्यांसमोर तें भयंकर पातें चकाकणार असें वाटूं लागलें आणि माझ्या अंगावर कांटा उभा राहिला ! परंतु तसें कांहीं न होतां बेटनच्या हातांत हातरुमाल निघाला आणि त्यानें डोळे टिपण्याची क्रिया केली. मीं आतां त्याच्याजवळ गेलों आणि म्हटलें, " हं बेटा, प्रस्तावनेपासून आरंभ कर पाहूं एकदा ! "

" तिचा भाऊ व्यंक्या, " बेटन म्हणाला, " काल आमच्याकडे आला. इथल्याच एका विड्यांच्या कारखान्यांत असतो. दुसऱ्या एका कामगारान आणलेल्या शेवगांठ्या यानं चोरून खाल्ल्यामुळं नोकरी सुटली अन् आमच्याकडे पुख्खा सुरू झाला. त्याचा आहार पाहून मी थक्क झालों. एखादा हत्ती पोसायला देखील परवडेल असं मला वाटून मीं हिच्याजवळ हळूच गोष्ट काढली. पण, "वाटल्यास तुम्हींच करा उपासतापास ; माझ्या भावाचं अन्न काढण्याचं काम नाहीं, " असा स्पष्ट जवाब मिळाला. तो आल्यापासून घरांत

दिवाळी आल्यासारखं वाटत आहे. तुला आठवत असेल ती कविताः “ हाता काम नमे·परंतु पडतें तोंडांस तें फारसें ! कोणा भार नसे परंतु अवघ्या शिंक्यांस भारी असे ! इ.” ! या उच्छादाला मी कंटाळलों. त्यांतून आज रात्रीं व्हरांड्यांत बसलों तों हिनं आपल्या बंधुराजांचं लीलामृत मला ऐकवण्यास सुरवात केली ! माझ्या तोंडावर उत्पन्न झालेलं वादळ तिला दिसूं नये म्हणून मीं दिवा बाहेर नेऊन ठेवला होता आणि तिच्या टकळीला नुसता हुंकार देत होतों. ती म्हणत होती, “ ऐकलं का ? हल्लीं पारखच नाहीं कुणाला माणसाची ! हाच व्यंकट कि नी, मागच्या पिढींत असता, तर टिळकांनाही पुढं येऊं देता ना ! ”

माझा राग आतां मात्र अनावर झाला. “ कोण ? हा दुष्काळांतून ओढलेला भीकमाग्या ? ” हे शब्द अगदीं माझ्या ओंठावर आले होते, पण तितक्यांत पलीकडच्या कोंपऱ्यांत कांहीं हालचाल झाली. मला वाटलें ऊद (एका जातीचे मांजर) असावा. म्हणून काठी घेतली आणि त्याच रागाच्या अवसानांत दिला एक टोला ठेवून ! तों काय आश्चर्य ! उदाला वाचा फुटली आणि “ अयाई ऽ ऽ मेलों मेलों ” अशा आरोळ्या मारीत ते लोळूं लागलें. दिवा घेऊन पाहिलें तों व्यंक्या ! त्याच्या नवीनच हजामत केलेल्या डोक्यावर एरंडाचें पान असून त्याने आपले हात त्यावर दाबून धरले होते आणि पंचामुळें उघडे राहिलेले पाय हवेंत फिरवीत तो लाडाने उताणे पडलेल्या कुत्र्याचीच नक्कल करीत होता. तोंडानें, “ ठके, अग, कराला ग हा तुझा नवरा ! निव्वळ पोळ आहे ! कांहीं माणुसकी आहे का त्याला ”...इत्यादि शिव्यामिश्रित बडबड चालू होती. तिने दिवा खालीं ठेवला, ओंचे खोंवले आणि हातांत कायसेंसें घेऊन आली. बहुधा चिमटा असावा.

“ होतां कीं नाहीं बाहेर अगोदर ? निर्ढावलेल्या मवाल्याप्रमाणं माझ्या घरांत ही दांडगाई ? चला, निघतां कीं नाहीं ?” याप्रमाणें सरबत्ती सुरू होऊन माझ्या-समोर चिमट्याचे हात फिरूं लागले. मीं मुकाट्यानें रिव्हर्स घेतला, टोपी चढवली आणि बाहेर आलों. शेवटचा प्रयत्न म्हणून मीं हलक्या आवाजानें म्हणालों, “ हे बघ, माझं जरा ऐकून घेतेस का ? अंधारांत मला वाटलं ऊद-

मांजर "...पण छे ! तिनें दिवा पुढें करून माझ्या तोंडाकडे चमत्कारिक रीतीनें पाहिलें आणि आपल्याशीं ती म्हणाली, "काय ग बाई या वेडाच्या लहरी ? दुसरी एखादी असती, तर कांहीं निभाव लागता ना ! "

" अग, जरा ऐकून घे. मला वेडबिड......" माझें वाक्य पुरें होण्यापूर्वींच दरवाजाला आंतून कडी लागली.

बेटनवर कोसळलेल्या संकटाची आतां मला जाणीव झाली. बराच वेळ आढयाकडे पाहिल्यावर मीं सुचविलें, "उद्यां आपण या तुझ्या व्यंकटलाच बनवू जरा, आणि त्याच्यामार्फत वहिनींकडे तुझी कैफियत गेली कीं काम फत्ते ! "

" कोण व्यंकट ? " बेटन म्हणाला, " तो कसचा माझ्याशीं सरळ बोलणार ? मीं खाऱ्या पाण्याचा आहें असं मला नेहमीं उघड उघड हिणवतो तो ! "

मीं जिवाला बोलावून, सर्व वृत्तांत निवेदन केला आणि विचारल, " मग जिवा ? "

" रात्रीं आपण हळूच घरांत शिरून व्यंकटरावांना धाकदपटशा दाखवावा म्हणजे त्यांच्याकडूनच काम होईल, साहेब ! "

" छे ! " बेटन मध्येंच म्हणाला, " ते शक्य नाहीं. तो चक्रम् सगळ्या खिडक्या लावून निजतो. दोन दिवस आमच्या घरांत आंब्यांची आढीच घातलीय् जशी कांहीं ! "

जिवानें डोकें खाजविलें. त्यांतलें एंजिन विझलें हें मी समजलों. त्यानेंही आडपडदा न ठेवतां सुचविलें,

" आतां निजावं, साहेब ! उद्यांपर्यंत कांहीं इलाज सुचलाच तर पाहतों. बेटनसाहेबांचं अंथरूण तयार आहे ! "

सकाळीं चहा झाल्याबरोबर जिवा म्हणाला, " आपण स्वतः एकदा बेटन-साहेबांच्या घरीं जाऊन यावं, साहेब ! "

" जिवा, संकटाचं स्वरूप कोणतं आहे तें लक्षांत घेतलंस ना ? "

" आपण पुण्याचे लढवय्ये आहां, साहेब ! मुलुखमैदान, झामझामा इत्यादिकांना दाद न दिलेल्या पूर्वजांचे वंशज आहांत. "

" खरंच जिवा, गोड्या पाण्याचा आहें मी ! "

" मग चला, बेटन. "

पण जिवा मध्येंच म्हणाला, " बेटनसाहेब नकोत. ते आले तर वहिनीसाहेब दार उघडणार नाहींत. "

" अरे, खरंच कीं ! " म्हणून उठलेला बेटन खालीं बसला.

जिवा आणि मी बेटनच्या घरीं जाऊन पोंचलों. वरच्या खिडकींतून आमच्या-वर एकदा नजर टाकून मग वहिनींनीं दार उघडलें. घरांतून वसकन फ्लीटची घाण आली. वासाचा रुमाल नाकाला लावीत मीं विचारलें,

" बेटन आहे का ? "

" कालच केलंय् काळं घरांतून ! " त्या फणफणल्या. तट्टूं बरेंच भडकलेलें दिसत होतें !

" म्हणजे, पण बरा आहे ना तो ? "

" त्यांना हो काय धाड आली आहे ? खाऊन मस्ती आली आहे. सांगायचं तरी काय असं होऊन जातं. "

" कांहीं भयंकर प्रकार तर झाला नाहीं ना, वहिनी ? "

" होणार होता ! काल नसतं त्यांना घराच्या बाहेर काढलं, तर दारांत खूनच पडले असते, समजलांत ?"

" च्यक् ! च्यक् ! " एवढें करण्याचें कर्तव्य होतें तें करून आम्ही निघालों.

" भाउजी, थांबा ना जरा ! आमचा व्यंकट आलाय् सध्या. त्याला बोलावतें. " असें म्हणून वहिनी आंत सटकल्या. थोड्या वेळानें तेथें एक व्यक्ति आली व त्याबरोबरच खोलींतल्या फर्निचरला शोभा आली. शिशवीच्या पॉलिश केलेल्या स्टुलावर पांढरें फ्लॉवरपॉट ठेऊन त्यांत हिरवीं पानें खोंचावीं त्याप्रमाणें या काळ्याभोर व्यक्तीच्या करड्या रंगाच्या गोटयावर, हिरवेंचार एरंडाचें पान मोठें शोभिवंत दिसत होतें. " या व्यंकटराव, " असें म्हणून आम्हीं नमस्कार केला. व्यंकटराव हसले. हसले म्हणजे काय, हनुवटीखालचें बटाटयाचें पोतें जरा उटंटळ

झालें ! विडया वळण्याच्या नेहमींच्या सरावामुळें त्यांचीं बोटें वळवळत होतीं, कीं तो वायूच्या झटक्याचा परिणाम असून त्याचा फायदा विडया वळण्याकडे करून घेतला जात असे व अशा रीतीनें वाईटांतून चांगलें निघत असे कोणास ठाऊक ! आम्ही खुर्च्यांवर टेकतांच ते म्हणाले, " आपण बन्याबापूंचे स्नेही म्हणून ठकीनं सांगितलं. कुठचे राहणार ? "

" इथलाच; पुण्याचाच ! "

" प्पच्ऊऊच् हॅं हॅं ? " व्यंकटरावांची दंतपंक्ति याबरोबरच प्रगट झाली. अर्थात् ती तहाची निशाणी होती यांत शंका नाहीं. मीं नेटानें विचारलें, " बन्याबापूंनाच भेटायला आलों होतों. पण वहिनींनीं कांहींच्या कांहींच सांगितलं ! "

" नाहीं हो, खरंच झालं तसं; एकाएकीं झटका आला न् जे उठले दांडगाई करीत, कांहीं विचारूं नका ! "

" हं: ! चमत्कार आहे मोठा ! "

" चमत्कार कशाचा आलय् ? मुंबईच्या या लोकांचीं डोकींच हीं अशीं उथळ झालेलीं. केव्हां फिरतील याचा नेम नाहीं. मी सांगतों तुम्हांला हें ल्युनॅटिक असायलम् नांवाला पुण्याला आहे. बाकी बहुतेक भरणा यात मुंबईच्याच माथे-फिरूंचा आहे. डोकं म्हणजे कसं पाहिजे—" आपल्या डोक्यावर टिचक्या मारून त्यांतून भांडयासारखा आवाज काढून दाखवीत ते पुढें म्हणाले,

" हॅं ! असं खणखणीत पाहिजे ! प्चूच् ऊ ऊच् हॅं हॅं हॅं ! "

मी गंभीर चेहरा करून म्हणालों, "तर मग बन्याबापूंचा शोध करून त्यांना इस्पितळांत ठेवायची व्यवस्था करणं प्राप्त आहे. बाहेर त्यांनीं कुणाचं कांहीं नुकसान केलं तर कायदेशीर रीत्या त्याची जबाबदारी......"

" जहान्नममें जाने दो ! " व्यंकटराव उसळून म्हणाले, " डोंबलाचे घेऊन बसलांत कायदे ! आम्हांला नाहीं लागत असलीं कायद्याचीं लफडीं !"

" होय, पण तुमच्या हिताकरतां त्यांना इस्पितळांत पोंचवायला हवेत !" जिवा म्हणाला.

" पुष्कळ वेड्यांचं असं होतं, कीं कांहीं ठराविक माणसं त्यांच्या दृष्टीसमोर आलीं, कीं त्यांची लहर भडकते आणि मग वाटेल तें करायला धांवतात; आपण, किंवा वहिनीसाहेब बाहेर हिंडणारच, तेव्हां सुरक्षितपणा..."

" हां हां, तें एक आहे खरंच पाहणं ! मग चला आपण जाऊं बरोबरच ! " व्यंकटरावांना पुढें घालून आम्हीं निघालोंच.

" व्यंकटला संभाळून आणा बरं का, भावजी." म्हणून दारापाठीमागून वहिनींची जाहीर सूचना आलीच.

आम्हीं रगड भटकलों. व्यंकटरावही वाटेनें पुष्कळ बहकले. त्यांनीं आपल्या आयुष्यांत किती कर्तबगारी केली, परंतु चुकून त्या सर्वांचें श्रेय दुसऱ्याकडे कसे गेले याचा त्यांनीं यथेच्छ विस्तार केला. जिवा मध्येंच म्हणाला, "पुण्याच्या लोकांचं हेंच तर वाईट होतं. नाहीं तर तसे..."

त्यावर व्यंकोबा म्हणाले, "कां रे बुवा ? तूं मुंबईकर दिसतोस. अरे, दीड-शहाण्या, वाईट काय होत त्यांत ? आपण अन्न खातों तें आपल्या लठ्ठपणासाठीं; दुसऱ्याच्या नव्हे. तशी आपली कर्तबगारी आपल्यासाठीं. लोक आपल्याला ऐदी म्हणतील ! म्हणूं देत अक्कलमंद × × ! "

जिवा किंचित हंसून म्हणाला, " लोकांना दिसतं तेवढ्यावरच त्यांचा विश्वास बसतो, साहेब ! "

" दिसायला रे काय कमी आहे ? आतां आमच्या बापजाद्यांनीं अष्टीच्या क्षेत्रावर तरवारी चालवल्या, वस्तरे नाहींत, हें काय या षंढांना दिसत नाहीं ? "

" पण हट्टच मुळीं हाडीमार्सी..." हत्यारांचें वाग्युद्ध सुरू झालेलें पाहून मीं सुचविलें, " का हो व्यंकटराव, बऱ्याबापूंनीं जीव तर दिला नसेल ना ? "

एकदम जरी नाहीं, तरी हळूहळू व्यंकटरावांच्या निगेटिव्हवर भीति डेव्हलप होऊं लागली. त्यांतून जिवानें हायपो टाकला.

" हो, या मुंबईच्या माणसांचा कांहीं नेम सांगतां येत नाहीं ! "

गोठ्याला आग लागली असतां दाव्यास जखडलेल्या बैलाचा चेहरा जसा होतो, त्याप्रमाणें क्षणार्धात् व्यंकटरावांचा चेहरा दिसूं लागला आणि चार पावलें आम्हीं गेलों नाहीं तोंच ते थबकून म्हणाले,

"ट् ट् ट् टाटासाहेब, काय नाशिबांत आहे ठकीच्या कुणाला ठाऊक ! हें पाहा म–म माझी किनी ज–ज जीभ ओढतेय अ–आंतून."

जिवानें लगेच व्यंकटरावांच्या बगलेंत हात दिला आणि आम्हीं मथुराभुवनांत चढलों. मी तीन लोटी दुधाची ऑर्डर देणार, इतक्यांत व्यंकटराव प्रसंगाचें महत्त्व जाणून मोठ्या धीरानें म्हणाले, "मला दोन लागतील हां ! आमचं काम म्हणजे असं नाजुकमोजुक नाहीं. हो, पोटांतलं तीस हॉर्स पॉवरचं यंत्र चाललं पाहिजे ना ? " मीं ऑर्डर बदलली आणि हळूच सूचना केली,

" मला वाटतं आपलं पोलिसांत कळवावं ! "

"चाललांत का पुन्हा आपल्या कायदेबाजीवर. बऱ्याबापूंना कांहीं बरंवाईट झालंच तर पोलिसाचा बाप देखील कांहीं करूं शकणार नाहीं. बरं, सुरक्षित असेलच तर ते कांहीं सटेफटिंग नाहींत ! सृष्टिक्रमाचा जोर केव्हां तरी होणारच ! एकदोन दिवसांतच दिसतील पहा घराच्या आसपास ? " व्यंकटरावांनीं एकदोन दिवसांची मवड कां सांगितली तें जिवानें बहुतेक ओळखलें असावें. कारण तो जरा खोंचून म्हणाला, " हो हो साहेब ! पुष्कळ गोष्टी नैसर्गिक रीतीनं होतातच ! "

व्यंकटरावांनीं टोपी काढून ठेवली, एरंडाचें पान सारखें केलें आणि चूळ भरून लोट्यांची वाट पाहत बसले. लवकरच लोट्या आल्या आणि आम्हीं गरम दूध घशाखालीं ढकलूं लागलों. व्यंकटरावांच्या घशांतून निघणारा " घुटक् घुट " आवाज स्पष्ट ऐकूं येत होता. आतां स्वारीचा तळीराम एकदां गार झाला म्हणजे मुख्य प्रश्न उपस्थित करावयास कांहींच हरकत नाहीं या विचारांत मी गुंतलों. इतक्यांत व्यंकटरावांच्या हातांतली लोटी खालीं पडली, डोळ्यांच्या कवड्या दिसूं लागल्या आणि तोंड चमत्कारिक रीतीनें वांकडें झाल्यामुळें जीभ बरीच बाहेर आली ! मी दचकून उठलों आणि आश्चर्यानें विचारलें, " काय झालं हो, व्यंकटराव ? " जणूं काय शेंडीला आग लागली आहे अशा आविर्भावानें डोक्या-कडे बोटें दाखवीत ओरडूं लागले, " टाटासाहेब, तें बघा हो ! ! अहो, काढा ना लवकर ! हा, हा भयंकर प्राणी ; दिसत नाहीं का तुम्हाला ? "

" कुठं काय आहे ? " मी म्हणालों. पण जिवानें टिचकीनें त्यांच्या डोक्यावरून उडविलेला तो प्राणी झर्रर्र फर्रर्र करीत समोरच्या बांकावर उपस्थित झाला. टाणकन् उडी मारून महात्मा व्यंकटराव दुकानाच्या बाहेर झाले आणि धोतर झटकूं लागले ! तेथें गोळा झालेल्या भुवनांतल्या छोकऱ्यांनीं एकच गिल्ला केला आणि बांकावरील झुरळाच्या मिशा धरून त्यांनीं तो प्राणी बळेंच व्यंकटरावांच्या दिशेला झोंकला. व्यंकटराव उघडेबोडके पळत सुटले आणि त्यांनीं थेट घराकडे मोर्चा वळविला. आम्हीं पैसे देऊन बाहेर आलों.

" जिवा, चांगला लेकाचा ठिकाणावर येत होता ; पण झुरळानं प्रकरण बिथरलं ! "

" बेटनसाहेबांचा तपास करायला पोलिसांत कळवूं कीं नको ते वहिनीसाहेबांना विचारावं म्हणजे प्रकरणाचा निकाल लागेल, साहेब ! "

" एक्झॅक्टली ! "

घरीं जातांच बेटनला मी आमच्या मोहिमेची सविस्तर हकीकत सांगितली आणि त्याच्याच सल्ल्यानुसार एक चिठ्ठी लिहून बेटनच्या घरीं पाठविली. चिठ्ठीचा परिणाम आपल्या सौभाग्यवतीवर काय होतो तें पाहण्यास बेटननें जिवाला सांगितलें. जिवा हळूच चोरट्यासारखा बाहेर पडत असतांना मीं त्याला हटकलं,

" जिवा, खिशांत काय आहे ? "

" पुडी, साहेब ! "

" कशाची ! "

" शेवगांठ्या आहेत, साहेब ! "

" ए: ! आँ ? शेवगांठ्या ? "

" खायला, साहेब ! "

" असं असं ! व्यंकटरावांना खुष करायचं ! दुसरा प्रयत्न ! होय ना ?"

" ए इ-झ्याटलें साहेब ! "

" जिवा, नीट समजून घेतल्याखेरीज भलतंच बोलत जाऊं नकोस ! "

" चुकलों साहेब ! "

जिवा बऱ्याच वेळानें परत आला.

" काय झालं रे ? बर्फाचा खडक कांहीं वितळतो काय ? " बेटननें उत्कंठेनें विचारले.

" असं वाटतं, साहेब ! "

" काय म्हणाली ती ? "

" रात्रीं नऊ दहा वाजतां ये. तोंपर्यंत विचार करतें असं म्हणाल्या, साहेब ! चेहरा जरासा उतरल्यासारखा दिसला, पण पहिल्यानं म्हणाल्याच..."

" बोल बोल, अडखळतोस कां, जिवा ? "

" डोकं फिरलेलं माणूस मेल्यासारखंच आहे, असं म्हणाल्या ! " जिवा मुकाट्यानें निसटला आणि संध्याकाळपर्यंत बेटन विचार करीत होता तेथेंच बसून राहिला.

रात्रीं नऊ वाजतां "नेचर" सर्व गोष्टी आपल्या हुकुमांत घेऊं लागलें. जिवा-बरोबर स्वतःच्या घरीं जाण्यास बेटन अधीर झाला. त्याला सिनेमाची लालूच दाखवून पाहिली. चालू शोविषयीं पुष्कळ अभिप्राय कल्पनेनें रचून सांगितले; पण व्यर्थ ! त्याची सगळी त्याच्या स्वतःच्या समजुतीवर भिस्त.

" आतां बर्फ वितळेल असं आपलं मला वाटतं, " असे तो म्हणत सुटला. मोठ्या पंचायतीची गोष्ट ! शेवटीं मुकाट्यानें कोट घातला, टॉर्च घेतली आणि त्याला पोंचता करण्यास निघालों.त्याच्या घराजवळ गेलो तों निजावयाचे खोलींतील दिवा लागलेला दिसला; त्यावरून वहिनींची निजायचीच तयारी चालू असावी असे वाटलें. या खोलींत कांहीं तरी धडपड चालली असावी. कारणीं खुर्च्या–टेबलें उलथींपालथीं करावीं, त्याप्रमाणें आवाज ऐकूं येत होते आणि खिडकीच्या तावदानावर वहिनींची सावली निरनिराळ्या पोझेसमध्यें चारपांच वेळां पडली. पुढें वहिनी एकाएकीं हाका मारूं लागल्या " व्यंकट, अरे व्यंकट ! धांव रे बाबा, हें इकडे बघ कांहीं तरी उडतंय् माझ्या खोलींत-अग आइ ग–अरे–थांब हो गुलामा,

सडकतेंच तुला चांगला–अयाई ई, व्यंक्या, ऐकूं येतंय् कीं नाहीं तुला ? ऊठ ना मग !"

दुसऱ्या खोलीचा दरवाजा हळूच उघडल्याचा आवाज ऐकूं आला. व्यंकटरावांनीं विचारलें, " अग, काय हे ठके ? झालं तरी काय ? का तुझ्याही मस्तकांत किडा वळवळूं लागला ? अँ–काय म्हणतेय्–काय आलंय् ? तें होय ? बाप रे ! त् त् तें–झ–झझु-र–ळ ? हु: हु: हु: " दार धाड्दिशीं लावल्याचा आवाज ऐकूं आला. पुन्हा वहिनीसाहेब किंचाळूं लागल्या, "अरे, व्यंक्या मेल्या ! तुझीही वळ्ळी का बोबडी–दाई ग ! आतां कोण वाई मारणार या उडत्या जनावराला ? फ्लीटचा डबा तरी देतोस का तेवढा ? ई ई ई काय मेला उडतोय् सैरावैरा ? च्च् ! आतां हे असतें घरांत तर एकेकांना दाखविली असती वाट; पण म्हणतात ना, आधीं गडगडतं नि मागून पड पड पडतं ! मला काय बाई कल्पना हा व्यंक्या इतका भागुबाई असेल अशी ?... अगो बया ! इकडे हे आणखी दोन दिसताहेत् अन् सगळे उडताहेत्–कीं इ इ इ इ ई ई ई... " दार उघडल्याचा आवाज आला आणि वहिनी केस व लुगडें झटकीत, किंचाळत बाहेर आल्या ! !

पुन्हा निसर्गानें उचल खाल्ली. बेटननें पंख थरारल्याप्रमाणें खांदे उडवले आणि हातांत चप्पल फडकावीत तो पुढें झाला—

" हं, चल पाहूं आंत; पाहतों एकेकाचा समाचार ! " निसर्गाचा जोर म्हणावें याला ! कारण या वेळीं वास्तविक बेटनची भूमिका डोकें फिरल्याच्या दृष्टीनें विशेषच उठावदार दिसत असूनही वहिनी रडकुंडीच्या आवाजानें म्हणाल्या, " खरंच का आपण आलांत ? अग बाई ! " पुढचा कार्यक्रम आटोपण्यासाठीं ते जोडपें आंत गेले आणि लागलेल्या दारापाठीमागून. " फटाफट " आवाज व " चुकलें हो मी काल, आपल्या पायाची शपथ..." इत्यादि शब्द या दोहोंचें गोड मिश्रण आमच्या कानावर आलें. खिडकी उघडून बेटन पडदा सरकावूं लागला. वहिनी अर्थातच फर्निचर लावण्यांत दंग झाल्या होत्या.

" वुइश यू गुड नाइट, टाटा ! " बेटन म्हणाला.

" ऑ: ! गुड नाइट ! "

आम्हीं परतलों.

" जिवा, एक पोएटिक आयडिया सुचली बुवा ! "

" साहेब ! "

" विमानामुळं लढाया झाल्या ! पण या छोट्या विमानामुळं तह झाला. झुरळ उडत येतांना विमानाप्रमाणं येतं तें पाहिलंच असशील तूं ! अशीं एकदम उत्पन्न होणारीं झुरळं उपयोगी ठरतात हं ! "

" एकदम नाहीं आलीं, साहेब ! आपल्या घरचींच आहेत तीं ! "

" काय म्हणतोस, जिवा ? आपल्या घरचीं झुरळं इतकीं हुशार आहेत ? "

" माझा खिसा भेटला त्यांना म्हणून झालीं, साहेब !"

" जिवा ? "

" दुपारीं मी "शेवगांठया" नव्हत्या आणल्या साहेब !" जिवा मिस्किलपणे हंसत म्हणाला. शेवगांठया म्हणजे काय हें ध्यानांत येतांच मीं चकित होऊन वेचारलें,

"अस्सं ! पण जिवा, तुला काय माहित कीं वेटनची ही झांशीवाली झुरळांना भीत असेल म्हणून ? मला देखील ठाऊक नव्हतं ! "

" निसर्गाचा जोर केव्हां केव्हां होतोच, साहेब ! मथुराभुवनांतलं व्यंकटराव-वेरुद्ध-झुरळ प्रकरण आठवतं ? "

" समजलों, जिवा. वहीणभाऊ—एकच रक्त, म्हणून चान्स् घेतलास, असंच कीं नाहीं ? "

---

# गुंड–नाना



डॉक्टर केव्हां काय सांगतील याचा नेम नाहीं. माझ्या एका डॉक्टरमित्रानें भुंगा चावल्यामुळें लूत लागते असें सांगितल्यापासून हत्ती मुंगीला भितो त्याप्रमाणे मी भुंग्याला भीत असतो. त्या दिवशीं सकाळीं ज्ञानप्रकाश वाचीत पसरलों असतां माझ्या खोलींत एकाएकीं एरोप्लेनसारखा आवाज होऊं लागला : दचकून वर पाहिलें तों भुंगा ! मी झर्रकन् भुईसरपटत खोलीच्या बाहेर सूर मारला आणि श्वास मोकळा होतांच जिवाला हाक मारली, " जिवा, अरे त्या भुंग्याची वध भुं भुं चालू आहे. वाचायला सुचत नाहीं ! "

" जी साहेब ! "

माझ्या खोलींतून थोडा वेळ जिवाचा आणि वस्तूंची उलथापालथ झाल्याचा आवाज आला. " मधुकर वनवन... " हें पद मी स्वतःशीं गुणगुणूं लागलोंच होतों. भुंग्याला बाहेर घालविल्याचें जिवानें येऊन सांगितलें तेव्हां मीं परत खोलींत जाऊन ज्ञानप्रकाश उचलला. तेवढयांत, गंधर्वांच्या विद्याहरणाची जाहिरात माझ्या नजरेस पडली. मी योगायोगाभ्यासु असल्यामुळें हें नाटक पाहण्याचा बेत केला, आणि जिवाला एक कडेची खुर्ची रिझर्व करण्यास सांगितली. पात्रें स्टेजवर येण्यापूर्वी विंगांत काय करतात तें पाहण्याची मला हौस असल्यामुळें कडेच्या खुर्चीबद्दल माझा नेहमीं कटाक्ष असे. शिवाय लघवीच्या पासावर वारंवार बाहेर पडण्याची आवश्यकता, हेंही त्याला दुसरें बलवत्तर कारण होतें.

आमचा टांगा वेळेवर थिएटरपाशीं दाखल झाला. जिवाला पीटांत बसवून देऊन मी आपल्या नंब्राच्या खुर्चीवर जाऊन बसलों. पहिला प्रवेश सुरू

झालेला होता. मी बसल्यानंतर सरासरी पांचच मिनिटांनीं क्षय आणि वृद्धि यांची निसर्गभिन्न जोडी आमच्या रांकेपाशीं येऊन ठेपली. वृद्धि सोंवळी असून लाल शालजोडी पांघरलेली आणि अंगानें अगडबंब होती. क्षय–एक सडपातळ, कुरळ्या केसांची नीटस बांध्याची तरुणी! त्यांची कुजबुज होतांच इकडून तिकडून नेहमींप्रमाणें शुक् शुक् च्च् च् व्हायचें तें झालेंच. नंबर पाहतां पाहतां तरुणी एका खुर्चीसमोर उभी राहिली. या खुर्चीवर खाटकी चेहऱ्याचा, लाल-भडक तोंडाचा, रॅंग्लर छाप मिशांचा एक फेटेवाला गृहस्थ बसला होता. आपल्या जवळचें तिकिट काढून तरुणी गोड आवाजाने म्हणाली, "हा नंबर आम्हीं रिझर्व् केला आहे."

पोटांत एकदम मुरडा व्हावा त्याप्रमाणें चेहरा करून फेटेवाल्यानें आपलें तिकिट काढलें, त्यावरील नंबर तिला दाखविला, आणि खुर्चीच्या पाठीकडे बोट केलें. ओठ वांकडे करून कांहीं तरी चमत्कारिक आवाज काढून गृहस्थ पुन्हा स्टेजकडे पाहूं लागला.

आतां शालजोडीवाली पुढें सरसावली आणि वरपासून खालपर्यंत त्या गृहस्थाला न्याहाळीत म्हणाली, "अहो, आम्हीं नेहमीं येणाऱ्यापैकीं का आहोंत? आमचा घारू आहे पोलिसांत इन्स्पेक्टर, त्यानं दिलान् पास म्हणून आलों आज नाटकाला! आतां तो इथं असता म्हणजे..." "शुः शुः श्शु!" वरतून खालतून मागून पुढून आवाज झाले. रस्त्यावरून जाणाऱ्या आपल्या प्रतिस्पर्ध्यावर गुरगुरणाऱ्या कुत्र्याला तिऱ्हाइतानें "हुड्" म्हणावें, त्याप्रमाणें वरील आव्हानाचा परिणाम झाला. शालजोडींतला चष्म्याचा चेहरा जोंधळ्याच्या लाहीसारखा फुटूं लागला! "काय रे मेल्यांनों, सारखं शुक् शुक् चाललंय्? का तुम्हींच तेवढे नाटक पाहायला आलां? अन् आमचा काय तमाशा......" शुः श्श्श्शु! पहिल्यापेक्षां जोरानें आवाज झाला. असल्या म्हाताऱ्यांच्या घारूसारख्या छप्पन्न पोलिस इन्स्पेक्टरांची तमा न बाळगणारे प्रेक्षक ते! अन् तो फेटेवालाही त्यांतलाच. दुसऱ्या श्शुला त्यानेंही मदत केलीच होती. शेवटीं ती तरुणी पुन्हा एकदां आपल्या गोड आवाजानें म्हणाली, "जाऊंद्या अंबामामी! आपण पाहूं दुसरीकडे!"

हीच ती आणीबाणीची वेळ! अशा वेळीं बिनवुडबुंध स्वस्थ बसेल काय! छट्! मी तडक त्या फेटेवाल्याजवळ गेलों आणि तिकिटमास्तराच्या थाटांत चुटक्या वाजवीत फर्माविलें,

" मिस्टर, मुकाटयानं उठतां कीं नाहीं त्या जागेवरून ? "

पूर्वीपेक्षांही जोराचा वणवा पेटल्याचीं स्पष्ट चिन्हें त्याच्या तोंडावर उमटलीं, आणि त्यानें मघाच्याच अभिनयाची पुनरावृत्ति केली; खरोखरीच खुर्चीवरचा आणि त्याच्या तिकिटावरचा नंबर एकच होता. काय हे पास देणारे हलकट लोक ? मीं मनांतून या लोकांना पुष्कळ चाबूक मारले. तरुणीचा पास कॉम्प्लि-मेंटरी होता; त्यामुळें निव्वळ नैतिक युक्तिवादावर वेळ मारून नेण्याच्या इराद्यानें मीं म्हटलें,

" हें पहा मिस्टर, तुमच्याकडे चूक आहे असं नाहीं; पण या सभ्य स्त्रियांची तुम्ही जाणून बुजून विटंबना...... "

गृहस्थ अगदींच जाफराबादी दिसला! त्यानें माझें वाक्य पुरें होण्यापूर्वीच तोंड फत्ताडें करून " हॅ! जा ? ज्याऽऽ " केलें अन् आडकित्ता उगारला! अशा वेळीं Discretion is the better part of valour या आमच्या बिनबुडबुंधांच्या वाडवडिलार्जित ब्रीदाला अनुसरून मीं पडतें घेतलें. डोळ्यांत कृतज्ञतेचें पाणी खेळविणाऱ्या त्या रमणीला उद्देशून मी म्हणालों, " हं, इथं बसा आपण! मला कांहीं नाटकाचं तितकंसं नाहीं. नारायणराव आमच्या बैठकींतलेच असल्यामुळं हवे ते खेळ हव्या तितक्या वेळां आम्हांला पाहायला मिळतात. हं, संकोच करूं नका! आपण बेलाशक बसून घ्या! " माझ्या खुर्चीवरील धूळ रुमालानें झटकून मी उत्कंठित मुद्रेनें बाजूला झालों.

पण तरुणीऐवजीं खुर्चीत शालजोडींतला बोजा गपकन बसला! " ए, हॅः! " असे कांहीं तरी उद्गार माझ्या तोंडून नकळत बाहेर पडले! अंबामामी म्हणाल्या, " गंगे, जा आतां घरीं! टांगेवाला थांबलाय्, मी येतें तंवर! " आणि मी जो अस्मानांत गटंगळ्या खात होतों, तो खालीं येण्यापूर्वीच ती गंगा अदृश्य झाली!

मम्मुआत्याची सुधारून वाढविलेली आवृत्ति म्हणजेच अंबामामी ! डोक्यावरील पदराचे चोपीव कांठ कानावरून मागे नेलेले, डोळ्यांतील बदलणारे देखावे न दिसूं देणारा चष्मा ! चष्म्याची एक काडी तुटल्यामुळे तिच्या जागीं काळा गोफ बांधलेला ; आणि मिटलेल्या तोंडाची कांहीं तरी हालचाल सारखी चालू ! उजवा हात एका मृगाजिनाच्या पिशवींत घातलेला असून पिशवी वरखालीं हालत होती. एक तर मनीबॅग असावी, अगर तिच्या त्या हातावरून वारें गेलें असावें. किंवा आंतील जपाच्या माळेवर काम चालू असावें. परंतु एकंदरींत पाहतां मला ती एक सायलेंट फिल्मच वाटली बुवा ! पाणी पाजायला उभ्या केलेल्या घोड्याचीं ढापणं पुणेरी टांगेवाले जशीं सरकावितात, पण काढीत नाहींत, त्याप्रमाणें मामींनीं आपला चष्मा नाकावरून खालीं सोडला ; अन् आश्चर्य असें कीं, तो गळ्यांत लोंबकळून राहिला ! अर्थात् काडी आणि गोफाचा संगम दोन कानांच्या पाठीमागें कुठें तरी झालेला असावा हे उघड होतें.

थोड्या वेळानें माझ्या डाव्या बाजूनें एकाएकीं आवाज निघाला, "टाट्या ! टाट्च ना रे तूं ?" अशा ठिकाणीं आणि अशा परिस्थितींत अशी प्रसिद्धि झालेली दिसली, कीं मी हटकून कावराबावरा होतों. मी वळून पाहतों तों अंबामामी माझ्याकडे चमत्कारिक तऱ्हेने पाहत होत्या असें दिसलें. आपलें चुकलेलें जनावर पाहण्यासाठीं आपण पांजरपोळांत जावें आणि तें बराच वेळ न सांपडून एकदम आढळून यावें, याप्रमाणें मामींच्या चेहऱ्यावरचा अभिनय दिसत होता.

"होय आईसाहेब !" मी चांचरत म्हणालों, "आडनांव बिनबुडबुंध !"

"हां, मम्मूचाच तूं टाटू कीं नाहीं ? तरी मला वाटलंच तुला पाहिल्या-बरोबर ? दहा वर्सं झालीं मागं तुला भेटल्याला ! लहान होतास तेव्हां !"

"आमची मम्मुआत्या" काढणारी ही संक्रांत आतांच कां भेटावी ते मला समजेना ! माझें डोकें भ्रमण करूं लागलें. मम्मुआत्याची ही बालमैत्रीण अबामामी मला थेटरांत भेटलेली. मी नाटक पाहायला आलेलों ! अन् वर नारायणरावांच्या बैठकींतला म्हणून कबुलीजबाब दिलेला ! या सर्वांचें पर्यवसान कशांत होणार तें मला चक्क दिसूं लागलें होतें.

" टाट्र ? "

" मामी ! "

" काय होतंय् रे तुला ? "

" मला ? छेः कुठं काय ! रोज तीन पौंड वजन वाढतंय् ! "

" मग असा कां दिसतोस ? पांढरा फटक, पालीसारखा ! "

" कां ? जरा हडकलों वाटतं ? "

" जरा ? टाट्र, तूं निम्मा राहिला नाहींस ! "

" काय ? लहानाचाही निम्मा झालों ? "

पण इतक्यांत मला कारण समजलें. मीं भीत भीत सूचना केली,

" असं कसं होईल, मामी ? जरा चष्मा घालून पहा माझ्याकडे. "

" चष्मा लावण्याइतके माझे डोळे फुटले नाहींत, टाट्या ! अस्सं ! टाट्या, तूं जरासा चारगट झाला आहेस ! रोज रात्रीं जागरणं करतोस वाटतं ? हीं व्यसनं केव्हांपासून झालीं सुरू ? "

" च्क्: छेऽहो ! रोज कसचा येतों मी ? अकराच्यापुढं तर रातांधळ्यासारखंच होतं बघा मला ! "

" ऐकलंस का टाट्र, मी चारदोन दिवसांत मम्मुआत्याकडे जाणारच आहे. बरेच दिवसांत भेटलें नाहीं तिला ! "

" असं का ? वा, छान् ! माझा साष्टांग दंडवत सांगा आत्याला ! " आंतील यांत्रिक रचना एकाएकीं बंद पडली असतांही मोठ्या कष्टानें मीं वरील उद्गार काढले. मामींचा बेत फिरविण्याचा एकदा नेटाचा प्रयत्न करण्याच्या इराद्यानें मी म्हणालों,

" पण मामी, या दिवसांत आत्त्या शेतावरच राहते. "

" असं दे रे ! शेतांत असूं दे नाहीं तर मसणांत असूं दे ! मला कुणाची चोरी आहे चार दिवस तिच्याकडे तळ द्यायला ? "

आतां इलाज खुंटला. अंक संपेपर्यंत किती कल्पना रचल्या आणि मोडून टाकल्या त्या माझ्या मला ठाऊक !

अंक संपतांच मीं जिवाला गांठलें.

" जिवा, माझ्याशेजारीं कोण आहे पाहिलंस का ? "

" तें लाल बंडल ना साहेब ? "

" बंडल नाहीं ! मम्मुआत्याची जिवलग मैत्रिण अंबामामी आहे ! "

" अस्सं ! "

" ती दोनचार दिवसांत मम्मुआत्याकडे जाणार आहे. "

" जाऊं द्या, साहेब ? "

" जाऊं द्या ? इतका बुरणुसबुद्धीचा असशील असं नव्हतं वाटल मला. "

" खरं आहे, साहेब. गरीब चाकर मी ! "

" अन् मुंबईचा आहेस, जिवा ! नाना फडणीसांच्या पट्टींतला नाहींस म्हणून !"

" काय करणार, साहेब ? "

" जिवा, शोक नको त्याचा ! कुणाच्या हातची का गोष्ट आहे ती ? आतां मुद्दे लक्षांत घे ! ही अंबामामी मम्मुआत्याची मैत्रिण; मम्मुआत्याकडे जाणार ! मी नाटक पाहत तिच्या शेजारीं उभा ! शिवाय श्री. नारायणरावांच्या बैठकींतला म्हणून कबुली दिलेली ! मामींच्या समजुतीनें निम्माच शिल्लक राहिलेलों !... जिवा, तूं मम्मुआत्याचा अभ्यास केला आहेस ! तर या सर्व मुद्द्यांचा शेवट कशांत होणार तें तुला कळत नाहीं ? "

" आलं लक्षांत ! पण आतां उपयोग काय, साहेब ? "

" कां ? तुझ्या बटव्यांतल्या सर्व मुरुड शेंगा संपल्या ? "

" आपणच प्रयत्न करून पाहा, साहेब ! "

" मी ? मी काय करणार जिवा ? "

" अंबामामींशीं बोला ! "

" काय ? "

" कांहीं तरी ! हवें तें ! "

" आलं ध्यानांत; वेड पांघरायचं—उन्हाळ्याचं वेड, होय ना ? "

## जीते रहो जिवा !

" डोकं ठिकाणावर नाहीं असं दाखवलं पाहिजे, साहेब ! "

" नाना फडणिसांच्या तोडीचा मेंदू असून ? "

" उपाय नाहीं, साहेब : शकुंतलेच्या जन्मासंबंधीं बोला किंवा असंच कांहीं तरी ! "

" दुष्यंताला हरिणाकडून खाववून कालिदासानं शकुंतलेला विधवा करायला पाहिजे होतं, असं सांगू का, जिवा ? "

" याहीपेक्षां भयकर गोष्टी सांगितल्या तरी चालतील, साहेब ! "

" ठीक आहे; आणखी तिच्या हातांत पोळपाटलाटणं देतों ! "

नवीन अंक सुरू झाला. अंबामामींची सायलेंट फिल्म तशीच चालू होती. जिवानें ठरविलेली योजना अमलांत आणण्याची संधि मिळण्याचे चिन्ह दिसेना. मीच होऊन शाकुंतलांतील " न खलु न खलु बाणः सन्निपातेयामस्मिन् " इत्यादि पुटपुटण्यास सुरवात केली. तरीही मामींच्या फिल्मचा पट्टा तुटण्याचा रंग दिसेना. शेवटीं शाकुंतलभाष्य सुरू करावें लागलें.

" काय, मामी ? उकडतविकडत नाहीं ना विशेष ? "

" उंहुं ! "

" मामी, तुम्हीं कालिदासाचं शाकुंतल वाचलं असेलच, नाहीं ? अन् किर्लो-स्करांचं तें नाटकही पाहिलं असेलः तेव्हां मी म्हणतों..."

" जास्त बोलूं नकोस, टाटू ! सगळं पाहिलंय् मीं ! " डोळ्यांवर चष्मा चढवून मामींनीं त्याच्या काचांखालून माझ्याकडे पाहिलें; ती नजर पाहूनच माझें इंजिन विझलें आणि तें पुन्हा पेटण्यास आंत विस्तव नव्हता !

त्याच वेळीं दरवाजांतून एक तरुण स्त्री चकमकीसारखी आंत आली; तिनें चहूंकडे गरगर डोळे फिरविले आणि आमच्या खुर्चीच्या रांकेपाशीं येऊन थडकली ! आज या रांकेच्या राशीवरच घातचक्र आहे याची मला खात्री पटली.

" उरीं ज्वालामुखी पेटे ! कढे पोटामध्यें लाव्हा ! " या कव्युक्तीची मूर्तिमंत प्रतिमा समोर उभी होती. तिनें सिंहाच्या पिंजऱ्यांत सर्कसवाले देवल

जसा चाबूक वाजवीत, त्याप्रमाणें नुसतें, " छु: छु: ! " केलें; पुन्हा एकदा जास्त जोरानं चाबूक सपकला ! आतां त्याचा आवाज पोलिसाच्या शिटीप्रमाणे निघाला. फेटेवाल्याची नजर तिच्याकडे गेली. अन् केवढें आश्चर्य; केवढा टॉस्फर सीन ! पाहतां पाहतां त्याच्या खाटकी चेहऱ्याचें रूपांतर खाटकाच्या तावडींत सांपडलेल्या बकऱ्याच्या चेहऱ्यांत झालें. "हुं" म्हणून तिनें टिचकी वाजविली आणि दरवाजाकडे बोट दाखविलें. त्या जंगली प्राण्यानें सर्कस केली. हळूच उठला आणि वर न पाहतां तिच्या मागोमाग दारांतून बाहेर पडला. " ही मायामच्छिंद्रमधली कीलोतला बरं का !" म्हणून कोणी तरी कुजबुजलें. परंतु अंबामामी एकदम तरुण झाल्यासारख्या दिसल्या. त्या हंसल्या आणि " अशा बायका मिळाल्यावर काय टाप आहे नवऱ्याची असलीं थेरं करायची ? " असें मोठ्यानें म्हणाल्या. सबंध शालजोडींचे बंडल साबणाच्या फेसासारखें फुगले आणि बसले ! हसण्याचा जोर ओसरल्यावर " खरं कीं नाहीं रे टाटया ? " म्हणून विचारून, माझ्या काळजास चिमटा घेण्यास मामींनीं कमी केलें नाहीं. खुर्च्या रिकाम्या झाल्यावर आम्हीं बाहेर पडलों तों पीटाच्या गर्दीच्या तुफानांत सांपडलों. मामींना वाट काढीत आणि फडणीशी मेंदू खाजवीत खाजवीत मी पुढें चाललों होतों. अर्ध्या वाटेंत माझ्यामागून " अगो बाऽऽई ! दांडगेश्वर मेला ! " म्हणून मामींची किंचाळी ऐकूं आली. मीं झटकन् मागें वळून पाहिलें. एका गुंडानें मामींच्या हातांतून ती पिशवी लांबविलेली होती.

" टाट्ट ! धांव रे बाबा, धर त्या रामोशाला. मेल्यानं माझी जपाची माळ हिसकलीन्. कधीं नव्हता असा अपशकून झाला. आई ग, गुरुमाउली ! टाटया, माझा जीव कासावीस होतोय्रे ! "

एकदम उडी घालण्यापूर्वी कोणत्याही गुंडाचें मार्मिक समालोचन करणें हें माझें कर्तव्यच होतें. ही माळेची पिशवी हिसकणारा गुंड तर एका समालोचनांत सामावण्यासारखा नव्हता. मला त्याची फाळणी पाहून प्रांतानिहाय पाहणी करावी लागली. आपल्या बजेटाबाहेरचे हें काम आहे हें मी समजून चुकलों. यांतून युक्तीनें शीरसलामत ठेवून मार्ग काढण्यासाठीं मीं पुन्हा नाना फडणीसांची आठवण केली. परंतु तितक्यांत मामी बेफाम झाल्या आणि त्यांनीं आपला उजवा

हात माझ्या कानास घातला. एवढया मंडळी समोर अंबामामींच्याकडून कान रंगवून घेण्यापेक्षां त्या गुंडाचा एखादा बुक्का खाऊन जमीनदोस्त होणें बरें, हे तेव्हांच माझ्या लक्षांत आलें. मस्तपणें खांदे झुलवीत दारापर्यंत गेलेल्या गुंडावर मी धांवून गेलों आणि त्यानें ज्या हातांत पिशवी धरली होती त्यास लोंबकळलों ! गुंडांनें एकदा माझ्याकडे, पंजांत सांपडलेल्या उंदराकडे पाहणाऱ्या सिंहाप्रमाणें पाहिलें आणि माझी मानगुट पकडली. पुढें थोडी झटापट झाली. काय काय झालें तें आठवण्याइतकें ठिकाणावर डोकें ठेवण्याची कला अशा मारामारींत मला अजूनही साधत नाहीं ; एवढें खरें कीं, गुंड एकदा खालीं बसला; मग उठला आणि पिशवी माझ्या हातांत सोडून पळून गेला ! मामी जवळ आल्या आणि थैली सुरक्षितपणें आपल्या हातांत घेऊन म्हणाल्या, " गुरुराज ! परमानंद ! अहाहा ! आज आपण टाटूच्या रूपानं धांवून आलांत आणि या अबलेला मदत केलीत. केवढा आडदांड तो राक्षस ! काय रे टाटू ? पुसतोस काय ? लागलं बिगलं का कुठं ? " मी वास्तविक रुमालानें नाक पुशीत होतों. पण मामीचा नूर पाहतांच तो कपाळावरून फिरविण्यास सुरवात केली; डोळे मिटले, शु शु केलें आणि गंभीरपणानें म्हणालों,

" मामी, माझी नको काळजी. कसं केलं तरी थोडीबहुत शरीरमेहनत केली आहे मीं ! चला जाऊं लवकर. "

आम्हीं बाहेर आलों तेव्हां जिवा आणि माझा टांगा यांपैकीं कोणाचाही पत्ता नाहीं. पाऊस तर धो धो अन् दुसरा एकही टांगा आसपास दिसेना. मामी म्हणाल्या,

" अग बाई ! मेल्याला उभं राह्यला सांगून दिखील कुठं मरायला गेला कुणास ठाऊक ? " झोंपेमुळें मामीचे डोळे तारवटूं लागले होते आणि रागामुळें त्यावर लाली चढत होती. या वेळीं टांगा शोधावयास जाणें म्हणजे भरल्या कपड्यानिशीं मुळामुठेंत जीव देण्यासारखेंच होतें. परंतु मामींवर इंप्रेशन मारायचें राहिलें आहे याची आठवण होतांच मीं टोपीची घडी खिशांत कोंबली, धोतर आवरलें, हातरुमालांत डोकें गुंडाळलें आणि म्हणालों,

" मामी, जरा थांबा ! आत्तां टांगा घेऊन येतों ! "

ज्या अवसानानें मी निघालों, तें टिकलें नाहीं; कारण अड्ड्यावर जाऊन पाहतों तों टांगा नाहीं. कुणी म्हणे पासाला गेले, कुणी म्हणत पावसानें गेले. रस्त्यानें तरी एखादा येईल जाईल म्हणून उभा राहिलों. पण छे! टांग्याचें नांव नाहीं. मी बिथरलों. आतां मामींना तोंड दाखविलें तर वाभाडेच निघतील. त्यापेक्षां येथूनच गुंगारा दिला तर बरें; माझें काय झालें न् काय नाहीं याचीच त्यांना काळजी लागून राहील व त्यांच्या कामामुळें असें झालें असल्यामुळें त्या मम्मुआत्याजवळ चकार शब्द काढणार नाहींत, इत्यादि विचार करीत मी परत येत होतों. माझें डाव्या गल्लीकडे सहज लक्ष गेलें; तेथील अंधारांत कांहीं तरी जास्तच काळें दिसलें, अन् फुर्र्र्र असा आवाज ऐकूं आला. जवळ जाऊन पाहतों तों टांगा! वाळवंटांत सांपडावा, त्याप्रमाणें आनंद झाला. मी हाक मारली.

"ए टांगा! टांगा आते क्या? सुनते क्या! आता है क्या नई!" अम्मलदारी पद्धतीनें टांगेवाल्यांना हिंदींत हाका मारण्याची मला संवयच होती; परंतु टांग्याकडून कांहीं उत्तर मिळेना; तेव्हां चरफडत आणखी जवळ गेलों. टांग्यांत कोणी तरी धडपडत असावें असें मला वाटलें. मागच्या बाजूला बसलेल्या त्या व्यक्तीचा हात खिशांत गेला आणि पुन्हा बाहेर आला तेव्हां त्यांत कसली तरी नळी दिसत होती. मला कॉननडॉईल्च्या गोष्टींतल्या खुनी बदमाषांची आठवण झाली, घाम आला आणि आतां येथून मागे जावें कीं काय, याचा विचार करूं लागलों. इतक्यांत जवळून एक सायकल गेली. टांग्यांतल्या त्या भयंकर व्यक्तीनें हातांतील नळी फेकून दिली. सायकलच्या दिव्याच्या उजेडांत मला त्या व्यक्तीचा चेहरा दिसला! इतका वेळ त्या आकृतीला डोकें आहे कीं नाहीं हीच मला भीति होती, ती नाहींशी झाली. शिवाय त्या नळीचीही ओळख मला पटली आणि मी स्वतःशींच पुटपुटलों, "अरे गुलामा जिवा! आतां हे धंदे सुरू केलेस हं?" आणखी धीरानें मी ओरडलों,

"काय करतो आहेस रे जिवा?"

"टांगेवाल्याला उठवतों आहें, साहेब!"

"कुणाचा टांगा?"

"अंबामामींचा!"

" आँ ? अन् आपला ? "

" नवरागयकोचं भाडं लागलं त्याला, साहेब ! "

" याचा खूनबीन झालाय् कीं काय ? "

" जरा जास्त निजलाय्, साहेब ! "

मुठीचा अंगठा तोंडांत घालून मान मागें वळवीत मी म्हणालों, " यामुळं वाटत ? " जिवानें चिलीम फुंकण्याचा अभिनय करून दाखविला आणि उत्तर दिले, " उंहुं ! हुं साहेब ! "

ती नवी चिलमीची होती तर !

" खरंच का ? संभाळ हं, जिवा ! गांजा पिऊन उठणारीं माणसं केव्हां केव्हां ओरबडतात म्हणे ! "

जिवा थोडा हसला आणि म्हणाला,

" छे साहेब ! माझ्याशीं त्याची दोस्ती जमली, साहेब; मी आत्तां उठवतों त्याला ! " जिवानें घोड्याच्या शेपटींतून एक केस उपटला आणि तो टांगेवाल्याच्या तोंडावरून फिरवण्यास सुरवात केली. टांगेवाल्यानें स्वतःच्याच तोंडावर तीन चार चापट्या उडविल्या आणि मग उठून बसला. थोड्याच वेळांत टांगा थिएटरपाशीं आला.

टांगेवाल्याकडे लक्ष जातांच मामी म्हणाल्या, " अरेच्चा ! हा तर मघांचाच टांगा. का रे मेल्या, कुठं निघून गेला होतास ? दुसरं भाडं धरलंस वाटतं ? "

पुण्याच्या टांगेवाल्यांजवळ स्फूर्तिजन्य उत्तरें नेहमीं तयार असतात.

" छे छे बाईसाब ! वाइच आडोशाला खोडला व्हता. आन् इतक्यामंदी डुवोळा लागला पगा ! "

प्रतिभासाधन म्हणतात तें याला !

माझ्याबद्दल मामींना काय वाटलें तें त्यांच्या तोंडावर स्पष्ट दिसतच होते. गळा दाटून येऊन जेव्हां त्या म्हणाल्या, " टाटू, येतें हं मी ! " तेव्हां तर खात्रीच झाली. मी आपल्या कार्यभागाच्या दृष्टीनें म्हणालों,

" केव्हांही जरूर लागली तर कळवा हं मला. तुमच्यावर माझा लोभच जडून गेला आहे ! "

" खरं का बाळ ? एवढं बरीक ठीक झालं कीं, उद्यां मला कामावर वेळेला जातां येईल. नाहीं तर आलीच होती पंचाईत. तशी आमच्या नेन्यांची मंडळी मोठी सालस आहेत म्हणा ! माझं डोकं दुखतंय् म्हटलं तरी चार भांडीं स्वतः उतरून घ्यायची त्यांची हंसत तयारी असते !"

अंबामामींचा धंदा समजतांच मी चपापलों ! पुण्यांतील स्वयंपाकिणींच्या सामाजिक परिस्थितीचा एक नवीन विषय मला विचार करण्यास सांपडला. परंतु चालू मुद्द्याची आठवण होऊन मीं सुचविलें, " हे पाहा मामी, आत्याकडे गेलांत तर आजच्या नाटकाबद्दल विशेष कांहीं बोलूं नये म्हटलं ! तुम्हाला आत्याचा स्वभाव माहितच आहे. "

"घाबरूं नकोस, टाटू ! चालायचंच पगार् वेळेला असं ! मी कांहीं इतकी ही नाहीं हो ! बरं, परवांच्या दिवशीं सद्गुरूंचं मावंद आहे; तेव्हां जेवायला ये आमच्या घरीं-जुन्या मुरलीधराजवळ !"

मामींचा टांगा चालू झाला. बाहेरून गारठा असला तरी आंतून मी गरम झालों होतों. नानांची मुत्सद्देगिरी अजून पुण्यांत शिल्लक आहे. माझ्यासारख्या कांहीं निवडक तरुणांच्या मेंदूंत ती वंशपरंपरेनें चालत आली आहे, अन् त्यामुळेंच या आकस्मिक उत्पन्न होणाऱ्या घटना ऊर्फ पेंचप्रसंग आपण सहज पालथे घालूं शकतों, इत्यादि विचारांनीं माझ्या मनाला गुदगुल्या होऊं लागल्या होत्या. मघांच्या त्या गुंडाच्या झटापटींत माझ्या धोतरास एक मोठा थोरला धस गेला होता; परंतु आलेलें अरिष्ट संकटघटना उलथून पाडण्यास विशेषतः ती झटपट कारण असल्यामुळे मीं तिकडे लक्ष दिलें नाहीं. चहाच्या दुकानांतील गरम वासाचे निमंत्रण नाकारतां येणें आतां शक्य नसल्यामुळें, मी पायरीवर चढलो. पहिल्याच टेबलापाशीं दोन व्यक्ति बसल्या होत्या. त्यांजकडे लक्ष जातांच " चमत्काराचं युग अजून संपलं नाहीं " हें महात्म्याचें म्हणणें मला पूर्णपणें पटलें !

कारण गरम चहाचे घुटके घेत जिवा आणि तो पिशवी हिसकणारा गुंड गप्पा छाटण्यांत व टाळ्या देण्यांत दंग होऊन गेले होते !

---

# काकड्या आणि खराटे



"जिवा, हे खादाड 'हीरो' केव्हां मरणार बुवा ?"

" खादाड, साहेब ?"

" नाहीं तर काय ? हा पुरणभक्त ! उद्यां वरणभक्त निघेल."

" मला वाटतं त्याचं नांव असेल तसं. पुरण खाणारा नव्हे !"

" एः जिवा, पण हीं असलीं कसलीं नांवं ?"

" अहो, हा शिनेमा—स्स्फुर्रर्र, तसा नाहीं. स्स्फूर्रर्र...तो पुलणभत्त आहे ना ? तो स्स्फूरर्र तलवाल खेळतो ! आम्हीं पाहिलाय् !" माझ्या पाठीमागच्या बांकावरून हा आवाज आला. मी मुलांचे आवाज तेव्हांच ओळखतों आणि नुसत्या आवाजावरून त्यांच्या जाती कळतात. ही अशी उपसूचना पुढें आणणारीं मुलें मला आवडत नाहींत. तसें पाहिलें तर मला कोणतींच मुलें आवडत नाहींत. त्या एक प्रकारच्या मिरच्या आहेत असा माझा समज आहे. त्यांतल्या त्यांत ही आतां भेटलेली लवंगी मिरची फारच भयंकर. उंदीर आणि डांबरगोळ्या एके ठिकाणीं राहणे शक्य नाहीं, त्याप्रमाणें अशीं मुले आणि मी कधींही एकत्र वागलेलों नाहीं. आमच्या पाठीमागचा हा मुलगा वयाने पांचसहा वर्षांचा असून त्याच्या डोळ्यांत उच्छृंखलपणा पुरेपुर भरलेला दिसत होता. डोक्याच्या पुढील भागास नैवेद्य दाखवितांना पाण्यानें आपण जेवढा भाग भिजवितों, तेवढीच केंसाची जागा सोडून बाकी डोक्याचा सहारा, रंग काळा, नाकाचा सांडगा आणि हातापायांतला भराव पोटावर टाकलेला, अशी ती बालमूर्ति होती ! ज्याच्या ताब्यांत ही डांबरगोळी होती, तो गृहस्थ तोंडावर धोतर घेऊन

घोरत होता. अर्थात् अशा वेळीं त्या पोराचें पोरपण पूर्ण विकसित झालें होतें. एवढ्या परीक्षणानेंच ही लवंगी जात आहे हें मी समजून चुकलों...

मीं विचारलें, " मुला, तुझं नांव काय ? "

" तुमचं नाक ! "

" म्हणजे काय ? "

" हें " असें म्हणून त्याने माझ्या पाठींत एक धपाटा दिला. नेहमीं हें असें होतें. आमच्या गल्लींत कुत्रे आहेत नि मुलं पण आहेत; पण माझ्यावर भुंकून माझा पाठलाग करण्यापलीकडे त्या कुत्र्यांनीं माझा कधींही उपमर्द केला नाहीं. परंतु मुलांचें निराळें ! माझ्यांत असें काय आहे कोणास ठाऊक ! मुलांनीं मला पाहिलें, कीं एखादा हुप्प्या आल्यासारखें त्यांना कौतुक वाटतें अन् मग त्यांच्या कौतुकाचें प्रदर्शन मला झेपत नाहीं. परंतु या वेळीं हा पोरगा एकटा होता; बी. बी. सी. आय्. च्या डाउन लोकलमध्यें तो होता आणि मम्मुआल्यानें मुद्दाम मागविलेल्या काकड्यांच्या करंडीवर नाचत डब्यांतील माणसें मोजीत होता. तेव्हां खिडींत शत्रु सांपडला आहे, त्यावर हल्ला करण्यास हरकत नाहीं, असें ठरवून मीं दरडावलें, " ए, खालीं उतर टोपलीवरून ! "

त्यानें ते ऐकलें नाहीं; त्यानें करंडीवर एक दाणदिशीं उडी मारली. माझ्यापुढें एंजिनाच्या दट्ट्याप्रमाणें हात फिरवीत, फनेलासारखें तोंड करून " कशासाठीं पोटासाठीं खंडाळ्याच्या घाटासाठीं ? झुकुक्, झुकुक् झुक् झुक् " इत्यादि सुरू केलें. मध्येंच पंजा उभा करून आंगठा आणि पहिलें बोट यांच्यामधील पड्यावर " भू भू ऊं ऊं ऊं " शिटी झाली ! एकच असला तरी जातिवंत धोतराच आहे अशी माझी खात्री झाली. मी उठलों आणि शत्रूची फळी फोडण्याच्या इराद्यानें डोळे वटारून म्हणालों, " शुंः ! अरे खालीं उतरतोस का देऊं एक ठेवून ? " त्यानें करंडीवर " स्टँड ॲट ईज् " केलें आणि कंबरेवर हात ठेवून " नाहीं उतरत ज्जा ! " म्हणून पहिली सलामी दिली ! आतां हातघाई सुरू झाली पाहिजे म्हणून मीं हात उगारला. तों शत्रूनें माझा फेटा पुढून खालीं ओढला ; केंस राखणारांनीं कधींही फेटा बांधूं नये. त्याला

गुताव नसल्यामुळें तो डोक्याला बरोबर चिकटत नाहीं. चोपड्या दगडावरील चुन्याच्या पलिस्तराप्रमाणें अशा हिसड्यानें त्याचा पोपडा सुटतो, तीन दिवसांच्या हजामत केलेल्या डोक्यावर फेटा उत्तम बसतो. या वेळीं माझा रुमाल अर्धवट माझ्या डोक्यावर आणि अर्धवट गळ्यांत लोंबूं लागला. हें पाहून मीं हरहर महादेव केलें आणि बेलाशक शत्रूचा कान पकडला. शत्रूनें एकदम पांचजन्य फुंकण्यास सुरवात केली ! तें ऐकून जवळच्या बांकावरील एक तटस्थ राष्ट्र म्हणालें,

" अरे जाऊंद्या. बच्याला समजतो नाय्. तुमी कसाला त्येच्या संगती लढते ? बच्याएने जसा कोमल फूल छे ! वधारे माणसना राजा छे ! " मला हात आवरावा लागला. याच कारणामुळें मुलें मला आवडत नाहींत. मुलें म्हणजे फुले असें म्हणून निव्वळ घुले कवींनीं या मुलांना हिंदुस्थानांत भलतेंच स्थान देऊन ठेवलें आहे ! मुलें म्हणजे घुले आहेत हें लोकांना कळूं लागल्याखेरीज हिंदु समाजाला चांगले दिवस यावयाचे नाहींत. पुढच्या पिढींतील प्रजेचा आपल्या हातांनीं आपण नाश करीत आहोंत !

मीं आपला मोर्चा जिवाकडे वळविला, " जिवा, पाहिलेंस ना ? सामानाकडे तुझं लक्ष नाहीं."

" आहे, साहेब; पण तो पोरगा सुधा दिसला नाहीं म्हणून त्याच्या वाटेला गेलों नाहीं ! "

" जिवा, तूं मुलांना भितोस ? हें धोतऱ्याचं बीं मम्मुआत्याच्या काकड्यांचा नाश करीत आहे हें दिसतंय् ना ? "

" होय साहेब ! पण गोडीनं घेतलं असतं तर तो लवकर खालीं उतरला असता. आतां तुम्ही त्याला हट्टाला पेटवला, साहेब ! "

" काकड्यांबद्दल मम्मुआत्यानं तिच्या पत्राला पुरवणीपत्र जोडलं होतं; ठाऊक आहे ना, जिवा ? "

" पुण्याची काकडी म्हणजे त्यांचं बालामृत आहे, साहेब ! "

" तर मग या काकड्या चिरडलेल्या दिसल्या, कीं मम्मुआत्या उकळणाऱ्या किटलीच्या झांकणाप्रमाणं सगळं घर थराऊन सोडील? माहित आहे ना?"

" खरं आहे साहेब! पठाणांचा मोहल्ला देखील अशा वेळीं आत्यासाहेब खालीं करतील."

" अस्सं, जिवा! मग आतां आपण चार दिवस सुटीचे मम्मुआत्याकडे चाललों आहोंत, तेव्हां पहिल्या सपाट्यास अशीं घरं हादरून चालायच नाहीं. असं झालं, तर आत्या काय म्हणते माहित आहे का?"

" नाहीं, साहेब."

" अजागळ न् शेणगोळा म्हणते. माझ्या बिनबुडबुंधी घराण्याचा मला अभिमान आहे, जिवा. हे मला कसं सहन होईल?"

" खरंच, साहेब! आपल्याला असं म्हटल्यावर जगांत जास्त किमतीच कोण राहिलं?"

" म्हणूनच जर माझ्यासारखा धनी तुला न मिळता, तर लखपती वधारो करण्याची वेळ आली असती तुझ्यावर. बाबा रे, नुसत साहेब होऊन भागत नसतं; अशीं किती तरी संकटं डोक्यावर घ्यावीं लागतात."

" दिसतंच आहे तें, साहेब!"

" म्हणून आपली काकड्यांची करंडी म्हणजे केवढी जबाबदारी आहे, जिवा?"

" द्रोणागिरि नेण्याची मारुतीवर होती तशी!"

" पण, अरे देवा, जिवा!"

" साहेब," तो माझ्या कोटाचीं बटनें सोडूं लागला; त्याला दूर करून मीं म्हणालों, " ग–गु–गुदमरत नाहीं मीं! पण ख–खराटे?" जिवा चमकला. त्यानें सामानाची उलथापालथ सुरू केली. मीं लांबूनच दुसऱ्यांच्या सामानाची तपासणी केली. मम्मुआत्यानें आमच्यावर टाकलेली ती दुसरी जबाबदारी नाहींशी झाली होती. " पुण्यास मिळणारे चांगले खराटे आणि काकड्या येतांना घेऊन यावें" असें आत्याचें फर्मानच होतें. पैकीं खराटे दिसेनात. जिवा म्हणाला,

" मागच्या गाडींत राहिले असावेत, साहेब!"

" म्हणजे ? एक्स्प्रेसमध्यें ? "

" असं दिसतं. "

" हुं ! हॅा ! हो ! " मीं म्हटलें; पण बोलण्याला अवसान नव्हतें.

" जिरलों हं, जिवा ? " बांकावर बसून घाम पुशीत मीं विचारलं.

" ॲस्पिरिन् देऊं का, साहेब ? "

" इतक्यांत नको. खारीस उतरल्यावर घेईन. "

" काकड्या गेल्या नाहींत एवढं ठीक झालं, साहेब. खराटयांना निराळीं तिकिटं पडतात, म्हणून सांगावं ! " जिवानें सुचविलें.

" जिवा, अशीतशी नाहीं; मम्मुआत्या आहे ती ; तुझ्याबद्दल तिचा काय ग्रह झाला आहे तें माहीत आहेच तुला."

" पत्र पावसानं भिजलें म्हणून मजकूर नीट लागला नाहीं. कांकड्या तेवढ्या त्यांना आवडतात म्हणून सहज आणल्या, असं म्हणावं, साहेब ! "

" यस्स जिवा ! ती एक ठीक आहे शक्कल. अन् खराटे म्हणजे कांहीं मोठीशी बाब नाहीं. "

थोड्या वेळानें वांद्रे लागले. डबा बहुतेक रिकामा झालेला होता. मी सामान आवरूं लागलों. आम्हीं काढलेल्या शकलीनें खराटयांबद्दलची आत्याची आग विझेल कीं नाहीं याची काळजी लागलीच होती ; इतक्यांत कातर आवाजाने जिवानें विचारलं,

" स–स–साहेब; क–काकड्यांची क् क्–करंडी तिकडे आहे ? "

मी भराभर चांचपडून उत्तर दिलें, " न्–न् नाहीं, जिवा ! "

" इकडे तर दिसत नाहीं."

" ऑं ? जिवा, गाडीच्या भुईला भोंकबिक आहे कीं काय पाहा पाहूं. वेळींच गार्डाच्या कानावर घालतों ! "

" गाडीचे तळ चांगले आहेत, साहेब ! "

फ्यूज उडालेल्या दिव्याप्रमाणें एक मिनिटभर आमच्या तोंडावर काळोखी आली आणि सगळ्या कारखान्याची हालचाल बंद पडली. हळूहळू डायनामो चालू व्हावा त्याप्रमाणें माझ्या दिव्यांत करंट येऊं लागला.

" जिवा ! परत जावं का ? "

" पुरेसे पैसे असल्यास, तेंच ठीक होईल, साहेब. " जिवानें चहूंकडे पाहत उत्तर दिलें. मीं पैशाचें पाकिट काढण्यासाठीं कोटांत हात घातला, तो एकदम अस्तरांत गेला. एखादा विंचू डसल्याप्रमाणें झटकन् मीं कोट जिवापुढें उलटा केला ! " जिवा, हें त्याहून भयंकर ! दैवानं खलबत्त्यांत टाकलंय आपल्याला !"

" होय साहेब, खिसा कातरलेला आहे ! "

" अन् पोलिसांना खरं वाटणार नाहीं, इतक्या सफाईनं काम केलं आहे. "

आपला खिसा शाबूत आहे याची जिवानें खात्री करून घेतली ! मी आपल्या कोटाचे राहिलेले खिसे तपासून म्हणालों, " कर्म ! जिवा, तिकिटं ? "

" माझ्याजवळ आहेत, साहेब ! "

आम्हीं पुन्हा बाकावर बसलों. आगामी संकटाचें स्वरूप आतां फारच भयंकर झालें होतें. मुटींत चैन करण्यासाठीं आलेला टाटा, सांगितलेल्यांपैकीं एकही वस्तूशिवाय, पैसे आणि खिसा गमावून आणि जिवासारख्या चांडाळाला बरोबर घेऊन दारांत उभा राहतांच मम्मुआत्या काय करील याची मला कल्पना आली. अशा वेळीं केविलवाणीं तोंडें आणि रडत सांगितलेल्या सबबी ती तेव्हांच " फू " करून टाकीत असे. शिवाय मुंबईला येतांना कित्येक धोक्यांच्या सूचना आणि पाळवयाचे नियम तिनें मला अगोदरच कळविले होते. परंतु मला काय माहीत, कीं या हवेंत मनुष्य " खराटे " विसरतो, डांबरगोळ्यांसारखीं मुलें भेटतात, आणि लोकांना कोटाच्या कापडांतून पैशाचीं पाकिटें दिसतात ! तें तिनें त्याहायला पाहिजे होतें. शेवटीं गाडी एकदांची खारवर उभी राहिली आणि आम्हीं सामानाचे डाग मोजून बाहेर काढले; जिवा खालीं उतरला.

मी उतरूं लागलों तों माझें धोतर मागें अडकलें आणि धोतरें अडकलीं म्हणजे हिसकाहिसक करून चालत नाहीं. " इकडच्या लोकलना धोतर

पकडण्याची सवय आहे हां ? " असें पुटपुटून मीं मागें पाहिलें. माझ्या डोळ्यांवर माझा विश्वास बसेना ! धोतर अडकलें नव्हते. मघांच्या त्या मगरूर डांबरगोळीनें तें पकडलें होतें. गिरणीच्या पट्टयांत तें अडकलें असते, तरी मला इतकी धास्ती वाटली नसती. पण खालीं पाहत धोतर धरून ठेवणारी ती बालमूर्ति पाहतांच मी खवळलों. " ए ए ! स्रोड हट् ! " मीं ओरडलों आणि तडक प्लॅटफार्मवर उडी टाकली. परंतु धोतराचे दोन भाग होऊन एक भाग त्याच्या हातांत कायमच राहिला आणि एक माझ्या पायांजवळ लोंबत राहिला. थोडक्यांत समजलो कीं, हा निव्वळ गंफलास आहे !

नशिबाची उलटी अजून संपली नाहीं हे पाहून मीं चिडलों आणि चिडलों म्हणजे जें नेहमीं करतो ते केलें. त्या पोरट्याच्या हाताला डसलों ! डसण्यांत माझा लहानपणापासून हातखंडा होता. त्यामुळे त्या कारट्यानें धोतराचा हात सोडला. परंतु तो सुटण्याच्या अगोदर यंत्रासारखा दुसरा हात त्याच्या जागीं येऊन बसला, आणि चमत्कारिक तऱ्हेचा ग्रामोफोन सुरू झाला. आणखी कौशल्य दाखविलें तर गर्दी जमणार हे मी समजून चुकलों आणि निराश होऊन त्याला विचारलें, " अरे पोरा, मला कां उगीच त्राम देतोस ? " त्याने गळा काढून रडण्यास प्रारंभ केला.

" अं अ उं उं, मी तुमच्या बलोबल येनाल ! मला तातींकडे जायचं ! '

" शुः शुः, तुझं नांव तरी सांगशील कीं नाहीं !

" मुलुंडसाहेब ! "

" ए: ? "

" मुरुंड " असावें असें जिवानें सुचविले. एवढेसे कारटे साहेब झाले, म्हणजे एक तर बड्या श्रीमंत घरांतील असावा, किंवा एखाद्या वकिलाचा मुलगा असेल. " मीं विचारलें,

" कुठं राहतोस, बाबा ? "

" तातीकडे ! "

" ताती कोण ? "

" आमची ताती ? "

मला एक चमत्कारिक शंका आली. एका बाजूस मीं जिवास विचारलें. " आकाशांतून तारे तुटून पडतात तसं हें मूल मंगळाबिंगळावरून तर खालीं आलं नसेल ना ? "

" छे, साहेब ! नेहमींपैकींच जात आहे."

" काय रे मुरुंडा, मघाशीं कोण होता तुझ्याबरोबर ? "

" तो हुवा ना ? त्यांनीं मला मोठ्या शिनिमाला नेलं होत. आतां मला तो पेढे खायला नेनार होता त्यान्या घलीं. पण तो गेला उतलून अगोदलच." करंडी कोणीं लांबविली आणि खिरा कोणीं उतरला तें आमच्या लक्षांत आलें. आतां गोड बोलून काम साधले तर पाहावें म्हणून मी म्हणालो, " मी देइन तुला पेढा. पण आतां आम्हांला आमच्या तातीकडे जाऊं दिल पाहिजे. तुझी तार्ती तशी आमचीही आहे. " पण व्यर्थ !

" उं ऽ हु ! मला तातीकडे न्या तुर्मी ! " ही त्याची रट कायम सुरू झाली.

" आतां या दाटेंत सांपडलेल्या मुरुंडाचं काय करणार, जिवा ? "

" पोलिसांत द्यावा साहेब ! "

जिवाच्या सूचनेप्रमाणें आम्ही जवळच्या पोलिसठाण्यावर दाखल झालों. " जमादार, ये देखो, हमकू फलाटपर ये बच्चा मिला ! मालुम नहीं किसीका है वो ! " इंप्रेशन मारण्यासाठीं मी माझ्या नेहमींच्या पद्धतीप्रमाणें या भाषेत विचारूं लागलों. परंतु जमादारानें प्रश्न केला,

" काय इलांसा ? " तेव्हां मीं पुन्हा मराठींत सारी प्रस्तावना केली.

" असां करा. उंद्या या सकाळचं ! हेड कानिस्टेबल दादू येल त्येजला रपोट द्यावा ! मंजे तपास व्हायास हुकूम मिळेल ! "

" अरे, पण या पोराचं काय करायचं तोंवर ? "

" संगं घेऊनशानि जावा आन् सकालचा चावडीवर हजिर करावा ! "

मीं बाहेर येऊन जिवाला हकीकत सांगितली आणि विचारलें, "जिवा, मग हें काडतुस बरोबर घेऊन जायाचं आत्याकडे ?"

"मुलाला भयंकर वेड लागलंय्. दगड फेकतो, डोकं आपटून घेतो, आमच्या-वर जबाबदारी घेतां येत नाहीं, असं सांगून पाहावं, साहेब !"

मी आंत जाऊन जमादाराला त्याप्रमाणें सांगतांच त्यानें मुरुंडसाहेबांना आंत बोलावून घेतलें आणि परीक्षा सुरू केली.

"पोरा, काय नांव तुजं ?"

"मुरुंडसाहेब !"

"कुठनं आलास ?"

"मुंबईहून."

"कुटं निघाला व्हतास ?"

"घर्ली."

"कशानं ?"

"गालींतनं !" काळूराम ऊर्फ जमादार आमच्याकडे साशंक मुद्रेनें पाहून बोलूं लागला, "खय सांगतां मामा ? पोरगा चांगला श्येना हाय् ! वाः ? कुटं शिकला ये चकवायचे धंदे ? ओकील आहा जनु पुन्याकडले !" यापुढें तो जमादारी फॉर्मात आला. आम्हीं मुकाट्यानें रस्ता धरला. एकंदरींत त्या पोराचा भयंकरपणा मला चांगला पटला. जमादारापाशीं अगदीं सुतासारखा सरळ बोलला आणि आम्हांला त्यानें टांग मारली ! चीड येऊन मी तोंडांतून जीभ काढीत त्याला वेडावून म्हणालों, "कुठलं कारटं सतावतंय् कुणास ठाऊक ? रोग आहे जसा कांहीं ! कुचल्याची बी–अफूचं बोंड !"

"य टर्र–टर्र टर्र !" मुरुंडानें उलट वेडावण्यास कमी केलें नाहीं.

आत्याचा बंगला स्टेशनपासून सुमारें तीन मैलांवर होता. एल मैलभर मुरुंड-साहेब कसे तरी ओढीत फरपटत चालले. परंतु एके ठिकाणीं माझा पाय गच्च धरून स्वारीनें जी रस्त्यांत बैठक मारली, तो उठेचना. मी म्हणालों,

"ॲः ? उठ ना ! पेढे देईन घरीं गेल्यावर."

" ऊं, ऊं, दमलोंय् मी. ऊं ऊं ऊं ! मला कलेवर घ्या !"

" हें बघ, बाळ ! नको छ्ळूंस. माझा खांदा किनई दुखतो आहे जरासा ? " पायाचा विळखा जास्तच बळकट झाला. जिकीरीला आलेल्या स्वरानें तो म्हणाला, " ऊं ऊं, दुखूं द्या ; मला कलेवर बसायचं ! "

" जिवा, हा मूर्तिमंत सूड आहे बरं ! "

" शंकाच नाहीं, साहेब. मी घेतों त्याला जरा वेळ ; करायचं काय ? "

" ऊं आँ, तो नको. मला तुमच्याच कलेवर घ्या ! "

" बैस कारट्या एकदांचा टेकसावर ! " असें ओरडून शक्य तितकी धसफस् करून त्याला मीं कडेवर घेतला. तो टेकसावर देखील स्वस्थ बसला नाहीं. कांहीं वेळानें त्याच्या मांडीला बोचणारें माझे घड्याळ त्यानें काढून बेलाशक रस्त्यावर टाकून दिलें. घोड्याच्या रिकीबीसारखा एक पाय माझ्या खिशांत अडकावून स्वारी बसल्यामुळें मला जास्ती ओढाताणही करतां येईना !

आत्याच्या बंगल्यापाशीं दाखल झाल्यावर एकदम तिच्या तोंडासमोर जाणें बरें नव्हे, म्हणून कंपाउंडांत दुसरें कोणी भेटतें कीं काय तें आम्हीं पाहूं लागलों. एखाद्या घरांत जहाल कुत्रा आहे हें आपणास माहीत असलें, व आपण ज्यांवर कुत्रे नेहमीं भुंकतात अशांपैकींच एक असलों, चिखलांत पडल्यामुळें भरलेले असलों आणि आपणाजवळ एखादें कुलंगी कुत्रें असलें, तर सदरहू घरांत पाऊल टाकतांना जी सावधगिरी आपण बाळगतों, ती आतांच्या प्रसंगीं आत्याच्या बंगल्यांत शिरतांना घेणें जरूरीचें होतें. परंतु आजचा एकंदर प्रोग्रामच "आउट" झालेला असल्यामुळें आमची इच्छा सफळ झाली नाहीं. बंगल्याच्या बाहेर सर्वत्र सामसूम दिसत होती. दारापाशीं जाऊन उभें राहण्याशिवाय गत्यंतरच नव्हतें. मात्र अपेक्षेप्रमाणे दार उघडें नव्हतें व मम्मुआत्याही एकदम बाहेर आली नाहीं. उलट घरांतून रडारडीचा आणि हुंदक्यांचा आवाज ऐकूं आला.

" जिवा ! आतां कमालच झाली. अशा वेळीं आत्यासमोर गेल्यानं काय होतं ठाऊक आहे ना ? "

" वाभाडे निघतात, साहेब ! "

" मग आतां, जिवा ? पुढं झालास तर बरं होईल."

मीं हळूच दार लोटलें तों तें उघडलें. मुरुंड कडेवरून उतरण्यासाठीं धडपडूं लागला. जिवाच्या मागून मीं त्याला सरळ आंत सोडून दिला. जातां जातां त्याच्या पाठींत एक चांगला सणसणीत बुक्का द्यावयास विसरलों नाहीं. कांहीं वेळानें आंतील रडारड थांबली आणि वरच्या पट्टींतले दोन सूर आलटूनपालटून वाजूं लागले. " जिव्या ! अरे आमच्या टाट्याकडचा ना तूं ? अगदीं आयत्या वेळीं खायाला उगवलास, बावा ! काय मेले दावेदार आदल्या जन्मींचे ? जा, घालीत नाहीं गिळायला ! हो बाहेर, अन् माग भीक कुठं, नाहीं तर जा मसणांत !" यानंतर आत्या आपल्या हत्याराच्या शोधार्थ स्वयंपाकघरांत जाऊन धडपडूं लागल्याचें ऐकूं आलें. पुढें दुसरी पट्टी वाजूं लागली. तिच्या आवाजांतच रडवेपणाची झांक होती. " कोण रे चांडाळ ? बघा तरी मेले मोकळेपणीं रडूं देखील देत नाहींत. माझा खेळता बाळ उचलायची कुणाला आठवली अवदसा कुणाला ठाऊक. हो बाहेर मेल्या बेरडा ! अग आई ग, कुठं गेलास रे बाळा टाकूऽऽन ? " परंतु तोही सूर एकदम थांबला आणि पुढील नाट्यछटा ऐकूं आली. " अग बाई ! आलास का बाळासाहेब...खरं ऽ ऽ खरं ऽ ऽ काय बाई तरी चमत्कार ! कुठं गेला होतास कालपासनं ? काय म्हणतोस, बुवांनीं नेला ? कुठं ? शिनिमाला ! ताई, ताई, ए ताई, हा बघ मुरुंड आला ग परत. हंसतोय् गुलाम ! तुला काय होतंय् हंसायला ? जीव टांगून गेलास खुशाल !" यानंतर मुक्यांचे आवाज, आत्याची आणि जिवाचीं प्रश्नोत्तरें होऊन आत्या, मुरुंडाची ताती आणि तिच्या खांद्यावर बसलेला मुरुंड इत्यादि मंडळी बाहेर आली. आत्याच्या प्रफुल्लित चेहऱ्यावर शंटिंग यार्डमधील रूळांच्या फाट्याप्रमाणें चिरम्या पडल्या होत्या. तिनें प्रथम रामाला हाक मारून माझ्यावरून तांदूळ ओंवाळले आणि माझ्या पाठीवर शाबासकी देत ती म्हणाली, "पाहिलास का बाबी आमचा टाट्ट ? आज होता म्हणून तुझा मुरुंड तुला भेटला ! अशा वेळीं दुसऱ्या कुण्णाचाही उपयोग नाहीं. ज्योतिषी झाले, पोलिस झाले, देवऋषि झाले, सगळं झालं कालपासनं ! पण या हुश्शार पोरानं कसा आणला पटकन् तुझ्या मुलाला !" बाबीला मीं यापूर्वीं एकदां दोनदां पाहिलें होतें. आत्याची ती लांबची बहीण

लागत होती आणि तिचे यजमान बागलकोटास पोस्टखात्यांत होते. तिचे चिरंजीव मुरुंडसाहेब मी आज प्रथमच पाहत होतों! अर्थात् बाबीनें माझे आभार मानण्यासाठीं कांहीं शब्द उच्चारले. आत्यानें चहासाठीं स्वतः शेगडी पेटविली. जिवा तिला तत्परतेनें मदत करावयास गेला. मी बाहेरून ऐकत होतों. आस्ते आस्ते जिवानें आमची मुरुंडाला शोधून आणण्याची कामगिरी रंगविली आणि जणूं काय आम्हीं त्याला मृत्यूच्या जबड्यांतून ओढून आणला असें भासविलें. त्यासाठीं मी मुरुंडाला घेऊन धांवत्या गाडींतून माटुंग्यास उडी मारली, येथपर्यंत त्याची मजल आली.

"बाई बाई, धन्य झाली हो टाटूची!" आत्या एकदम म्हणाली.

"पण, वाईट एवढंच वाटत कीं, उडी टाकल्यावर कांकड्यांची करंडी नी खराटे गाडींतच राहून गेले, बाईसाहेब!" वाहत्या गंगेंत हात धुवून घेण्याचा जिवाचा बेत दिसला. माझ्या अपेक्षेच्या विरुद्ध आत्या अगदीं हलकेच म्हणाली, "जिवावर बेतली म्हणजे काकड्या न् खराट्यांकडे का कोणी लक्ष देत असतं, जिवा? बाळाला सुखरूप आणलान् टाटूनं हेंच पुष्कळ!"

बाहेर पडल्यावर मीं जिवाच्या हातावर एक पावली ठेवली. तो घेईना. मीं म्हटलें,

"अरे, घे रे! तुझ्या किंमतीच्या मानानं कमीच आहे; पण घे आपला!"

"मीं काय केलं साहेब?"

"तुझ्यासारखा नोकर नसता तर माझ्यावर लखपती वधारे करण्याची पाळी आली असती आज! खरं सांग, मुरुंडाला तूं पहिल्यापासून ओळखलं होतंस कीं नाहीं!"

"होय, पण खात्री नव्हती, साहेब! दादरला असतांना गेल्या वर्षीं मीं त्याला दोनदां पाहिला होता; त्याच्या स्वभावाची मात्र मला पुरी ओळख होती, साहेब!"

"मला वाटलंच, जिवा! काकड्या गेल्या, खराटे गेले, मुरुंड आला! न् प्रोग्राम बेफाम झाला!"

---

# प्रमिताम्बरा



स्त्रियांच्या गोड नांवापुरतें पाहिलें असतां एक बंगाल, और सब कंगाल, असें म्हणण्यास हरकत नाहीं. गेल्या आठवड्यांत आमच्या बारचा फार गाजावाजा झाला त्याचें कारण हेंच. प्रमितांबरा नांवाची कोणी एक नवीन बंगाली बॅरिस्टर आमच्या कोर्टांत प्रॅक्टिस करण्यास येणार म्हणून ऐकलें. पोटभाडेकरी, दरखास्ती अगर नादारी अशा कामांची माझी प्रॅक्टिस असल्यामुळें माझें यापूर्वी रोज कोर्टांत जाणें होत नसे. एखाद्या वेळीं किडनॅप किंवा रेप केस चालू असली तर आमची रोजची हजेरी लागावयाची. एरवीं फावल्या वेळांत घरींच लिफाफे तयार करीत असायची आमची स्वारी. परंतु हा बंगाल लाइट आमच्या बारमध्यें प्रकाशणार असल्यामुळें आमच्यासारख्याचे यापुढें घरीं बसून कसें भागावें ? ती येणार होती त्या दिवशीं शक्य तितका टिपटॉप होऊन मी कोर्टांत गेलों. पाहतों तों नेहमीं खुल्या गटाराप्रमाणें खळखळणारा आमचा बार ढापे टाकल्याप्रमाणें आवाज न काढतां वाहत होता. उगींच कुठें वर्तमानपत्र अगर पुस्तकाचीं पानें उघडल्याचा आवाज, एखादी दाबलेली शिंक किंवा जांभई याव्यतिरिक्त आमच्या बाररूममध्यें पूर्ण शांतता नांदत होती. नेहमींचे ही ही, हु हु आणि आंत पाऊल टाकतांच जाहीरपणें उच्चारलेले कोटिक्रम त्या दिवशीं कांहींच झाले नाहींत. मी जरा खाकरून म्हणालों,

" काय भुंकार, झोंप घेतां वाटतं ? "

" शुक् शुक् "

" अॅ हॅं ! डबींत बुडालास वाटतं परवांच्या ? "

" इश्शः " एकदम मेंदूत वणवा पेटलेल्या मास्तराप्रमाणे दटावीत भुंकारांनीं पलीकडच्या खोलीकडे अंगुलिनिर्देश केला. खरेंच ! त्या खोलीला आज विशेष महत्त्व आल्यासारखें दिसले. प्रत्येकजण येतांजातां आंत मान तिरकी करून जात होता.

" अरे पेटऽऽन ! " मीं मोठ्यानें हांक मारली.

" गप रे ! "

पेटनसारख्या नाठाळाकडून हे वद्धपणाचे आविर्भाव झालेले पाहतांच मला आश्चर्य वाटलें. मी त्याच्याजवळ गेलों. बेटा टाइम्स्मध्यें गुंडाळलेला शांतिदूत वाचीत होता. मीं विचारलें,

" काय भानगड आहे रे बुवा ? कर्फ्यू ऑर्डर निघालीय् जशी कांहीं ! "

" प्रमितांबरा आली आहे ! "

" अस्सं " मी समजलों आणि लगेच हें नवीन मॉडेल पाहण्यासाठीं त्या खोलींत डोकावलें. अर्रर्रर ! तें मॉडेल तर फोटोतल्या इव्हॅन्स् फ्रेजरच्या तावदानांत दिसतात तशापैकींच दिसलें. मीं जरा घाबरून पेटनला विचारले,

" काय रे, ती सध्या प्रायव्हसीमध्यें आहे; अन् हे लोक किती असभ्यपणानं वागताहेत पाहा ! "

" हं ऽऽ टाटया, या कल्पना तुझ्याही मनांत येऊं लागल्या, आं ? "

" तसं नव्हे रे ! पण खांदेबिंदे उघडे दिसताहेत म्हणून म्हटलं."

" तिचं नांवच प्रमितांबरा, बाबा ! "

अरेच्या ! त्या नांवाची फोड इतका वेळ मीं केली नव्हती. आतां त्यावर पूर्ण विचार करण्यासाठीं मी सिगरेट पेटवूं लागलों. इतक्यांत भडकलेला दिवा पाहिल्याप्रमाणें भुंकार माझ्याकडे धांवले; त्यांनीं माझ्या तोंडांतली सिगरेट ओढली, बाहेर भिरकावली आणि त्वेषानें पण दबलेल्या आवाजांत म्हणाले,

"मिस्टर बिनबुडबुंध, स्मोकिंग बाहेर,व्हरांड्यांत, समजलांत? हॅव् सम मॅनर्स."

संध्याकाळीं भुंकारांच्या नेतृत्वाखालीं बारतर्फे प्रमितांबरेच्या स्वागताचा समारंभ मोठ्या थाटानें झाला.

एका आठवड्यानें तें इलेक्ट्रिक वातावरण गेलें; परंतु प्रमितांबरेची इच्छा सर्वांवर हुकमत चालवीत होतीच. तिच्या ओळखीमुळें "का रे बुवा, आज कुणाची तेजी ?" हा प्रश्न बाररूममध्यें सकाळीं पाऊल टाकतांच विचारण्याचा प्रघात पडून गेला. एक दिवस असाच बाररूममध्यें गेल्याबरोबर मीं तो प्रश्न केला असतां " आपलीच, टाटासाहेब ! " म्हणून पेटनचें सस्मित उत्तर आलें. ती खोली व फर्निचर माझ्याभोंवतीं गरगर फिरूं लागलीं. मीं कसें तरी हसें दाबून विचारलें,

" म्हणजे ? "

" कलकत्त्याच्या एका कॉलेजची क्रिकेट टीम नुकतीच पुण्यांत आली. "

" बरं, मग ! "

" मॅचिंग टूरवर आहेत ! "

" हं. "

" सिस्टरना क्रिकेटचा शोक बराच दिसतो. "

" सिस्टर ? "

" अरे पी. एम् ! "

" चक् ! वा ! "

" पुनाबारची एक टीम करून टेस्ट मॅच द्यावी असा बूट निघाला. "

" पी. एम्. ची इच्छा ? "

" प्रत्येकाचा क्रिकेटी पराक्रम विचारून घेऊन तिनें टीम निवडली आहे ! "

" याला म्हणावं स्पोर्ट ! "

" तुझी कॅप्टन म्हणून नेमणूक झाली आहे ! "

हें ऐकून मात्र सगळें कोर्ट उलट्या दिशेनें फिरूं लागलें !

" पेटन, थट्टा करतोस वाटतं ! "

" छे ! मींच तुझं नांव पुढं केलं ! "

" पेटन, अरे मित्राचा बळी दिलास ! मूठमाती घातलीस, वाफेच्या रुळाखालीं घातलास, महापुरांत उलटा बुडवलास ! पेटन्, मला क्रिकेट आवडत नाहीं ! "

" शाळेंत सीनियर टीममध्यें शील्ड मॅच खेळून सेंचरी काढल्या वगैरे तूंच मला सांगितलंस, तें विसरलास वाटत ! "

मी चपापलों. थापा मारतांनामुद्धां विचार करून मारल्या पाहिजेत हें आतां माझ्या लक्षांत आलें. मीं म्हटलें,

" पेटन, क्रिकेट म्हणजे खुनी खेळ ! त्यांतून किती दिवसांत मला सराव नाहीं."

" टाटया, आतां माघार कां ? वी ए स्पोर्ट अँड फेस इट् ! "

" प्रमितांबरेची इच्छा ! " मीं मोठया कष्टानें पुटपुटलों.

" थ्री चियर्स फॉर अवर कॅप्टन ! " पेटन ओरडला ! त्याचा बहुगुणित प्रतिध्वनि निघाला. सगळ्यांच्या शेवटीं एक मोठी " ऊ ऊ ऊ ऊ " आली आणि माझा हात हिसकला गेला. शेकहँड करणाऱ्या व्यक्तीकड पाहतांच मी लाजलों. ती तीच अन् तशीच होती !

" हॅल्लूऽऽ मिस्टर बोंबडथंद ! "

" आय् मीन टाटासाहेब, बिन्धुडवंध." मीं दुरुस्ती केली.

" ओ ! आय ॲम् सॉरी ! " ती बारीक आवाज काढून आणि फिरत्या टेबल-पंख्याप्रमाणें, पण जरा झपाटयानें माना हालवीत म्हणाली, " सो यू ॲक्सेप्टेड् हं ? छ्यान झ्याला ! ओ, इट वुड वी सिम्प्ली वण्डरफूल ! आमच्या वारच्ये लोक तेनच्या टीमला स्यामना टेणार हां ! बहूत मज्ज्या येऊन ज्यॉइल, हॅः हॅः ! "

" थँक्यू ! आय शॅल ट्राय माय बेस्ट ! " मीं कसेंबसें उत्तर दिलें.

पुन्हा चियर्स झाल्या. सामन्याची टाइम, टीम, ग्राउंड वगैरे विचारून मी घरीं आलों.

घरीं जातां जातां माझ्या मनांतला क्रिकेटचा धसका बराच कमी झाला. मी स्वतःचीच समजूत घालूं लागलों, " आयुष्यांत नेहमीं टोले हे खायचे आहेतच. पण पी. एम्.सारख्या वंग तरुणीच्या शब्दाला मान देण्यासाठीं टोले देण्याचा

आणि खाण्याचा असला हा प्रसंग एकदाच यावयाचा ! तेव्हां मना, एवढें क्रिकेट दिव्य करण्याचा धीर धर ! अरे, आपल्या पुराणांत सीतेसाठीं रामानें, रुक्मिणी-साठीं कृष्णानें........."

पण एव्हांना मी माझ्या खोलींत आलों होतों. जिवा ज्ञानप्रकाश वाचीत खिडकींत उभा होता. मीं त्याला ताबडतोब पुढच्या आठवड्याचा माझा कार्यक्रम सांगण्यास सुरवात केली. या नवीन साहसाची कल्पना ऐकतांच जिवानें तोंड चंबूसारखें केलें. हा अपशकुन पाहून मी खेंकसलों,

"एः ! जिव्या, काय झालं तोंडाची सोंड करायला ?"

"ज्ञानप्रकाशांत कलकत्ता टीमची माहिती छापली आहे, साहेब ! ती वाचावी म्हणजे !—"

"रब्बिश् !"

"आपण वेळींच कॅप्टनशिपचा राजिनामा द्यावा साहेब; आपल्याला झेपायचा नाहीं असला कार्यक्रम !"

"कोण म्हणतो लेकाचा ?"

"आपण वकील,—पट्टीचे आहां, साहेब !"

"जिवा, मुद्द्यावर ये पटकन् !"

"चहूंकडे लक्ष ठेवून आपल्या डोक्याचा बचाव करायचं साधायचं नाहीं आपल्याला !"

"तुझं डोंबल आहे कीं क्रूड ऑइल एंजिन आहे,कुणाला ठाउक ? तुला या गोष्टी समजायच्या नाहींत. साह्मे श्री प्रतिवसति ! सगळ्या बारची अब्रू आज जिनं माझ्या हातांत दिली ती प्रमितांबरा........."

"च्यल्क्" असा आवाज काढून जिवा आढ्याकडे पाहूं लागला !

"जिव्या, ती लुंगीसुंगी नाहीं ; बॅरिस्टर आहे, समजलास ?"

"वाचलंय्, साहेब ; पण त्या टीमचे कॅप्टन् वस्त्रभूषण आहेत !"

"ऍं ! वस्तरा...?"

" नाहीं साहेब, वस्त्र–भूषण ! ' "

" असतील ! "

" हार्ड बोलर आहेत ते ! "

" असेनात ! "

" बोलिंग रायफल म्हणतात त्यांना, साहेब ! "

" जाने दो ! "

" हॅटट्रिक करतात ! "

" हमकू क्या ? "

" बॉडीलाइन् बोलिंगमध्यें निष्णात आहेत, साहेब ! "

" आँ ! " मीं जिवाच्या हातांतला ज्ञानप्रकाश घेतला. पाहतों तों जिवानें सांगितलेले वस्त्रभूषणचे सर्व पराक्रम ठळक टाइपांत दिसले. पण छापलेल्या सर्वच गोष्टी खऱ्या नसतात ! नेहमीं नेहमीं जिवाचा हा वरचष्मा काय कामाचा ? तो का जेलर होता माझा ? त्याच्या नादीं लागून आयुष्यांत एकदाच येणारी ही महापर्वणी फुकट दवडणें मूर्खपणाचें आहे, असा निश्चय करून मी म्हणालों,

" सटक्लीफचा बाप आला तरी आतां टाटा डगमगणार नाहीं. मग या वस्त्र्याची काय गोष्ट ? चलो, क्विक मार्च ! तो ट्विलचा शर्ट न् पँट टाक लॉंड्रींत. अर्जंट पाहिजेत म्हणावं ! "

" जी साहेब ! " जिवाचें तोंड अगदींच जमीनदोस्त झाल्यासारखें दिसलें. मी मनांतून खूष झालों.

डेक्कन जिमखान्यावरील क्रिकेट मॅचचा देखावा नेहमींप्रमाणेंच असल्यामुळें त्याचें येथें वर्णन करण्याचें प्रयोजन नाहीं. विशेष उल्लेखनीय गोष्ट इतकीच कीं, पूना बार इलेव्हनच्या तंबूंत त्या दिवशीं एकजात पगडबंद वीर चमकत होते. पगड्यांच्या त्या तांबड्या समुद्रांत तीन चारच होड्या तरंगत होत्या. अर्थात् या प्रमितांबरा आणि तिच्या मैत्रिणी असाव्यात, हें लांबूनच ओळखतां येत होतें. मी गेलों त्या वेळीं बाकीचे खेळाडू आपआपल्या ठराविक पोषाखांत, गुडघ्याखालीं

लफ्फे, हातांत मोजे आणि कपाळाला लुटारू फॅशनचे रूमाल बांधून तयार होते. लोखंडी दुकानांत आचारी लोक ज्या तऱ्हेनें हेलकावे देत झारे निवडीत असतात, त्याप्रमाणें प्रत्येकजण आपापली बॅट निवडण्याच्या कामांत गुंतला होता. अर्थात् ओलीसुकी झाली असली पाहिजे. मीं टेंटांत प्रवेश करतांच एकच हलकल्लोळ उठला आणि माझा पोशाख चढविण्यासाठीं प्रमितांबरेने दोन कोरे करकरीत लफ्फे उचलले. लग्नसमारंभांत अनोळखी बायका घाणा भरण्यासाठीं दोन मुसळें उचलून नवरदेवाच्या पुढच्या टोपल्यांत ठेवतात, त्या वेळीं त्याला जसें वाटतें तसें मला वाटूं लागलें. निदान पाय न कापण्याइतका धीर यावा म्हणून मीं पेटनला विचारलें, "काय रे, आज पगर्डाशी ?"

"काय करणार बाबा ? एकदां शरीरसलामत घरीं गेलों म्हणजे मिळवली ! त्यांच्या टेंटांत पाहिलेस का कसे एकेक टोणे दिसताहेत ते ! चार रोचर्री बट्स आहेत आणि तो चौधरी का कोण आहे, त्याची सिक्सरशिवाय बात नाहीं म्हणतात ! बेफाम हिटर आहे ! ! आपण पडलों वकील. डोकं शाबूत तर पोट भरणार !"

"हं, आतां आलं ध्यानांत, टाळकीं सडकूं नयेत म्हणून या ढाली हं ?" मीं खोंचून विचारलें.

कोणत्याही मॅचच्या अगोदर नको असलेला पाऊस हटकून पडावयाचा पुण्यांत रिवाज असल्यामुळें लवकरच पावसाची झिमझिम सुरू झाली. प्रमितांबरा लफ्फे घेऊन तंबूच्या बाहेर उभी राहिली आणि मला हाका मारूं लागली. रणांगणावर निघालेल्या नवऱ्याचा केशराने मळवट भरणाऱ्या राजपुतान्या, दांडीच्या मोहिमेवर गांधींना ओवाळणाऱ्या सुवासिनी, वगैरे चित्रें माझ्या डोळ्यांसमोर उभीं राहिलीं. परकीपणाचें वातावरण नाहीसें करण्याच्या हेतूनेंच तिनें एक एक्स्ट्रॉ स्ट्रॉंगची वडी मला दिली आणि म्हटलें,

"टॅार्टासाहेब ! आज्यू बारला झुवर सक्सेस यॅावा हं !"

"हं हं ! मला एवढी प्रॅक्टिस नाहीं."

माझे टीमवाले पाठीमागून कुत्सितपणें मला हसताहेत असा मला भास झाला. परंतु मागें बघून अणखी शोभा कशाला करा, म्हणून मीं तोंड वळविलें नाहीं. प्रमितांबरा हंसत हंसत माझ्या पायांना पॅड बांधूं लागली. आतां मात्र मला कसेंसेंच होऊं लागलें. बऱ्याच मंडळींत एखाद्या तरुण पाहुणीनें घोड्यावर निघालेल्या नवरदेवाच्या डोळ्यांत चुकून राहिलेलें काजळ घालावें तसा हा एकंदर प्रकार मला वाटूं लागला. " नाहीं ! नको ! मी बांधतों ! " म्हणून मी खालीं वांकलों. पण तिनें तें जुमानलें नाहीं.

" आमाला हौस हाय मेकप द्यायची ! तुमी तर क्यापटन ! " असें कांहीं तरी व आणखी बरेंच ती मला सांगत असावी. कारण ग्राउंडवर जमलेला आरडाओरडा करणारा तो समुदाय पाहून माझा मेंदूही बधिर होऊन गेला ! सहजगत्या माझें लक्ष सामनेवाल्यांच्या टेटकडे गेलें. आमचा हा आउटडोअरसीन त्यांच्या टीमपैकीं एका व्यक्तीला आवडत नसावा असें दिसलें. तो गृहस्थ अत्यंत चमत्कारिक परंतु रागीट चेहऱ्यानें आमच्याकडे पाहत होता. पॅड बांधून झाल्यावर प्रमितांबरा उठली आणि स्वतः तयार करीत असलेला गणपति कसा झाला आहे तें लांबून पाहावें त्याप्रमाणें ती माझ्याकडे लांबून तिरकसपणें पाहूं लागली. सामनेवाल्यांतला तो मत्सरी प्राणि आतां आणखीच चिडलेला दिसला. त्यानें आपली बॅट दाण्‌दिशीं जमिनीवर आपटली आणि प्रमितांबरेच्या उपरिनिर्दिष्ट अभिनयाला ग्राउंडभर टाळ्या मिळालेल्या ऐकून त्यानें तोंडच फिरविलें ! एकदरींत वातावरणांत आणखी एका संकटाचीं चिन्हें उत्पन्न होऊं लागलीं आहेत हें मीं तेव्हांच ताडलें. माझ्याशीं शेकहॅंड करुन प्रमितांबरा म्हणाली, " विश यू दि बेस्ट सक्सेस, टॅटयासाहेब ? "

" थॅंक यू ! " म्हणून माझ्या ठेवणींतलें एक हास्य मीं तोंडावर खेळविलें. तिनें माझ्या पाठीवर थोपटलें. मला वाटतें, गाडीवाला आपल्या बुजणाऱ्या बैलावर जसा हो हो करुन थोपटतो तशी तिची कृति दिसली असावी. कारण आमच्या तंबूंत आणि ग्राउंडभर हंशा उठला ! त्या मत्सरी सामनेवाल्याची नजर मात्र रागानें माझ्यावर खिळून राहिलेली दिसली आणि एकदा तर त्यानें ओठ दांतांच्या आंत घेतलेले दिसले ! मी एक प्रकारच्या अभिमानानें फुलून गेलों !

आमची पहिली जोडी बॅटिंग करूं लागली. प्रमितांबरा तंबूच्या बाहेर माझ्या खांद्यावर हात ठेवून खेळ पाहत उभी राहिली. तिचा हात नुसता स्थिर असता तर ठीक होतें. पण आमच्या गड्यानें एखादा चांगला टोला दिला, किंवा उंचावरून पडणारा कॅच विरुद्ध बाजूच्या फील्डरकडून निसटला, म्हणजे त्याचा तिच्या देहावर जो परिणाम होत असे त्याचा सर्व वचपा माझ्या खांद्याच्या सांध्यावर निघूं लागला. मला अवघडल्यासारखें होऊन गेलें. मागें पाहण्याची सोयच नव्हती. कारण तिच्या मैत्रिणी हसत होत्या, हें जरी तोंडावरील रुमालामुळें ऐकूं येत नव्हतें, तरी त्यांच्या शरीरावर ज्या तुफानी लाटा उसळत, त्यावरून समजून येत होतें. वकील मंडळी तर काय, मी केव्हां मागें बघतों आणि मोठ्यानें हॅा हॅा करायला सांपडतें याची वाटच पाहत होती. लग्न झालेलीं म्हातारीं जोडपींही उघडपणें अशीं उभीं राहत नाहींत. अगदीं आधुनिकांतला आधुनिक तरुण आपल्या घरांत पत्नीची पुष्कळ चेष्टा करील, दोघें अगदीं अरेतुरे करतील; पण भर पटांगणांवर खांद्यावर हात ठेवून अशा तऱ्हेनें? छे छे!

पण हिला बोलून तरी कसें दाखवावें? कारण, जो पहिल्यानें आक्षपाचा शब्द काढील, तोच पापी ठरणार! हाच इथें माझ्या जागीं हिचा घोडा असता तर? त्यावर रेलून उभे राहावयास ती संकोचली नसती आणि तो घोडाही तिच्या रेलण्यानें अंग चोरता ना! पण आमचें सेक्सअपील नडतें, त्याला काय करणार? ग्राउंडांतील सर्व डोळे मॅचपेक्षां मजकडे लागलेले आहेत हें मला समजण्याइतकी गूढ संवेदना माझ्यांत शिल्लक होती. तो हॅटट्रिक करणारा बोलिंग–रायफल तर जास्त जास्त लाल पडत चालला होता. जणूं काय त्याच्यावर सूर्यकिरणांची रासा. यनिक क्रिया घडत असावी! त्याचें लक्ष आमच्या दिशेला असल्यामुळें बहुतेक वाइड बॅाल पडत होते. मधून मधून स्टार्टच्या वेळीं तो आमच्याकडे पाहून मुठी वळी. बिचारा वज्रभूषण! मला त्याची कींव आली. भलत्या वेळीं त्याचें सेक्स-अपील बळावल्यामुळें सगळा नास होत होता. एका स्त्रीमुळें एवढा बहाद्दर मातीमोल ठरतो, हें पाहून मला स्त्रीमाहात्म्याचा अचंबा वाटला. विशेषतः त्याचा वाइंड बॅाल जातांच ती आपले उघडे तांबुस हात वर करून "प्लेड" म्हणून

ओरडे, तेव्हां तर लाजेनें तो तोंडच फिरवी! त्यांच्या तंबूंतले लोक त्याच्या या कौशल्यनाशामुळें थक्कच झाले होते. प्रत्येक वाइड बॉलबरोबर तेही वाइल्ड होऊं लागले. "बॉलिंग चेंज्"च्या आरोळ्या वारंवार ऐकूं येऊं लागल्या.

आमचा स्कोअर चढत चालला; आमचे खेळाडू आस्थेनें खेळत होते. त्यांत त्यांच्या बॉलरचा पुरा धबधबा उडालेला. टिफिनच्या वेळीं प्रमितांबरा नुसती सोडावॉटरप्रमाणे फसफसत होती! माझ्या आणि चांगल्या रन्स् काढलेल्यांच्या पाठीवर सारख्या शाबासक्या उडत होत्या. बिचारा वज्रभूषण एका कोपऱ्यांतून प्रमितांबरेकडे पाहत ओठ आवळीत बसला होता. त्याचे इतर सहकारी प्रमितांबरेची ओळख करून घेण्याच्या नादांत गुंगले होते. अर्थात् परिचय करून द्यावयाचें काम मीच करीत होतों. शेवटीं रागाचा कोंडमारा असह्य झाल्यामुळें वज्रभूषण टाकटूक करीत बाहेर गेला. प्रमितांबरेनें माझ्या कानांत कांहीं सांगितल्यावरून मीं एक थंडया पिक–मी–अप्चा ग्लास घेऊन त्याच्या मागोमाग गेलों आणि म्हटलें,

"हॅलो वज्रभूषण, घ्या ना हें!" माझी मान आवळून टाकण्याचा अभिनय करून कॅप्टनसाहेब गुर्रर्र करीत चालूं लागले. मी पुन्हा त्यांना गांठतांच एकदम तोंड फिरवून त्यांनीं विचारलें,

"काय रे कॅप्टनच्या सोया? मघांपासून फार उतास चालल्या आहेत तुझ्या गमजा! त्या अर्धनग्न..."

"हां! बॅरिस्टर प्रमितांबरेविषयीं बोलतांना सभ्य भाषा वापरा!" मीं दरडावलें.

"वाऽरे बॅरिस्टर! भर ग्राउंडावर मघांपासून सिनेमा करणारी ही लकतरवाली बॅरिस्टर हं? हंः!"

"पुन्हा सांगतों, सभ्य भाषा वापरली नाहींस तर काय होईल याचा विचार कर." मी पवित्रा धरून बाह्या गुंडाळूं लागलों. परंतु एकाएकीं नाकावर बसलेल्या गुच्च्यानें जेव्हां माझ्या डोळ्यांपुढें तारांगण दिसूं लागलें, तेव्हां लागलीच भानावर आलों. "डिस्क्रीशन इज् धी बेटर पार्ट ऑफ् व्हॅलर" हें आमच्या घराण्याचें ब्रीद मी विसरत चाललों होतों. मीं प्रसंगाचें महत्त्व जाणून म्हटलें,

" हें पाहा, वस्त्रभूषण, भलता प्रसंग करशील तर बेलाशक बोंब ठोकीन ! ती देवता माझी मैत्रीण आहे, आणि तिचा मान राखणं हें मीं माझं पवित्र कर्तव्य समजतों. चल, चालूं लाग पाहूं, शोभा नको असेल तर ! "

" ओ हो, मैत्रिण हं, जिवलग मैत्रिण ? "

" बॅर्‌ बॅर्‌. माझी प्लेटोनिक मैत्रिण आहे, समजलास ? जा, काय करायचं असेल तें करून घे ! " एवढें ठांसून उत्तर दिल्यावर, दुसऱ्या गुच्च्यासाठीं त्याचा हात चमकलेला पाहून मीं काढता पाय घेतला.

माझी बॅटिंग आली. टेंटांतून मी निघतांना प्रमितांबरेनें जें केलें, त्यामुळें वस्त्रभूषण उधळला ! उधळला म्हणजे काय, भडकलेलें तट्टू खुरांनीं जमीन उकरतें त्याप्रमाणें तो आपल्या बुटांनीं पीच उकरूं लागला. बंगाल्या पुरा नर्व्हस झाला असावा, दुसरें काय ? आमची जोडी त्याचें बोलिंग चांगलेंच कुदवणार अशी प्रत्येकाचीच अपेक्षा असली पाहिजे. परंतु ही समजूत हळू हळू बदलत चालली. तो फॉर्मांत आला आणि त्याचें तें नामांकित हार्ड बोलिंग सुरू झालें असावें. चेंडू येई केव्हां, बॅटवर आपटून परत जाई केव्हां, तेंही दिसेनासें झालें. मी मारे नायडूपद्धतीनें माझी बॅट उभ्याआडव्या पातळींत फिरवीत होतों. हेतु असा कीं, चुकून चेंडू तिला अडकलाच, तर बाउंडरी उडावी. वस्त्रभूषणानें आपला स्टार्ट वाढविला आणि त्याच्या तंबूंतून आस्ते आस्ते टाळ्या मिळूं लागल्या. चेंडूलाही माझ्या शरीराचें आकर्षण उत्पन्न झालें असावें. एकाएकीं माझ्या तंगडीवर कांहीं तरी आपटलें आणि तें उडविण्यासाठीं बॅट फिरविली, तीही त्याच जागीं आपटली. दगडावरून उडणाऱ्या टायरप्रमाणें मी डाव्या तंगडीवर उडालों. आमच्या तंबूंतून प्रमितांबरेची किंकाळी मला ऐकूं आली. कांहीं झालें नाहीं असें दाखविण्यासाठीं मी पुन्हा खेळूं लागलों; पण पुनः जो गोळा आला तो नेमका बरगडींत बसला. आतां मात्र नाइलाज झाला ! नेहमीं क्रिकेट वीर ज्या पद्धतीनें अशा वेळीं कोसळतात, तसा मी विकेटपाशीं कोसळलों ! नाल मारावयास काढलेला बैल जसा चौखूर पडतो, तशा तऱ्हेची ही पद्धत असते ! मी पडतांना वस्त्रभूषण तोंड चोरून हसला. परंतु लागलीच सोडालिंबूचा

आरडाओरडा झाला आणि थोडया वेळाने मी जखमी झालेल्या योद्धयाप्रमाणें लंगडत, एक हात पी. एम्.च्या खांद्यावर टाकून टेंटांत परत गेलों. माझ्या नांवापुढें फळ्यावर " जखमी होऊन परत " अशी पाटी लागली.

दुसऱ्या दिवशीं मी टेंटांत पडून होतों. त्यांच्या दुर्दैवानें पीच फार खराब झाल्यामुळें त्यांचे गडी पटापट औट होत होते. थोडया वेळानें आमचा जय होऊन आमच्या तंबूंतला तांबडा समुद्र एकदम वाहून गेला. रिकामटेकडीं पोरें कलकत्ता टीमच्या तंबूपाशीं जाऊन टोप्या, खडे वगैरे उडवून हूप हूप करूं लागलीं. बंगाले चिडले आणि ग्राउंडावर बरेच समुद्र एकत्र मिसळले. पगडया, टोप्या, छत्र्या इत्यादिकांनीं वातावरण धुंद होऊन त्यांतून धबाधब आवाज निघूं लागले. लवकरच आमचे बारकरी वारकऱ्यांसारखे पगडयांच्या पताका फडकावीत पळूं लागले. या धुमश्चक्रींतून मला घरीं नेण्यास जिवा केव्हां येतो त्याची मी वाट पाहूं लागलों. इतक्यांत तंबूच्या पिछाडीला दोन माणसें बंगाली इंग्रजी मिश्र भाषेंत बोलूं लागलीं. दोघांचेही आवाज भावनोर्मीप्रमाणें निघत होते आणि त्यांतल्या त्यांत स्त्रीचा आवाज माझ्या ओळखीचा वाटला. त्यांच्या भाषणाचा सारांश पुढीलप्रमाणें—

" प्रमितांबरा, क्षमा कर ! तुझ्यासाठीं अपयश घेतलं. "

" फार उपकार झाले ! "

" त्या भुक्कड वकिलाच्या नादीं लागून तूं मला कायम अंतर देणार काय ? "

" भुक्कड ? "

" तो ग, क्रिकेट आणि विटीदांडू एकच समजणारा बुडबुडाचा ! "

" अस्सं ! म्हणून द्वेषानं बॉडीलाइन टाकून त्याला तुम्ही निकामी केलात वाटतं ! "

" प्रमिते, तुझ्याशीं असं वर्तन करणाऱ्याचा मला द्वेष कां वाटूं नये ? "

" कां वाटावा ? माझी कुठं तुम्हाला किंमत होती ? म्हणून तर आलें मी माझं नशीब काढायला ! चारी वाटा तुला मोकळ्या आहेत असं आपणच सांगितलंत ना ? "

" प्रमिते, चुकलों मी ! हे बिम्बुडबुंध त्या वेळीं माझ्या लक्षांत आले नव्हते. मग येतेस ना परत ! "

" कशाला ? पुन्हा खेटरं खायलाच कीं नाहीं ? फार थोडे पण फार खर्चाचे कपडे मी वापरतें, तें सलतं तुमच्या डोळ्यांत. मी बॅरिस्टर आहें; पैसे मिळवूं शकेन हें ध्यानांत आलं ना आतां ! " तिचा आवाज वास्तविक रडकुंडीला आल्यासारखा वाटला. कदाचित रडत असेलही !

" प्रमे, तुझ्यावांचून शून्य आहे सगळं! येतेस ना परत? " नेहमींचीच भाषा. दोघेंजण एकमेकांना खेटून चालत गेल्याचा आवाज ऐकूं आला. इतक्यांत जिवा आला. त्यानें एक चिठ्ठी माझ्या हातांत दिली, आणि खालीं वांकून म्हणाला,

" बॅरिस्टरीणबाईनीं आतां इतक्यांत दिली, साहेब ! "

मी चिठ्ठी वाचून म्हणालों,

" जिवबा, केवढं आश्चर्य ! ती प्रमितांबरा कॅप्टन वज्रभूषणाची बायकोच निघाली. मी समजत होतों...... "

" पाय ठणकतो का, साहेब ? या गौडबंगालाच्या पायीं आपला पाय मात्र..., "

" अं: ? काढीन आठ दिवस लोळून, त्यांत काय आहे ? पण जिवा, हें अस्सं होतं बघ ! नवराबायको भांडतात; नवरा चारी वाटा दाखवतो, तिच्या पश्चात त्याला घर खायला उठतं, मुकाट्यानं तिची वाट पाहूं लागतो ! शेवटीं वाटेल तशी पायधरणी करतो ! "

" चमत्कार आहे, साहेब ! "

" ए: चमत्कार कसला आलाय् ? अरे, हें सेक्स अपील बरं ! "

" म्हणजे काय, साहेब ? "

" तुला नाहीं कळायचं तें, जिवा. त्याला कॉलेजांत जावं लागतं ! "

---

# इष्क्-ए-कत्तल !



" तें जमायचं नाहीं, साहेब ! उगीच परत जायला उशीर होईल."

" जमायचं नाहीं म्हटलं म्हणजे आलं सगळं त्याच्यांत. तें कांहीं नाहीं; जिवा, आपण नाहीं बुवा सोडणार हें पाहायला."

" साहेब, पर्वती..."

" उडत गेली तुझी पर्वती ! काय लावलंय् मघांपासून पर्वती पर्वती ? आतां आदामबाग ! पर्वती नाहीं, समजलास ?"

" होय, साहेब."

" हं, मग हो पाहूं ओणवा !"

" ओणवा ?"

" ऍ: ? इन्फन्टीच्या पुस्तकांतला ओणवा तूं पाहिला नाहींस ? मनुष्यानं चतुष्पाद कसं व्हावं तें ठाऊक नाहीं म्हणतोस ?"

" ठाऊक आहे, साहेब; पण जाणारे येणारे..."

" जाणाऱ्या येणाऱ्यांना डरतोस तूं ? जिव्या, फुकट रे इतके दिवस बिन्बुड-बुंधांचं अन्न खाल्लंस ! झुरळ उचलून टाकायला सांगतोंय् कीं काय ? एवढा घाबरलास तो ?"

" नाहीं साहेब, पण आम्हीं खानापूरकर,"...असें कांहीं तरी कुरकुरत जिवा कुंपणाशीं ओणवा झाला. वहाणा काढून मी झटकन् त्याच्या पाठीवर उभा राहिलों व म्हणालों, " काळजी नको तुला. मी तुलाही पाहून देईन मग !" माझ्या

## जीते रहो जिवा !

उराशीं बाळगलेल्या बऱ्याच महत्त्वाकांक्षांपैकीं एक आज अशा रीतीनें सफल होत असलेली पाहून " सफल जन्म आजि जाहला ! " ही ओळ समोर " आजी " उभी नसतांही माझ्या तोंडून बाहेर पडली असल्यास नवल नाहीं. कारण बागेंतील कंपाउंडांत एका बोलपटाचें शूटिंग चालू होतें. राजदरबाराचा सीन असावा. " असावा " म्हणावयाचें कारण असें कीं, त्या देखाव्याने माझ्या आजपर्यंतच्या राजदरबारविषयक कल्पनांना एक जोरकस धक्का बसला ! आदमबागेंतला तो राजदरबार कुठल्या तरी फुंकरलेल्या नाटक कंपनींतील सामानाचा एक थातुर मातुर ताबूत होता. नटांपैकीं प्रत्येकास आठ आठ दिवस राजदरबारच काय, परंतु इंद्रसभा घडण्याचा सराव असला पाहिजेः याची उत्तम साक्ष म्हणजे एम्बॉस्‌ड् लेटर्सप्रमाणें त्यांच्या अंगावरील फासळ्या व इतर उटंटळ दिसणारीं हाडे ! तेथील वातावरण पांढरपेशांच्या स्मशानयात्रेप्रमाणें भेसूर आणि शोकात्मक वाटत होतें. नायिकेचें कसलें तरी पद चालू असून त्याबरोबर डायरेक्टरसाहेबांच्या पुढीलप्रमाणें मूक सूचना चालू होत्याः नायिका त्या पटापट अमलांत आणीत होती. डायरेक्टरनीं हातांचीं मुटकळीं करून आळोखेपिळोखे दिले—म्हणजे " अंतःकरणांतून उसासे, कढ आणि उमाळे येताहेत असें दाखवा ! "

बोटांनीं थुंकी काढून डोळ्यांना लावली.—म्हणजे " डोळ्यांत पाणी डबडबूं द्या ! "

डोळे चोळ चोळ चोळले.—म्हणजे " डोळे जरा लाल करा ! "

शर्टचा पुढला भाग टर्रकन् फाडला.—म्हणजे, " हृदय शतशः विदीर्ण होत आहे. असें दाखवा ! "

मला फार गंमत वाटूं लागली. एवढी कसरत करूनही डायरेक्टरसाहेब खूष झाले नाहींत. त्यांनीं त्यांच्या धोतराचा बोळा करून वर उचलला, आणि तो ते हातांनीं आवळूंचिवळूं लागले. बहिऱ्यामुक्यांच्या शाळेंतल्या पंतोजीची कशी त्रेधा होत असेल, तें त्या वेळीं दिसून आलें. त्यांच्या त्या खुणांचा अर्थ बऱ्याच वेळानें नायिकेच्या लक्षांत आला. तिच्या हिरव्या पातळाला लावलेल्या बेगडी काठांचा चिर्रफिर्र आवाज होत होता, तो होऊं देणें इष्ट नव्हतें ! तिनें झटकन् साडीच्या

काठांचा बोळा करून वर उचलला. परंतु त्याबरोबर पायांतील कागदाच्या तोरड्या त्याला अडकून, वटवाघळांसारख्या तिच्या हिरव्यागार पातळाला लोंबकळत राहिल्या. हातावर सणसणीत छडी बसलेल्या बेरड विद्यार्थ्याप्रमाणें डायरेक्टरसाहेब स् स् करीत, टिचक्या वाजवीत उड्या मारूं लागले.

मला आणखी मौज वाटली. "सफल जन्म" हें पद मी आतां मोठ्याने म्हणणार होतों. पण त्यांच्या इष्क्-ए-कत्तलांत आपला मायामच्छिद्र निष्कारण कशाला कालवा, या पोक्त विचाराने आवाज चढूं पाहत असतांही त्याला खालीं खेचलें आणि नुसताच नाचूं लागलों. इतक्यांत माझ्या पायाखालचा आधार निसटला आणि मी धप्दिशीं एका डब्यावर पडलों. डब्याचा जो आवाज झाला असेल—तो इष्क्-ए-कत्तलमध्यें तोफेच्या सलामीप्रमाणेंच उमटला असेल ! आपल्या देशी चित्रपटांत एकाएकीं असले धडाड्धुड्ड आवाज कां निघूं लागतात याचें रहस्य आतां मला उमगलें. खात्रीनें माझ्यासारखे कलाप्रेमी लोक कुंपणाजवळच्या डब्यावर केव्हां केव्हां धडपडत असलेच पाहिजेत. मी उठून बसलों. बाजूला जिवा ओणवाच होता; आणि एक आफ्रिडी पठाण माझ्या चिमुकल्या जिवाची रोटी करून टाकण्याच्या तयारींत समोर उभा होता. क्षणार्धांत मी समजलों कीं, नाचण्याच्या नादांत जिवाच्या पाठीवरून मी त्या हिंस्र पशूच्या पाठीवर आलों असलों पाहिजे. अर्थात् आतां लोणी, लोणचें आणि लोणकढी या लोणत्रयीशिवाय गत्यंतरच नव्हतें. पठाणानें जबडा वासून विचारलें,

"तुम लोग् इधर क्या कर रहें ?"

"कसूर माफ, हजरत ! बंदा कुच नहीं करता था !"

तो उसळला.

"इज्झतसे च्यलूं ! हम बोलते इज्झतसे च्यलूं बम्मन ! शब् मालुम होगया मेरेकूं अभी. येही जगेपर तुमारा खिमा बनाके दुंगा !" इतकें बोलून त्यानें आपला जबरदस्त सोटा उगारला. इतक्यांत जिवा मध्यें पडला; आपल्या डोक्याजवळ ग्रामोफोनचें हँडल फिरवावें त्याप्रमाणें त्यानें पठाणाला अभिनय करून दाखविला.

" ऐयषा ? " असें संदिग्धपणानें बोलून पठाणानें मजकडे चमत्कारिक तऱ्हनें पाहिलें आणि तो आदमबागेच्या फाटकांतून आंत गेला. मीं भानावर येऊन विचारलें,

" जिवा, कोण हा ? मास्तर विठ्ठल ? "

" छे, साहेब ! "

" मग सँडो, चंदा, हाडी पहाडी ? "

" तो नट नव्हे, साहेब. खोकलखां रखवालदार आहे ! "

" जिवा, शूटिंग चोरून पाहणं हा गुन्हा आहे ? "

" असं दिसतं साहेब ! "

"कोण म्हणतो असं ? चल पाहूं तुझ्या त्या खोकलखांकडे; चांगलं पिनलकोडच दाखवतों त्याला ! च्या ! कांहीं कायदा समजेना न् उमजेना, नि उगीच सोटे उगारायचे ? "

" मला वाटतं इथून लवकर पाय काढावा, साहेब ? "

" जिवा ! मी क्रिमिनल वकील आहें ! छप्पन खोकलखांना कोकलत जेलखान्याची हवा खायला पाठवीन, समजलास ? "

" आपल्याला आज रात्रीं सर धोधोकरांच्याकडे पार्टीला जायचंय्, साहेब ! "

" बरं, मग ? "

" पार्टीला जातां येण्याइतकं धडधाकट राहायला नको का ? शिवाय घरीं दुसरा कोटही नाहीं. "

" इतक्यावर मजल येईल, जिवा ? "

" फाटकाकडे पाहा, साहेब; कितीजण काठ्या घेऊन येताहेत ते. "

" च् च्, जिवा, इतका कसा रे अजागळ तूं ? अरे, चित्रपटांत ठोकाठोकी ही असायचीच. त्यांच्या शूटिंगपैकींच आहे हा सीन. "

" हें लक्षण निराळं दिसतंय्, साहेब. ते पाहा कॅमेऱ्याच्या तिवईच्या काठ्या उसकटून काढीत आहेत. "

" बरं बाबा, तूं हो घटकाभर शाहाणा! खरं आहे, शीर सलामत तो धोधो-करपार्टी! चल लवकर ' टॉप् ' टाक ! " आम्ही धूम ठोकली !

गांवांत येतांच लोकलज्जेस्तव आम्हाला " फर्स्ट " टाकावा लागला.

" ए: जिवा ! "

" साहेब ? "

" खरं म्हटलं म्हणजे आपण पळून आलों; नाहीं ? "

" खोटं नाहीं, साहेब ! "

" काय रे, पण तो पठाण कसा आला त्या कुंपणापाशीं ? "

" त्याचं असं झालं, साहेब..."

" जिवा ! ' वाचकांशीं हितगुज ' नको आहे ! "

" मला पठाणानं जेव्हां " काय करतोस," असा प्रश्न केला, तेव्हां मीं त्याला सांगितलं, माझा रुपया खालीं सांडला आहे तो शोधतोंय्! पठाणच तो ! तोही चतुष्पाद होऊन रुपया शोधूं लागला, आणि चुकून तुम्ही......पण माझी चूक झाली, साहेब ! "

" एकंदरींत ठार जिरलोंच, जिवा ! डोळ्यांपुढं गोड स्वप्न पडत असतां एकदम अपघात झाला; एखादा नवसलेला सत्यनारायण विसरलों तर नाहीं ना ? पाहा पाहूं डायरी काढून कालपरवां एखादा सत्यनारायण " ड्यू " होता कीं काय तें ? '

" छे, साहेब ! चित्रपटाचं शूटिंग पाहायचं होतं, साहेब ? "

" जिवबा, त्याच्यासाठींच जगलोंय् रे. नाहीं तर पठाणाला पाठ दाखवीन का मी ? '

" हं ! "

" हें काय ? आहे का तुझी शहामत माझी इच्छा सफल करायची ? कांहीं टॅक्टिक असली तर बोल. उगीच उसासे टाकायला काय होतंय् ! "

तो दिवस कंटाळवाणा गेला. रात्रीं स्वप्नांत सारखी आदामबाग न् इष्क-ए-कत्तलच दिसत होती.

## जीते रहो जिवा !

दुसऱ्या दिवशीं त्रासिक अंतःकरणानेंच उठलों. प्रातर्विधि आटोपून चहा घेत, वर्तमानपत्र चाळीत खुर्चीवर लवंडलों. इतक्यांत दारामागून बारीक हाक ऐकूं आली, " रावसाहेब ! "

" कोण पाहिजे तुम्हाला ? टाटासाहेबच का ? या, आंत या ! " आलेल्या व्यक्तीच्या स्वागतासाठीं मी उठलों आणि ती व्यक्ति आंत येतांच वाळूंत उभ्या केलेल्या रोपट्याप्रमाणें मी पुन्हा इझीचेअरवर उमळून पडलों ! आलेल्या स्त्रीची वेषभूषा थोडक्यांत सांगायची म्हणजे काळ्या लवंगेवर हलव्याचा कच्चा पाक चढवावा त्याप्रमाणें दिसत होती. मिशनरी नेटिव्ह ख्रिस्त्यांपैकीं ती कोणी तरी असावी असें वाटून मीं म्हटलें, " टेक दि चेअर, प्लीज ! " पण ती बसली नाहीं. पोलक्याच्या खिशांतून तिनें एक चिटोरें काढून माझ्या हातांत दिलें. त्यावरून नजर टाकतांच सारें समजलें. उदेपूरच्या एका श्रीमंत कुलीन घराण्यांतली ती मुलगी; एका महापुरांत तिचें घर व तिच्या खेरीजकरून बाकीचीं माणसें वाहून गेल्यामुळें ती उघडी पडली: अशी ही सुंदरी नांवाची मेवाडी स्त्री मजकडे मदत मागण्यासाठीं आली होती. " नावांत काय आहे ? " या म्हणीचा साक्षात् दृष्टांतच होता तो. भिक्षापंथापैकीं एका मार्गाचीं हीं ठराविक लक्षणें कोणास ओळखतां येणार नाहींत ? मीं चवताळून विचारलें, " क्या चाहते, माइजी ? " पांची बोटांनीं हवेचा भुरका मारीत, प्राण कंठाशीं आणून ती म्हणाली, " दीन अनाथ भूकी है ! कुच् धरम करेंगा माबाप ? "

" माबाप तो दिवाना होगया. चलो, रस्ता पकडो. हातपांवसें कुछ काम नहीं कर सकते ? खाली पैसा, ये जमानेमें कोई देता नहीं ! "

अधिकच गहिंवरून ती म्हणाली, " रावसाव, कुछ कामधंदा मिलेगा तो जरूरहीं करेगा ! "

मी थिजून गेलों ! असें उत्तर देणारी ही पहिलीच भिकारीण भेटली ! मी तिला घालवून देण्याच्या उद्देशानें म्हणालों, " ए देखो, हमारे घरकी झाडपट्टी करेंगें. ? "

" हां जी ! "

आश्चर्याचा धक्का ओसरून मी ठिकाणावर येण्यापूर्वींच तिने पगार ठरवून घेतला. पदर आडवा खोंचला आणि कोंपऱ्यांतली केरसुणी घेऊन आपले काम सुरू केले.

पहिल्यानें तिला केराचा डबा दाखविला, भांडीं कुठे घासायचीं, खरकटें कुठे टाकायचें, अन् बंब कसा पेटवायचा, या गोष्टी दाखविल्या : परंतु पुढे मात्र कसेसेंच वाटूं लागलें. लग्नानंतर स्वतःची बायको नवीनच घरांत वावरूं लागली, तर जीव किती दचकतो न् विचकतो. मग ही तर अनोळखी स्त्री, माझ्यासारख्या एकटया प्रॅक्टिशनरच्या घरांत केरवारा करीत होती. मुकाटयाने एक पुस्तक तोंडासमोर धरून खिडकीजवळ बसून राहिलों. ती मात्र अगदीं सरावल्याप्रमाणे माझ्या घरांत बेलाशक वावरत होती. सतरंज्या मुद्दामच तिनें खिडकींत उभें राहून झटकल्या, फरसावर भांडीं घासायला गेली, तिथे खरकटयावरून दुसऱ्या दोन बायांशीं बाचाबाची केली. शेवटीं मी ज्याला भीत होतों तें झालेंच ! तिचें आगमन हां हां म्हणतां जाहीर झालें. बेटन आला आणि खुशाल " चहा दे, फीस्ट दे " करीत बसला. मीं त्याला तोडून बोलतांच " आतां काय बुवा, टाटासाहेब, तुमच्या घराला शोभा आली आहे जिकडे तिकडे. यायचीच म्हणा. सुंदर अलंकार मिळाल्यावर कां नाहीं येणार ? वहिनींना वकीलीणकाकू म्हटलं तर राग नाहीं ना यायचा ? " असले कुचेष्टेचे शेरे मारूं लागला. शेवटीं मीं त्याला " बोडके पार टी हाउस " मध्ये नेऊन यथेच्छ चारला, तेव्हां ब्याद गेली ! पेटनमामा आले ते रस्त्यावरूनच कॉंग्रॅट्स् देऊं लागले. पुन्हा वर "अरे पण हो टाटासाहेब, आतां असं ओरडून चालायचं नाहीं." हा शिष्टपणा करायला चुकला नाहींच. आळींतल्या बायका मुद्दाम आमच्या वाडयांत एकेक खेप टाकून जाऊं लागल्या. परत जातांना " इश्य ऽ ऽ ऽ ! माणसं का हीं ? काय काय करतील तेवढं थोडं आहे. राहिलाय् कुणाला धर्बंध हल्लीं ? कोण पार्वतीबाई ? इश्य् ऽ ऽ मला हो काय विचारतां ? पाहून या तुम्हींच सगळा प्रकार ! बाई ऽ ऽ ग ऽ ऽ ! " असें म्हणून अंगावर शहारे आल्याचा आविर्भाव करीत. त्यांचे हे, मला ऐकूं जावे या उद्देशानेंच निघत असलेले उद्गार ऐकून आणि तोंडावरील चमत्कारिक हालचाली पाहून अस्सल बिनबुडबुंध झाला तरी कुठवर धीर

धरणार ? माझ्या घराचा नवीन अलंकार रस्त्यावर फेकून देण्याचा माझा निश्चय झाला. मीं जिवाला हाक मारली.

" जिवा, मनुष्याच्या बुद्धीवर दैवाची सत्ता चालते असं तूं नेहमीं म्हणतोस ! "

" होय साहेब ! "

" तरीच जिवा, मी नकळत हें लचांड करून बसलों ! नाहीं तर बिनबुड बुंधांच्या घराण्यांत आजवर कधींही न घडलेली गोष्ट आतां कां घडावी ? "

" आपल्या हातच्या नाहींत या गोष्टी ! "

"ठीक आहे तर ! जिवा, तिला महिन्याचा पगार देऊन घालवून दे."

" घालवून देऊं साहेब ? "

" कानांत शिरणारी घोण वेळींच बाहेर ओढून काढायला नको का ? "

" घोण ? "

" तर काय, जिवा ? ती आल्यापासून आपल्या घरांत एखादा ऊन पाण्याचा झरा अचानकपणें उडूं लागावा, किंवा तीन पाय, एक हात, आणि अकरा डोळ्यांचं नवीन बालक जन्माला यावं त्याप्रमाणं सगळी पेठ चमत्कार पाहायला घुसते आहे ! "

" जी साहेब, सांगून पाहतों मी ! " जिवा घरांत जाऊन कांहीं वेळानें बाहेर आला. त्या वेळीं त्याच्या हातांत निऱ्या केलेलें धोतर, पंचा व इतर कपडयांच्या घडया होत्या. मी त्याला खुलविण्याच्या इराद्यानें म्हणालों,

" वा, जिवा, आज अगदीं अप-टु-डेट थाट दिसतोय् ! पुण्यांतून गव्हर्नर-साहेबांची फेरी व्हावयाची असली, म्हणजे नेहमीं धूळ खात पडलेल्या आपल्या रस्त्यांचा कमिटी जसा तात्पुरता थाट करते, तसा दिसतो आहे हा बेत ! "

" म-मा-मी नाहीं केला, साहेब ! "

मी ताडकन् उठून बसलों. अगतिक निराशेचा झटका येऊन मीं विचारलें, " म्हणजे जिवा ? "

" कमिटीचंच काम, साहेब ! "

" कमिटी ? "

" आंघोळीला पाणी उपसलंय्; लवकर चला; असा त्यांचा निरोप आहे. "

" त्यांचा ? "

" सुंदराताईंचा ? त्या जात नाहींत, साहेब ! "

खुर्चीच्या हातांना गच्च आवळून मी विचारलें, " जात नाहींत, जिवा ? "

" आपल्या घराचा निरानिपटा केल्याशिवाय त्यांना चैन पडायचं नाहीं- आणि श्रमाशिवाय पैसा घेणं हें खऱ्या रजपुतानीचं ब्रीद नव्हे ! "

" हे तिच्याच तोंडचे शब्द; होय ना ? "

" अक्षरन् अक्षर ! "

" जिवबा, हा ताप दोषी ठरणार तर ! "

" आंघोळीला जावं लवकर ! "

" काय म्हणून, जिवा ? माझी लहर येईल तेव्हां जाईन मीं ! ती कोण मला सांगणार ? "

" नाहीं तर ती मोठ्यानं हाका मारीत सुटेल, साहेब ! "

मी दचकलों ! जिवाचा पॉइंट बरोबर होता. सकाळपासून तिनें मला " टाटा-साहेबजी " म्हणून दोनच हाका मारल्या; पण अशा खणखणीत, कीं त्या ऐकतांच मला दरदरून घाम सुटला ! आतां ती हांक आणखी एकदां ऐकूं यायला नको, म्हणून मी लगबगीनें स्नानगृहांत दाखल झालों. स्नान करीत असतांनाच पुढील योजनेचा मीं सविस्तर रीतीनें विचार करून ठेवला. रोजच्या " केसी " तलें खऱ्याचें खोटें आणि खोट्याचें खरें कसें करून दाखवावयाचें याबद्दल विचार करण्याची वकिलांची ठरलेली वेळ स्नान करीत असतांनाच असते. मग इथें तर माझ्या घराचा कबजा घेण्याचेंच काम होतें !

दुपारीं जेवणें वगैरे उरकल्यानंतर मी हळूच मागच्या दारीं गेलों. त्या बाईला हलकेच हांक मारली, " माइजी, जरा इधर आएंगे ? "

ती समोर येतांच मीं चांचरत सुरवात केली " ये देखो माइजी,... "

परंतु बराच वेळ या शब्दापुढें माझी प्रगति होईना! शेवटीं कंटाळून आपले चिखलानें बरबटलेले हात माझ्यापुढें करीत ती म्हणाली, "बोलो जलदी! कटोरा सब् वैसाच पडा है!"

"रहने दो कटोरा! अभी तुमारी चाकरी हम नहीं चाहते. तुम अपना पगार लेकर यहांसे फौरन् चले जाव!" मीं पटकन बोलून टाकलें.

"मैं? और यहांसे निकल जायगी? नहीं, नहीं, कभ्भी नहीं!"

"यह बात? तुम बहुत काम इमानदारीसे करतें रहे! ये सच् है! मगर हमकूं कल ये गाम छोडकर मालेगामकूं जानेका है!"

"जानेका तो जाव, टाटाजी! हम् तुमारा घर समालेगा! ये नोकरीमें मेरा दिल तूरत लग गया! अबी जानेकी बात छोड दो!"

"ऐसा न करो, माईजी! तुम् देखते नहीं, की मेरे घरमें दुसरी कोई औरत नहीं. इसी वास्ते हमारे घरवालेंकू तुमारा इधर रहना अछा नहीं लगता."

"टाटाजी, ये घरवालेकी कायकी मिरास? मै देखुंगी सबकू. आप तोसीस न करो. ये देखो, इतना काम मेरे तरह दुसरी कौन करेंगी?"

"पण ए माइटले..." मी एकेरीवर आलों. परंतु मला पुढें बोलूं न देतां माझ्या हनुवटीस हात लावून तिनें मुक्यासारखा आवाज काढला आणि मुलाला समजावितात त्याप्रमाणें हरतऱ्हेनें मला समजावून ती पुन्हा पाटावरवंटा धुण्यांत गर्क झाली. आजूबाजूस बायका जमूं लागल्या होत्याच. एक दुसरीला हळूच म्हणते, "पाहिलंत का, कृष्णाताई, कसं नाटक आरंभलंय् तें. मला नव्हतं गऽऽ बाई वाटलं, कीं हा गृहस्थ असा निघेल म्हणून! मम्मुआत्यांची शिस्त किती कडक! वाखाणावी तेवढी थोडीच! तिच्या करडया अमलांत हा घराच्या बाहेर फिरकायचा नाहीं. पण म्हणतात ना, दैव फिरलं म्हणजे बुद्धिही फिरते! यांचे हे चाळे तिच्या दृष्टीस पडते तर? म्हातारीनं जळक्या लांकडांनीं बडवला असता!......"

या चर्पटपंजरीनें मात्र माझ्या मनावरील माझा ताबा अजिबात उडाला. मी बेफाम झालों. घरकामांत चूर झालेल्या त्या उदेपुरी मांजरीला मी मानगुट

पकडून दारापर्यंत फरफरा ओढीत नेलें, आणि बाहेर ढकलून दिले; त्या अवसानांत भोंवतालीं कोण आहे व ते काय म्हणतील याचा मला बिलकुल विधिनिषेध राहिला नाहीं. रागाच्या ऊष्ण कटिबंधांत जी भाषा मी वापरतों तिचा त्या मेवाडीवर यथेच्छ वर्षाव केला. माझ्या पाठीमागें लोक हसत होते. कोणी म्हणाले, "घ्या, पहिल्या दिवसापासूनच ही दशा, पुढं काय दिवे लावतील तें दिसतच आहे ! बाकी, देवाच्या घरचा नेम चुकायचा नाहीं. या हातावरचा झाडा त्या हातावर मिळलाच पाहिजे !" मी हतबुद्ध झाल्यामुळें अशा प्रलापांना उत्तरें देण्याची मला शुद्धच राहिली नाहीं. बिनवुडबुधांच्या घराण्यांतील अब्रूचं ही आज खोबरें करूं पाहत आहे ; मम्मुआत्याच्या नांवालाही हिच्यामुळें काळें फांसलें जाणार आहे ; या दोन विचारांनीं माझ्या डोक्यांतल्या नाड्या तडातड उडत होत्या. त्या कुब्जेचें पुन्हा तोंड पाहणें नको म्हणून मी दार लोटण्यास पुढें झालों तों ती हात पसरून रडत पुढें आली आणि माझ्या पायाला मिठी घालून मोठ्यानें म्हणाली, "साहेबजी, दयासागर, अनाथ अबलाके रक्षण करो ! मैं अभागिनी येहि चरणकी दासी हूं ! ये परमपूज्य पॉव हम कल्पांतींही छोडेंगे नहीं ! जबतक मेरे कुडीमें प्राण रहेगा, तबतक आपकी सेवा करनेवाली मैं लाचार हूं ! मेरा सेवाव्रत का दीनदयाळ रक्षण करेगा !" तिचे केंस मोकळे सुटलेले असून शोकविव्हल स्थितीचा अभिनय करीत ढसढसा रडत ती जी पाय धरून बसली, ती कांहीं केल्या सोडीचना. बेभान होऊन मी ओरडलों,

"चांडाळणी ! चल, निकाल यहांसे एकदम !" पुढें मीं लाथही उगारली; पण ती बसली कीं नाहीं तें नीटसें आठवत नाहीं. माझ्या मस्तकांत एकाएकीं रक्त चढूं लागलें. आणि समोर एक काळा बुरखेवाला ग्रामोफोनचें हॅंडल फिरविण्याची क्रिया करीत आहे असा भास झाला. मी घेरी येऊन पडलों आणि कोणीं तरी माझें डोकें मांडीवर घेतलें असावें !

मी शुद्धीवर येतांच इकडे तिकडे कावऱ्याबावऱ्या मुद्रेनें पाहूं लागलों. हळू हळू मला मागील प्रसंगाची आठवण येऊं लागली, आणि मीं जिवाला एकदम विचारलें, "जिवा, ती गेली का रे ?"

“ केव्हांच ! ”

“ जिवा, तें भविष्यदीप आण पाहूं इकडे ! हां, बरोबर; कर्क राशीला काय लिहलंय् तें वाच. इच्छित कार्यांत अडथळे, सांपत्तिक हलाखी, अपमानाचे प्रसंग, मित्रांकडून त्रास आणि स्त्रीसौख्य मनाप्रमाणें मिळणार नाहीं ! चक्क लिहिलं आहे, जिवा. ”

“ ठोकताळे जमले, साहेब ? ”

“ विचारतोस काय, जिवा ? ज्योतिषावर विश्वास नाहीं वाटतं तुझा ? पाहूं काय आहे तुझ्या हातांत ? ”

“ चेक आहे साहेब ! ”

मी त्याच्याकडे सहानुभूतीच्या दृष्टीनें पाहत म्हणालों,

“ अरेरे, जिवा त्या बयानं तुझं डोकंही फिरवलेलं दिसतं ! पुण्यांतला सर्वांत मोठा गणपति कुठं बसतो, जिवा ? ”

“ गायकवाडवाड्यांत, साहेब ! ”

“ गायकवाड्यांत कां बढाई आळींत ? ”

“ एकूण एकच साहेब ! ”

“ अन् बुधवारांत ? ”

“ त्याच्या खालोखाल, साहेब ! ”

“ आहे; जिवा, तुझं डोकं ठिकाणावरच आहे ! बरं पाहूं तें चिटोरं. ” मीं त्याच्या हातांतून तो कागद हिसकून घेतला. उलगडून पाहतों तों खरेंच, माझ्या नांवाचा चारशें रुपयांचा चेक होता. खालच्या सहीकडे बोट दाखवून मीं विचारलें, “ जिवा, हा भुसकुटे कोण ? ”

“ जीवन्मृत सिनेटोनचे मालक ! ”

“ म्हणजे ! परवांचीच ही कंपनी; पण त्याचं काय कारण मला चेक लिहून द्यायचं ? ”

“ इष्क–ए–कत्तलचा एक सीन तुम्हीं त्यांना काढून दिला, साहेब ! ”

“ म्हणतोस तरी काय, बाबा ? ”

" कालची ती मुंदरा ? "

" बाप रे ! जिवा, विषारी वल्लींचीं मुंदर नांव ठेवण्याचा आपल्या भाषेंत प्रघातच दिसतो. उदाहरणार्थ बचनाग, कुसुंबा, मोरचूत, इत्यादि ! "

" ती मुंदरा जीवन्मृत कंपनीची नटी आहे, साहेब !"

" आहे ? छे जिवा, पूर्वी असेल ! "

" नाहीं, साहेब; ती हल्लीं तिथंच आहे. त्यांना खरोखरीच्या घरांतला, काल झाला तस्सा हुबेहूब सीन पाहिजे होता. तो आपण चांगला वठवलात म्हणून तो चेक ! आजच्या मिने-समाचारांत डायरेक्टरांनीं तुमचा गौरव केला आहे. "

" या टाटाच्या जिवाचा असा खेळखंडोबा करण्याचा तुला काय अधिकार आहे, जिवा ? काय करूं रे ? त्या वेळीं तो कॅमेरा मला काळ्या बुरखेवाल्याप्रमाणं वाटला नसता तर त्याचा खोकाच करून दिला असता, त्याच्या हातांत ! माझ्यासारख्या घरंदाज माणमांना थोड्यासाठीं सिनेमानट बनवला कीं त्यांनीं ! ऑः ! मेवाड...भुस्कुटे...मुंदरा...च्या ! पुणं म्हणजे काय राणीचा बाग वाटला या फुकटयांना ? "

" माझी चूक झाली, साहेब. पण आपणच म्हणालां होतांन कीं, आपल्याला चित्रपटाचं शूटिंग पाहायचं म्हणून प्रथम......"

" जाऊं दे जिवा ! होगया सो होगया. शूटिंग पाहायचं होतं खरंच, पण हें प्रकरण थोडं जास्तच झालं आहे. मम्मुआत्याच्या नजरेस जर तो चित्रपट चुकून पडलाच तर आमची कंबख्ती ! "

" ती नको काळजी. कालच्या त्या प्रसंगीं तुमचा चेहरा रागान इतका बदलला होता, कीं मम्मुआत्यांनीं तो जवळून पाहिला असता तरी त्यांना ओळखतां आला नसताः मग पड्यावरील चित्र ओळखणं लांबच. ! "

— –

# व्रात्यस्तोम! धिंडवडे!!



उजाडत आम्ही दरवाजाबाहेर आमचें काम झपाट्यानें उरकीत होतों. घरांतील आवराआवर आटोपून, दाराबाहेर बराचसा कचरा पसरून देण्यांत जिवा गर्क झाला होता. दाराला कुलूप लावून मीं फळीवर एक चिठ्ठी डकविली. सर्व काम बिनबोभाट तडीस गेल्यामुळें समाधानाचा एक सुस्कारा टाकून मीं म्हटलें,

" ए! काय असेल तें असो, जिवा; एखाद्या दिवशीं सगळीं कामं अशीं सुरळीत पार पडतात, कीं यंव्! नाहीं तर एखाद्या दिवशीं कांहीं करा, तें फिसकटायचंच. वाच तर खरी पाटी ही! "

" घरांत उंदीर पडूं लागल्यामुळें बिनबुडबुंध वकील खालील पत्यावर गेले आहेत..."

जिवा संथपणें वाचूं लागला. पुढें पत्त्यावर एक शाईचा मोठा टिपका होता. मी म्हटलें,

" बस् जिवा! खालच्या पत्त्याशीं आपल्याला काय करायचं आहे? "

" नको साहेब? "

" च्यक्! जिवा, असा धोक्याचा इषारा वाचल्याबरोबर मम्मूआत्याच काय, पण उंदीरमांजरं देखील आपल्या घराच्या वाऱ्याला उभीं राहायचीं नाहींत! पाहिल्याबरोबर तडक स्टेशन गांठतील! काय शक्कल आहे, जिवा? "

" काय साहेब! "

"ऍ, हॅ, अगदीं हेडक्लार्कचा आव आणला आहेस! अरे, ही योजना प्रोफेसर आइन्स्टीनच्या तरी डोक्यांतून निघाली असती का? असले मेंदु वाटेल त्या माळावर पिकत नसतात, जिवा!"

"जी होय, साहेब!"

"तुला पराक्रमी मुरुंड, ऊर्फ मम्मुआत्याचा पहिला बाजीराव आठवत असेलच!"

"बॅबींचा मुरुंड?"

"हां, तोच. आत्या व बॅबीसहित आज दहांच्या गाडीला ती स्वारी इथं थडकणार!"

"जहालिम त्रिफळाच, साहेब!"

"वंडरफुल! काय बोलतोस पण! ऑः! आतां तूंच सांग, यापेक्षां चार दिवस बोर्डिंगांत सुखाचे चार घांस खाल्लेले पुरवले, नाहीं का?"

"पण साहेब,"........जिवा इकडे तिकडे पाहून कुरकूरूं लागला. मी चिडून म्हणालों,

"बस कर तुझी पणजी! आटप आतां; आळींतलीं माणसं जागीं व्हायच्या आंत आपल्याला..."

माझें वाक्य पुरें झालें नाहीं. "मामा मामा" अशा आरोळ्या ठोकीत कोणी तरी लाडावलेल्या कुत्र्याप्रमाणें माझ्या हाताला हिसके देऊं लागलें. मी दचकलों! अशा अवेळीं असा कोणचा भाचा उगवला तें पाहूं लागलों; परंतु पाहण्याची गरज पडली नाहीं. आलेल्या व्यक्तीनें माझ्या गळ्यापर्यंत उडी मारली आणि मी मागें पाहण्याच्या आंत मुरुंड माझ्या गळ्यांत लोंबकळूं लागला. स्वारी आज विलक्षण फार्मांत दिसली! माझें काळीज छातींतून निसटून खालीं खालीं सरकत जाऊं लागलें. या अनपेक्षित आगमनाचा आत्यानें चटकन खुलासा केला. "सोमणांचे सदूकाका मिळाले सोबतीला, म्हणून निघालों झालं, पहिल्याच गाडीला!" समय साजरा करण्यासाठीं म्हणूनच जरा हंसून मी उत्तरलों,

"आत्या, धोरणांत तूं आमच्या कॅंडनसाहेबाच्या वर आहेस, बुवा!"

## जीते रहो जिवा !

" कोण कोडू हा ? "

" कोंडू नव्हे ! कॉंडन म्हणून आमचा एक साहेब आहे, तो ! " एकदर परिस्थितीचा खुलासा कसा करावा याची मला सारखी धाकधूक वाटूं लागलीच होती. खुलासे मागण्याच्या कामांत आत्या जितकी रावबहादुर होती, तितकाच खुलासे देण्याच्या कामांत मी अगदीं गुंजाळ होतों ! अर्थात् आतां बार उडणारच या भीतीनें मीं अर्धमेला झालों होतों. उगीचच डोकें खाजवीत आणि खिशांत हात घालून बाहेर काढीत मी जिवाकडे केविलवाण्या मुद्रेनें पाहत होतो. अखेर आत्यानें एकदांचें विचारलेंच,

" अन् टादु, हें केव्हां झालं बाबा ? " हें विचारतांना चष्म्याच्या भिंगाएवढीं झालेलीं बुबळें घेरा ठेऊन बाकी साफ केलेल्या डोक्यासारखीं दिसत होतीं आणि आवाज, आत्यासारख्या बायका फलाण्यांच्या सुनांच्या कितव्या खेपेच्या कितव्या महिन्यांची चौकशी करूं लागल्या म्हणजे जसा होतो, तसा होता ! मी बोलायला चांचरत आहें असें पाहून जिवा मध्येच म्हणाला, " आपल्या आळींतली हवा बिघडली होती, बाईसाहेब ! "

" अस्सं ऽऽ मग आतां ? "

" आतां नाहीं कांहीं गडबड ! म्हणूनच तर आज घराची झाडझूड करायला आलों ! आपण येणार म्हणून आज चारांपासून टाटासाहेब उभे आहेत बाईसाहेब ! "

" पाहा ! देव करतो तें बऱ्याकरतां: आधींच्या गाडीनं आलों म्हणून टाटूचं काम वांचलं. कामाला आतां आणखी चार हात मिळाले. " इतका वेळ टकमका पाहत उभ्या असलेल्या बॉबीनें प्रतिपादन केलें. तें मंजूर करून आम्हीं दारावरील तें चिटोरें फाडून टाकलें आणि घरांत प्रवेश केला.

दुसऱ्या दिवसापासून घरावरील व त्याबरोबरच विवेकशक्तीवरील माझा ताबा हळू हळू उडून जाऊं लागला. देव व स्वयंपाकघर यांचा ताबा आत्यानें आपल्याकडे घेतला. घरांतील भांडींकुंडीं व चहापाणी बॉबीकडे गेलें; फर्निचर, पुस्तकें व इतर

हरएक जंगम वस्तूवर मुरुंडाचा अम्मल सुरू झाला. त्यानें स्वतःकडे एक प्रकारें पाहणीकाराची भूमिका घेतली. माझ्या घरांतील अमुक एका वस्तूची तपासणी त्यानें करायची अशी ठेवलीच नाहीं! आळींतल्या इतर घरांवरही त्यानें उपकार करण्यास कमी केलें नाहीं. एखाद्या मजबूत इमारतीला वाळवी लागावी, त्याप्रमाणे आमच्या आळींत " मुरडा उठलाय्! " असे जो तो म्हणूं लागला. माझ्या घरीं अशीलावर अशीले येऊं लागलीं. परंतु प्रत्येकाची तक्रार एकच. " टाटासाहेब अहो, तुमच्या या पोरानं सगळ्यांच्या तोंडच पाणी पळवलंय् हो! " त्यावर त्यांचे साक्षीपुरावेही घरांतच होऊं लागले. मीं म्हणावें, " बाळ मुरुंड, असं करूं नये! आपल्या घराण्याला ते शोभत नाहीं. असं केलस तर तुला एखादा बुवा धरून नेईल. " मुरुंडानें बेधडक माझ्या गीतारहस्याचीं पानें फाडून माझ्यापुढें करावीं, आणि म्हणावें, " मामा, आमच्या अगोदर तो तुम्हांलाच धरून नेईल. तुम्हीं त्याला दहा दिवस खायला पुराल! हं, एवढ्या आगबोटी करून द्या ना आम्हाला. दोन बबांच्या पाहिजेत हां! "

शेवटीं वैतागून मीं आत्याला म्हटले,

" अग, आवर जरा त्याला. आपल्या घराचा एक खकाणा करतोय् तेवढा पुष्कळ झाला. पण दुसऱ्याच्या घरांतनं...... " परंतु तिनें आणि बॉबीनें एकवटून म्हणावें, " टाटया! अरे, मूल म्हटलं म्हणजे जरा व्रात्य असायचंच. लोकांना दुसऱ्याचं चांगलं पाहवत नाहीं म्हणून उगीच राईचा डोंगर करून सांगायची संवय असते. तूं तरी कांहीं व्रात्यपणा केल्याशिवाय नाहीं एकदम वकील झालास! " एवढे ऐकण्याचा अवकाश, कीं मुरुंडाने माझ्या खांद्यावर चढावें आणि डोक्यांत " खारका " मारण्यास सुरवात करावी! खोडकर मुलांच्या लीला ऐकण्यांत आणि वाचण्यांत लोकांना गंमत वाटते. सिनेमांतील बाळकृष्णाचे खेळ पाहतांना आपण हंसतों. पण ज्या वाचकांच्या घरांत एखादा जिवंत बाळकृष्ण अगर मुरुंड असेल, त्यांनाच माझ्या स्थितीविषयीं सहानुभूति वाटेल. घरांत बाळू आला, कीं चाकू, कात्र्या, काडयांच्या पेटया, रॉकेलचा डबा व दिवे या जिवापलीकडे जपण्यासारख्या वस्तु होतात. मुरुंडासारखा गुणी बाळ असेल तर त्यांच्यासाठीं सेफच पाहिजे!

लवकरच आमच्या आळीकरांनीं अशीलाची भूमिका सोडली व ते उघड वर्दळीवर येऊं लागले. मुरुंडाला बेलाशक हाड हाड घराच्या बाहेर करून काढून ते आपापलीं दारें बंद करूं लागले. आमच्या घरांत सकाळपासून संध्याकाळपर्यंत बाचाबाच्या चालत; त्यांत आत्या व बॅाबी पुढाकार घेत. आणि लोकांच्या तक्रारींनीं आपला उपमर्द होतो, हें दाखविण्यासाठीं मुरुंडही मधून मधून सूर काढण्यास कमी करीत नसे. या रोजच्या तमाशाला कंटाळून मीं एक दिवस आत्याजवळ मोठ्या धाडसानें गोष्ट काढली,

" हॅः हॅः ? आत्या, बाकी तूं पाहतेच आहेस म्हणा ! "

" म्हणजे काय, टाट्र ? "

" विशेष नाहीं ग ! आपलं रोज चाललंय् हें ? "

" बरं मग ? "

" मग काय, आत्या ? कुणी पक्षकार सध्या माझ्या वाऱ्याला उभा राहत नाहीं ! "

आत्यानें फटकन् टाळी वाजवून एक गिरकी मारली. बहुधा डांस मारला असावा असें समजून त्या संधीचा चांगला फायदा घेण्याच्या हुषारीनें मीं म्हणालों,

" ओः ! डांस झालेत; होय ना आत्या ? हें ड्रेनेज झाल्यापासून किनई, फार मलेरियस झाली आहे इथली हवा ! बाहेरच्या चांगल्या हवेंतून आलेल्या माणसांना तर अतिशय बाधते. चार दिवस गेले नाहींत तोंच मलेरियानं आपला एकेक आडवा व्हायला लागतो ! " माझ्या बोलण्याचा परिणाम तिच्यावर काय झाला हें न समजल्यामुळें मी गंभीर चेहरा करून पुढें म्हणालों, " त्यांतल्या त्यांत मुलांबाळांची फार काळजी वाटते ! "

" असूं दे रे डांस असला तर ! पण मीं टाळी कां वाजवली तें आहे माहित ? तूं पक्षकार म्हणालास, त्या क्षणींच मला पक्षाची आठवण झाली. "त्यांचा" पक्ष करायचा राहिला आहे यंदा ! "

एकूण बाहेरचे नाहींत, तर स्वतःच " पक्षकार " बनवावयाचें तिनें ठरविलेलें पाहून मी चांगलाच विरमलों ! उगीचच तिला विचारलें, " अस्सं ऽऽ ? तात्यांचा वाटतं ? " आत्यानें आपल्या डोक्याचा सिग्नल खालीं करून लाइन ' क्लियर ' केली. ती आणखी म्हणाली,

" अनायासं आलेंच आहें पुण्यांत; बारशीं, श्राद्ध, पक्ष, लग्न, मुंजी करायला लोक बाहेरगांवाहून मुद्दाम इथं येतात ! "

" हो, हॅा ! "

" तेव्हां म्हणतें इथंच करून टाकावं श्राद्ध न् पक्ष झालं ! "

" पण आत्या, या घराची वास्तु झाली नाहीं अजून, असं ऐकतों ! "

" हो का ! मग अगोदर तीच करून घेऊं ! "

" नाहीं; नको. कारण घरवाला म्हणतो, केलीय् ! पण आळींतला ब्राह्मण कसा मिळणार ? "

" बाहेरनं आणूं ! "

" शिवाय मलाही जरा बरं नाहीं ! "

" मग सावकाश करूं चार दिवसांनीं. "

" पण आत्या..."

" पण बीण कांहीं नाहीं. टाद्ध, पक्ष झालाच पाहिजे. बॅाबी, ए बॅाबी, पंचांग आण पाहूं इकडे ! "

मी गुरगुरलों. पण व्यर्थ; आत्यानें मांडलेला ठराव शेवटीं " एकमतानें " पास व्हायचाच हें माझ्याप्रमाणें वाचकांना ठाऊक आहेच !

माझी तब्येत खरोखरीच बिघडण्याचीं चिन्हें दिसूं लागलीं. खिशांतल्या एका दहा रुपयांच्या नोटेखेरीज घरांत एक पैसाही शिल्लक उरला नव्हता. असेंच गाडें आणखी दोन दिवस चाललें, म्हणजे ती नोटही टिकणार नाहीं हें मी जाणूनच होतों. आंघोळीच्या वेळीं मीं जिवाशीं खलबत केलें.

" शुक् शुक् अरे, जिवा ! "

" जी साहेब ! "

" किल्ल्याचा वेढा अजून उठत नाहीं ! "

" असं दिसत, साहेब ! "

" मोर्चाच्या तोफांतच पाणी पडलं; गनीम दाराशी आला. किल्ल्यांतील अन्नसामुग्री व शिबंदी खलास व्हायची वेळ आली ! "

" उः ! इलाज चालत नाहीं, साहेब !"

" जिवा, तटाला खिंडार पाडायचा शत्रूचा बेत दिसतो ! "

" म्हणजे, पक्ष करायचा, साहेब ! "

" नाहीं तर किल्ला हवालीं करावा लागेल. "

" हः ! "

" एजिन लवकर पेटव, जिवा ! तुला माझी दशा दिसतेच आहे ! "

" अस्थि न् चर्म राहिलींत, साहेब ! "

" हें त्या कारट्यांचं व्रात्यस्तोम बाधतंय् बरं, जिवा ! "

" समजलों, साहेब ! "

तो श्राद्धपक्षाचा दिवस उजाडला. अलीकडच्या या दोन दिवसांत घरगुती गोष्टींविषयीं मी उदासीन झालों होतो. मुरुडाचा संपर्क शक्य तितका चुकविण्यासाठीं मी आपला पुढच्या खोलीला आंतून कडी लावून खुर्चीवर पडलों होतों. इतक्यांत घरांतून भांडणाची गडबड ऐकू आली. आमचे घर म्हणजे अलीकडे कळीचा गुद्देखानाच झाला होता. त्यामुळे भांडण म्हणजे कांहीं नवीन गोष्ट नव्हती. परंतु आतांचे भांडण बॅाबी आणि आन्यामध्येच सुरू झाले असून वादी आणि प्रतिवादी आपआपल्या मतांच्या प्रतिपादनार्थ माझ्या भांड्याकुंड्यांचा उपयोग करीत असाव्या. लेथवर फिरणाऱ्या भांड्याला कांतणी लावली, म्हणजे जसा कर्कश आवाज चढत जातो, त्याप्रमाणे स्वयंपाकघरांत एकदम दोनचार लेथ चालू झाल्यासारखे वाटत होते. शेवटीं बंद दारांतून संभाषणेंही मला चांगलीं ऐकूं येऊ लागलीं.

" तुला एवढयाश्या टिटवीला ग काय माहित यांच्या आवडी-निवडी ? "

" हात्तिच्याः हातच्या कांकणाला आरसा कशाला ? कां ? मी तात्यांच्या घरांत कधीं वागलें नाहीं ? का मला जेवायला त्यांनीं कधीं बरोबर घेतलं नाहीं ? मम्मुताई, तुझी किनी, आठवण अलीकडे किटलीय् जरा ! बरं, आपल्याला नाहीं आठवत, तर दुसरं शहाणं सांगतं ते तरी ऐकाव, तेंही नाहींः आपलं तेच खरं ! "

" बरं बरं, बॉबे. आमच्या गोंवऱ्या आतां मसणांत जाऊन पडल्या SS अन आम्हांला शिकवतेस ? माझं डोकं ठिकाणावर आहे म्हणून बरं ! नाहीं तर तू मला गिळून टाकशील ! ते कांहीं नाहीं. त्यांना धिडच आवडत असत. माझ्याकडून कित्ती तरी वेळां तिकडून प्रेमान धिडं काढून घ्यायच होई ! आम्ही गांवाला जायचे म्हणजे धिड निघायचींच. तेव्हां परकर दिसंल नेसायला लागली नव्हतीस. अन् उगीच नसत्या गोष्टींत अगोचरपणा करायला लाज नाहीं वाटत ? "

" लाज कुणाची काढतेस, मम्मे ? मसणांत गोंवऱ्या गेल्या एवढीच किनी शिफारस ? तात्यांना वडे अतिशय आवडत, हे मला नक्की ठाऊक आहे. कित्ती तरी वेळा त्यांनीं म्हणावं, " बावड्या, आज सुंदर वडे कर हं ! " आमच्याकडे आले म्हणजे वड्यांशिवाय त्यांच पान हलायच नाहीं. ते कांहीं ऐकायची नाहीं मी ! धिडापेक्षां तात्यांना वडेच अधिक आवडत. आज वडेच झाले पाहिजेत. ती पहा ! या क्षणीं तात्यांची भव्य मूर्ति वडा खात खात माझ्या डोळ्यांसमोर उभी आहे. अहाहा ! "

यानतर धिड विरुद्ध वडे यावर बरंच रण माजून शेवटीं डेप्युटेशन माझ्याकडे आले !

" टाटू, अरे टाटया ! " आत्यानें ठणाणून हाक मारली.

" काय झालं, आत्या ? " दार उघडून मीं विचारलें. अगोदर तोंड उघडलेल्या बॉबीला दटावून आत्यानें एकदम विचारलें, " यांना काय आवडत असे, ते तुला माहित आहे ना ? "

" म्हणजे, तात्यांना का ? "

" हूं ss ! त्यांनाच ! "

मीं डोकें खाजवून उत्तर दिलें,

" आपलं घर बरं कीं आपण बरे, असं नेहमी म्हणायचे ते. कध्धीं बिचाऱ्यांनीं दुसऱ्याच्याकडे दोन दिवसही तळ दिला नाहीं. "

" जळ्ळं तुझं लक्षण, टाट्रू ! " बॉबी म्हणाली, " तात्यांना पक्वान्न काय आवडत असे तें विचारलं आहे आम्हीं ! "

" पक्वान्न ? तात्यांना तर खाण्याचं कांहींही आवडे बुवा ! "

" नाहीं, पण विशेष ? त्यांतल्या त्यांत भक्तीनं ? "

" विशेष काय ? नासलेलं दूध न् गूळ खातांना ते नाचत असत ! "

" दिवे ओवाळ बाळाच्या अकलेवरून ! " आत्या गरजली, " अरे, त्यांना धिंड नसत का आवडत मनापासून ? "

" हो, हॅा, हॅा ! खरंच. नागोबाचे धिंड म्हटलं, कीं ते हातांतलं काम खालीं ठेवीत. "

आत्यानें दिग्विजयी मुद्रेनें बॉबीकडे पाहिलें. परंतु बॉबीनें माझी गोम ओळखली असावी. कारण मी अगदीं होय उत्तर द्यावें, अशा उलट तपासणीच्या थाटानें तिनें प्रश्न केला, " पण टाट्रू, त्यांना धिंडापेक्षां वडेच नसत का अधिक प्रिय ? "

" हां ! बरोबर; कोर्टांत जातांना मामाच्या होटेलांतून ते नेहमीं वडे बांधून घेत, एवढं खरं ! "

" मी-आज-धिंड करणार ! " एक हात कमरेवर ठेवून दुसऱ्याच्या एका बोटानें आत्यानें आपला व्हेटो दिला.

" अन्-मी-वडेच करणार ! " बॉबीनें पदर खोंचीत अल्टिमेटम दिला.

" पण आत्या, जेवायला येणाऱ्या ब्राह्मणांना काय आवडेल तें नको का पाहायला ? "

मीं हळूच गोष्ट काढली. पण आत्यानें ठासून उत्तर दिलें,

" मला ठाऊक आहेत इथले भिक्षुक ! कांहीं तरी गिळायला मिळालं म्हणजे झालं त्यांना ! "

इतकें झाल्यावर दोघी आंत गेल्या. बॅबीनें निराळी चूल मांडली. शिधा वेगळा काढला. भांडीं माळ्यावरून काढून घांसून घेतलीं. आणि घरांत धिंड-वडे सुरू झाले. मीं दांतओठ खात स्वस्थ बसलों. कोणावर तरी राग काढायचा, म्हणून जिवा दारांत खडबड करीत उभा होता, त्याच्या अंगावर मी खेकसलों,

" चल, चालता हो तिकडे ! उगीच खुडबूड चालवली आहे मघांपासून ! "

" खुडबूड नाहीं, साहेब ! आपल्या कोटावरचे शाईचे डाग काढतोंय् ! "

" शाईचे डाग ? "

" आख्खा कोट भरलाय्, साहेब ! "

" शाई कशी आली त्याच्यावर ? "

" मुरुंडसाहेबांनीं घातला होता तो ! मघांशीं ते फाउंटन पेनांत दौतींतली शाई ओतीत होते, तेव्हां सगळी शाई अंगावर आली, साहेब ! "

" हाय रे देवा, जिवा ? "

" साहेब ? "

" नोट होती खिशांत दहा रुपयांची. "

" तिचेही तुकडे कागदावर चिटकायचे आहेत, साहेब ! "

" म्हणजे ? जिगसॅा पझलसारखे ? "

" होय, साहेब ! "

" काय करूं रे......" दांत आवळून मी भिंतीवर आणि टेबलावर मुठी आपटूं लागलों.

थोडया वेळानें शालजोडी पांघरून व पळीपंचपात्री घेऊन आलेले बेटन आणि पेटन पाहून मी थिजून गेलों. गंमत ही कीं, दोघांपैकीं एकानेंही मला ओळख दिली नाहीं. नुसते हंसले आणि मुकाटयानें पूजेची तयारी करूं लागले. जगांतील घडामोडी किती झपाटयानें घडून येतात, याचा मी विचार करूं लागलों. परवां

चांगल्या सुखवस्तु स्थितींत असलेले खुशालचंडोल बेटन आणि पेटन आज येथें अस्त्रायफट् करीत बसलेले पाहून " जग हें असें आहे " याशिवाय मी तरी काय म्हणणार? जिवाला मीं एकीकडे गांठून विचारलें,

" जिवा, अरे, हे काय ? हा बेटन......? "

" आत्यासाहेबांचा ब्राह्मण ! "

" आणि हा पेटन......? "

" बॅबींचा, साहेब ! "

" म्हणजे, एक धिंड खाणार न् दुसरा वडे: असेच कीं नाहीं ! "

" दुपार्खी पक्ष आहे, साहेब ! "

" समजलों जिवा, पक्षांत उपपक्ष. दुसरं काय ? नशीब माझं, मुरुडानं तिसरा काढला नाहीं ! "

" शु: ! " जिवानें नाकावर बोट उभें ठेवलें.

" शु: ! काय, जिवा ? "

" मुरुडसाहेब तुमच्या मागच उभे आहेत ! " जिवा अगदीं हलक्या स्वरांत म्हणाला. मी एकदम वळून पाहिलें तो मुरुड स्वयंपाकघरांत पळाला. मी " हाण हाण, धर काटर्याला ! " असें कांहीं तरी ओरडलों. पेटननें मजकडे न पाहतां पळत जाणाऱ्या मुरुडाच्या डोक्यांत एक टप्पल दिली. ब्रेव्हो पेटन, अशी आरोळी ठोकण्याकरितां मीं अगदी तोंड उघडले होतें: पण जिवानें त्याच्यावर हात ठेवला.

पूजेचा विधि दोघांनीं एसा उठविला होता कीं ज्याचें नांव ते ! एक रघुवंशांतले श्लोक म्हणत होता, तर दुसऱ्याचें कुमारसंभव चालू होतें. मधून मधून ठराविक आचमन, अर्घ्य, तर्पण, सव्य आणि आपसव्य इत्यादि प्रकार करावयास बिनचूक सांगत होते. शेवटीं त्या फार्साचा इतका कहर झाला, कीं मी उठून बाहेर गेलों. आणि एकदा मोकळ्या मनानें खो खो हंसून आलों ! जेवणाच्या पंक्तींत मात्र दोघांना खोलीच्या दोन भिन्न टोकांना बसविण्यांत आलें. पहिला भात वगैरे संपल्यावर दोघांनाही ठरलेले पदार्थ वाढले गेले. थोड्याच वेळानें

श्राद्धाच्या ब्राह्मणाची गेट आणून बेटन म्हणतो, " वा: ! सैपाक छान झालाय आजचा ! " पुढें धिंडाचा एक तुकडा तोंडांत टाकून, " याला गोडीविडी अगदीं बेताची आली आहे. " असें म्हणाला. तें ऐकून पेटन खिदीखिदी हसूं लागला. बेटननें विचारलें " कां हसतां, शास्त्रीबुवा ? "

" हसूं नको तर काय करूं ? वड्यांना गोडी आली म्हणतां म्हणजे शुद्धीवर आहांत कीं नाहीं ? "

" वडे ! भले महाराज ! तोंड आहे कीं तोबरा ? धिंड खातां आहांत, नि वडे म्हणतां खुशाल ? "

" धिंड ? ऐकले होते का कधीं धिंड, बेट्या ? अलीकडे बुरशूस होत चाललाय् तुझ्या डोक्याचा ! धिंडच काढली पाहिजे तुझी ! "

" उगीच तोंड दिलंय् म्हणून बरळूं नकोस, पेट्या ! नीट खाऊन पाहा काय आहे तें ! " झालें; प्रकरण हातघाईवर आलें, आणि धिंडवड्यांची फेकाफेकी सुरू झाली ! एकमेकांवर दहा-दहा गोळे बसले, तरी कोणी नेस्तनाबूद होण्याचें चिन्ह दिसेना. आपापल्या योद्धयांना भरपूर दारूगोळा पुरविण्याचें काम आत्या आणि बॅबी कसर न करतां करीत होत्या. दोघांच्याही अंगांत तरुण रक्त असल्यामुळें पड घेण्यास कोणी तयार होईना ! जेवणाच्या खोलींतून लढाई हळूहळू दिवाणखान्यांत आली. " हा घे ! " आणि " तूं हा घे " अशा उद्गारांच्या पाठोपाठ धिंडवड्यांचे एकमेकांवर वर्षाव करण्याशिवाय दोघांचेंही इतर कोठेंही लक्ष नव्हतें. घरांत जिकडे तिकडे फुटलेले गोळे ऊर्फ धिंडवडे पसरले. आपआपल्या योद्धयांना वीरश्री चढावी म्हणून आत्या आणि बॅबींनीं शिकस्त चालविली होती ! लहान धिंडांनीं काम होईना, म्हणून मोठाल्या धिंडांचे टॉरपेडो आत्यानें बेटनच्या हातांत दिले आणि म्हणाली, " वाहवा जवान ! आतां या धिंडांनीं दांतच पाडा शत्रूचे ! " नंतर दोघांची शाब्दिक हमरी-तुमरी आणि त्यांत दोघींच्याही किंचाळ्या मिसळल्या, तेव्हां माझ्या घरांत शेअरबाजार व नळबाजार एकत्रित स्वरूपांत आले कीं काय, असा भास होऊं लागला ! रणधुमाळीचा रागरंग कांहीं न्याराच असतो ! एकंदरींत बेटनचाच

सरशी होणार असा रंग दिसतांच मला जरा हायसें वाटलें. कारण तो आत्याचा गडी होता.

इतका वेळ स्वयंपाकघरांत आपलें जेवण स्वस्थपणें उरकीत बसलेला आमचा कुलस्वामी ऊर्फ मुरुंड आतां हात धुऊन बाहेर आला; पण कांहींही बोलला नाहीं. त्याला काय लहर आली कुणास ठाऊक ! तो लढाईच्या धुमश्चक्रींत शिरूं लागला. बिचारा पेटन ! बडया बडया धिंडांचा मारा चुकवतां चुकवतां बेजार झाला होता. शिवाय त्याच्या दारूगोळ्याचा पुरवठाही कमी पडूं लागल्यामुळें, चार धिंड "खाल्ले" कीं त्याच्या हातून एक वडा सुटत होता. बेटनच्या डोळ्यावर एक जरी वडा लागता, तरी बस्स् होतें ! म्हणूनच पेटन एकच वडा पण काळजीनें नेम धरून मारी. पण तोही बेटननें चुकविला, कीं त्याच्या अंगाचा तिळपापड होई. अशा ऐन गर्दींत मुरुंडाची स्वारी मुकाटयानें पुढें झाली आणि तिनें आपल्या तोंडांत भरलेला मोठा चूळ नेम धरून पेटनच्या नाकपुडीवर रोंखला. नाकांत पाण्याचा हपका शिरल्याबरोबर मात्र पेटन सैतानाच्या आहारीं गेला ! शत्रूचा नाद सोडून देऊन त्यानें मुरुंडाचे कान पकडले आणि त्या काटर्यांच्या दोन सणसणीत मुस्कटांत दिल्या ! नुसत्या खोटया धमकावणीनें गळा काढणारा मुरुंड, या अस्सल चपराका बसतांक्षणींच किती भयंकर रीतीनें कळवळून केंकाटूं लागला असेल त्याची कल्पना असले लाडाचे गोळे ज्यांनीं एकदा तरी थापटून पाहिले असतील, त्यांना येईल. तो आक्रोश ऐकायला बेटन आणि पेटन मात्र तेथें ठरले नाहींत. त्यांनीं केव्हांच सूंबाल्या केला !

बॉबीचें मातृप्रेम आणि युद्धाचें अवसान यांमधील झगडयांत मातृप्रेमाचा ग्रँड सक्सेस झाला. पेटनवर तिनें आग पाखडली. त्याच्यासाठीं रौरव नरकांतील एक जागा रिझर्व करून ठेवली. मुरुंडाला पोटाशीं धरून हुंदके दिले, आणि त्याचे शक्य तेवढे गोडवे ती सांगूं लागली. आत्याच्या अंगांतील महिषासुर-मर्दिनीही पळाली ! पण निराळ्या कारणामुळें ! घरांत जिकडे तिकडे धिंडवडे तुडवले जात होते. पैशापरी पैशाचा सत्यानाश होऊन पक्षाचे ब्राह्मणही रित्या पोटीं हात न धुतां चालते झालेले ! आणि घरांत मुरुंडाच्या किंचाळ्या. बिचारी खूप चरफडली आणि शेवटीं काखोटीस वळकटी घेऊन बाहेर आली !

" टाटा, चालल्ये मीं ! घर संभाळ. जिवा, अरे जिव्या, टांगा आण पाहूं ! " तोंडांतला भज्यांचा तोबरा कष्टानें इकडे तिकडे फिरवून शब्दांना वाट देत जिवा म्हणाला, " घ घॅाशभए खॅाऊन ज्यॅा ऑ–ऑ–ऑटयॅाशॅा एब ! "

डोळ्यांत चट्‌कन पाणी आणून आत्या म्हणाली,

" त्यांच्या पक्षाची ही अशी फर झाली; न् मला कसं अन्न गोड लागेल ? बॅाबीला म्हणावं घे आतां गिळून नि बस त्या काटर्याला कवटाळून ! जा, मुकाटयानं टांगा घेऊन ये पाहूं ! "

लवकरच टांगा आला आणि आत्या थोडेसे दाणें पुरचुंडींत बांधून घेऊन निघून गेली. दुसऱ्या दिवशीं बॅाबीनेंही आपल्या 'बाळाला' घेऊन तणतणत रस्ता धरला. धिंडवडे काढण्यास दोन वासरें दिवसभर चरत होतीं. घर पुन्हा एकदा रिकामें झाल्यावर मी जिवाला म्हणालों, " जिवा, सुटलों एकदाचे ! "

" मुरुंडसाहेबांनीं माझं ऐकलं म्हणून, साहेब ! "

" काय ऐकलं ? "

" पेटनसाहेबांच्या अंगावर पाणी टाकण्याचं ! "

" नुसतं ऐकलं नाहीं ! कल्पकता खर्च केली त्याच्यांत ! "

" सकाळपासून मागत होता, तें शेवटीं त्याला द्यावं लागलं. साहेब ! "

" काय दिलंस एवढं ? "

" न-न नोटीचे तुकडे साहेब ! ते जुळवायचा त्यानंच हट्ट घेतला ! "

" बाप रे ! मग नेलेन कीं काय ते ? "

" नाहीं; मीं ठेवले काढून ! "

" आण ते ! आतां जुळवायला भरपूर वेळ आहे. अन् न जुळवून खायचं काय उद्यां ? "

---

# व्हिटामिन




मम्मुआत्याच्या कुटुंबांतील मंडळींशीं माझा परिचय करून दिला जात होता.

" हा माझा विश्वास ? " आपल्या हातांनीं विश्वासाचें डोकें चोबाळीत आत्या म्हणाली. एकदा ऑएऑ करून एखाद्या मुटबंग मुलाप्रमाणें विश्वासरावांनीं आपलें डोकें सोडवून घेतलें. क्वीनाइनच्या बाटलीवर कपाउंडर जसा ठोकतो त्याप्रमाणें मीं दुरूनच विश्वासाच्या डोक्यावर ठोकून पाहिलें. परंतु त्याला तें न आवडून त्यानें आपलें डोकें खालीं वांकविलें. वयांत आलेल्या गोऱ्ह्यानें आपलें डोकें खालीं वांकविल्यानें जो भाव प्रगट होतो, तो जाणून मी मागें सरलों. आत्याच्या लाडक्या विश्वासाबद्दल कांहीं तरी अभिप्राय व्यक्त करण्याच्या इरायानें मी म्हणालों, " विश्वासासम शूर सुंदर असे राष्ट्रामध्यें कोण या ? आत्या, अगदीं पानपतांत पडलेल्या विश्वासरावासारखा हा योद्धा दिसतोय् ! " माझ्या बोलण्याकडे विशेष लक्ष न देतां दुसऱ्या एका व्यक्तीकडे बोट दाखवून आत्या म्हणाली,

" अन् ही गोपिकाबाई ! "

गोपिकाबाई जास्त भारदस्त असतील या समजुतीनें मीं त्यांच्या पाठीवरून हात फिरविला. तों त्या ठिकाणीं गोमाशी बसल्याप्रमाणें गोपिकाबाईची शेपटी सपकन् वर आदळली आणि त्यांचें अंग चमत्कारिक रीतीनें थरारलें ! माझी चूक माझ्या लक्षांत आली. एकच प्याल्यांतील एकच स्पर्शाचा चमत्कार मला आठवला ! मम्मुआत्या मात्र गोपिकेच्या गळ्याखालची पोळी कुरवाळीत होती

व त्यानें खूष झालेल्या गोपिकाबाईंनीं आपली मान हवेत तरंगत ठेविली होती. त्यापुढें गोठ्यांतील इतर व्यक्तींशीं माझा परिचय झाला.

" वा: आत्या, यांची व्यवस्था तर सायमनकमिशनच्या वर ठेविली आहेस हुवा ! " मीं आत्याला कॉम्प्लीमेंट दिला.

" म्हणजे ? ठेविलीच पाहिजे. शेतकऱ्याचं अर्धं कुटुंबच तें ! "

" हो हो, तेंही खरंच: लॅन्सबरीनं म्हटलंच आहे... "

" नुसत हां हा नाहीं उपयोगी, टाट्र ! आज संध्याकाळीं गोपिकेची धार काढून दाखवली पाहिजे, बरं का ! " तिचा चष्मा या वेळीं कपाळवर चढून तेथील कातड्यावरोबर हालत होता.

" पण आत्या, मला बॉबीबरोबर पार्व्हतीला जायचं होत ना ! "

" बॉबी नाहीं न् फिवी नाहीं. अगोदर धारा काढायला शिका आणि मग हिंडा, समजलांत ! "

" आमच्यासारख्या, अशीलांच्या डोळ्यांतून धारा काढणाऱ्या दांडीवाल्यांना ( बारचे मेंबर ) या गुरांच्या धारा काढून काय करायचं आहे कुणाला ठाऊक ! कर्नल लिंडबर्गला टांगा हाकायला लावण्यापैकींच आहे हे ! "

मी स्वतःशींच पुटपुटलों. पण तिनें तें ऐकलें. ओंचे खोंचीत ती म्हणाली,

" टाट्या, फाजीलपणा करूं नकोस. गाईचं दूध हें सर्वांत पौष्टिक अन्न आहे. गोरसाचं महत्त्व किती आहे तें दाखवून देऊं का तुला ? "

" छे ग, त्याची नाहीं जरूर: मला माहित आहे त्यांत व्हिटामिन आहेत तीं ! "

झालें ! आत्या अन्नावर आली कीं आमच्या " थातुर मातुर " शरीराची शोभा होणार हें ठलेलेंच असल्यामुळें आम्हांला गप्प बसावें लागे. वास्तविक बॉबी कशीही असली, तरी एक तरुण स्त्री होती आणि जरा आधुनिकपैकीं होती. स्त्रीसह फिरायला जाण्याची संधि मला केव्हां मिळते याची मी किती तरी दिवस वाट पाहत होतों. पुण्याच्या आसमंतात सकाळ-संध्याकाळ तरंगणारे द्वंद्व समास

नेहमीं पाहूनच माझा अंतरात्मा व्याकुळ होत असे. ती मंथि येथें सहजगत्या आली असतां आणि बॅाची त्याला एका पायावर तयार असतां या अरसिक थेरडीनें असा मोडता घानलेला पाहून कुणाला राग येणार नाहीं ? पण रागाचा आत्यापुढे काय उपयोग ?

दुपारीं आंचवतांना जिवाचे आणि माझें बोलणें झालें. "जिवा, गाईच्या धारा काढायचं एखादं गाइड असल्यास सांग !"

"गाई न् गाइडांचा कांहीं संबंध नाहीं, साहेब !"

"मग टिप्स् दे, जिवा !"

"गाईच्या डोळ्याला डोळा भिडवावा; लाजूं नये. तिच्या नांवान पण 'अहो अहो' करीत तिला वारंवार हाका माराव्या. नांव माहित नसल्यास नुसतंच गावडी म्हणावं. तिला वारंवार खायला द्यावं: चरवीऐवजीं बालदी घ्यावी. तिच्या अंगाला हात लावतांच तें खप थरारलं, तर वेळींच बाजूला व्हावं–आणि ऑल्वेज् कीप टु दि लेफ्ट !"

"थोडक्यांत स्टोव् पेटवायनाच प्रयोग आहे असं म्हणेनास, जिवा !"

"अन् त्यांतील धोक्याचा कमजास्तपणा त्या त्या व्यक्तींवर अवलंबून आहे, साहेब !"

गोठ्यांत गोपिकाबाईचें विश्वासरावाशीं फक्त त्यांच्या भाषेंत संभाषण चालू होतें. तेथें जाऊन बसलों आणि संध्याकाळपर्यंत मीं तिच्यावर बरेंच "इप" मारले. पोल्सनच्या लोण्याची अधिष्ठात्री ती. पण तिच्यावरील इंपकरितां फक्त ओलें गवत उपयोगी पडलें.

संध्याकाळच्या धारा काढण्याचा एक मोठा समारंभ व्हायचा. चकचकीत चरव्या, बादल्या, आंबोण्यानें भरलेलीं खमंग वासाचीं घमेलीं, कंबरेभोंवतीं दुपेटा गुंडाळलेली चष्मित आत्या आणि तिच्या हातांतील मोठा बांबूचा फोक, इत्यादि वस्तूंचें तें एक संमेलन असे. गोठ्यांत आल्याबरोबर आत्यानें फर्मावलें,

"हां दादू, विश्वासला सोड पाहूं !"

" आत्तां सोडायचा ? कुठं, पाण्याला कीं काय ? "

" मूर्खा, त्यानं ढोसल्याशिवाय गोपिका दूध कशी देणार ? "

मीं भीतभीत दाव्याची गांठ सोडतांक्षणींच टाण्दिशीं उडी मारून विश्वास गोपिकेच्या आचळांशीं झटूं लागला. त्याचें काम होईपर्यंत एक " फुंकून " येण्याच्या उद्देशानें मी हळूच माझ्या खोलींत दाखल झालों. कारण या वेळीं आत्या गोठ्यांत उभी होती. हीच माझ्या कामास उत्तम संधि ! परंतु थोड्याच वेळांत नुसतेंच टोक जळलेली पासिंग शो मला पायाखालीं चिरडावी लागली. कारण खोलीचा दरवाजा धाडकन् उघडून आत्याचा आवाज आंत आला.

" कारट्या, त्या गुलामाला मोकळा सोडून आलास कीं ! "

" नाहीं, मीं येतांच त्याचं काम आटोपल्याबरोबर ! "

" वेड्या, तुला अक्कल आहे काहीं ! सगळ्या दुधाचा निकाल केल्याशिवाय तो सोडील वाटतं ! "

" ए: असं काय म्हणतेस, आत्या ! त्याचं पोट भरलेलं का समजायचं नाहीं त्याला ? मग तर भाऊसवच म्हटला पाहिजे अगदीं. "

" गोठ्यांत हो मुकाट्यान ! " ती कडाडली ! मी गोठ्यांत जातांच आत्यानें सांगितलें,

" विश्वासला बांध पुन्हा खुंटाशीं ! "

गाइड वाचून अन् टिप्स् घोकूनही परीक्षा कां हुकतात तें आतां माझ्या लक्षांत आलें. साध्यासुध्या ओढण्याला विश्वास मुळींच दाद देईना. आत्यानें त्याचें मुसकट फिरवून ढकललें, तेव्हां तो बहादुर भरगोठ्यांत भलतीकडे घुसला. मला त्याच्या मागून घुसणें भागच होतें. " गोपिका फिरून दूध जिरवून टाकील " म्हणून आत्या ओरडतच होती; परंतु तिकडे लक्ष देण्याइतकें माझें मन ठिकाणावर राहणें शक्य नव्हतं. विश्वास एखाद्या सातबारी फटाक्याप्रमाणें भलभलत्या अंतरानें उडत होता. आणि त्याच्या वातीप्रमाणें मी हवा तसा फड-फडत होतों.

" विशा, अरे गुलामा ! आज तुला मस्ती आली का रे मेल्या ! आँ, थांबतोस कीं नाहीं...आलेच मी तुझ्या समाचाराला..." इत्यादि धमकावण्या दाखवीत आत्या पुढें सरसावली. पण गामा कल्लूच्या हातांत एखादा रत्नागिरीचा बआंपू सांपडला तर तो जसा आपला "बस्ता" त्याला दाखविल्याशिवाय राहणार नाहीं, तसा मला चांगलाच हिसका दाखविण्याचा विश्वासाचा निश्चय झाला असावा. एक मोठी झेप टाकून तो बाहेरच्या पटांगणांत उतरला. " अरे हो हहो ! पचच् ऊ ! ओ अॅ ए ! " वगैरे सामोपचारी भाषा मीं सुरू केली. उलट " आँ ए अँ " ओरडून विश्वासरावांनीं निषेध प्रदर्शित केला आणि स्वारी चौखूर उडूं लागली. शेवटीं माझें खवाटे उपटून निघण्याचें चिन्ह दिसूं लागलें, तेव्हां माझ्या हातांतून दावें निसटलें आणि तो समोरच्या कुंपणावरून पाठीकडे पसार झाला. मागून धांवत असलेली आत्या आणि तिच्या पाठोपाठ जिवा, दोघेंही कुंपणांत आरपार घुसलीं.

विश्वासरावांच्या अद्वातद्वा उड्या मला दिसत होत्या. मध्येंच थबकून तो कानोसा घेई, चारी दिशा हुंगी, खालच्या हिरवळींत तोंड खुपसून फराळ करी आणि पुन्हा त्याच्या अंगांत विजेचा संचार होई. आत्याची मजल कुंपणाच्या पुढें गेली नाहीं. कारण, चिखलांत गेलेला तिचा कुठलाही पाय वर येईना. जिवा वावराच्या कडेकडेनें धांवत होता, तरी मध्यें बऱ्याच वेळां तोंडघशीं पडत होता. शेवटीं त्यानें विश्वासचें दावें पकडलें आणि चपळाईनें जवळच्या खांबास त्याचे तीनचार विळखे दिले. विश्वास आतां मुकाट्याने यथेच्छ चरूं लागला. एका गड्याच्या मदतीनें जिवानें त्याला आणि आत्याला गोठ्याजवळ परत आणलें. गोठ्याजवळ आमची परिषद् झाली, तेव्हां आत्याचा मेंदू कणसे भाजून घेण्याइतका तापलेला दिसला. तिच्या चेहऱ्यावर एखादा खेळांतला किल्ला बांधलेला असता, तर क्षणार्धांत तो जमीनदोस्त झाला असता, इतकें त्याच्यावर तुफान चाललें होतें.

" टाट्या गाढवा, तुला एवढासा गोऱ्हा आवरतां येईना·अजून ! नुसतं तीन्ही त्रिकाळ गिळायला पाहिजे. अंगांत कांहीं असेल तर शपथ ! "

" आत्या, हे सरावाचं काम आहे, नुसत्या ताकदीचं नाहीं. "

" चूप मेल्या ! "

" लहानपणीं 'तिच्या' हिटलरला बेडूक देखील धरतां येत नसे. या म्हणण्यांत काय अर्थ ? "

" तोंडाची वाफ दवडूं नकोस उगीच. शेजारच्या कासटलीच्या शेतांत काम आहे तें तुला माहिती आहे का ! "

" मीं कशाला पाहूं दुसऱ्यांचीं शेतं ? "

" टामेटो आहेत इथून तिथून ! "

" ओः ! हः ! अं ऽ ऽ ऽ "

" हॅः काय ? जिव्या न् विश्राम मिळून दोघांनीं इतका वेळ तेच तुडवले कीं ! "

जिवा कां घसरत होता त्याचें कारण आतां समजलें.

" म्हणूनच तूं गेली नाहींस तुडवायला बरं का ! तरी मला वाटलंच ! "

" डोंबल वाटलं तुझं ! ती काशी येईल ना ओरडत माझ्या नांवानं ! "

" येऊं दे ! आम्हीं आहोंत कीं ! "

" तुम्हीं ? दिवे ओवाळा तुमच्यावरून ! टामेटोचा चेंदा झाला तसा होईल तुमचाः माहित आहे ? "

" हू ! "

" अन् शिवाय गोऱ्यांनीं टामेटो खाल्ले, म्हणजे त्यांना भयंकर वात होतो."

" एः कांहीं तरी; टामेटोंत तर व्हिटामिन भरली आहे ! "

" जळली तुझी विठमाई. तिच्यामुळंच तर होत असेल असं ! "

आत्या म्हणजे हायकोर्टच. तिचें रूलिंग शेवटचें; म्हणून मी म्हणालों,

" असेल बुवा, काय सांगावं ? ज्याच्या त्याच्या प्रकृतीवर व्हिटॅमिनचा परिणाम अवलंबून असतो."

" विश्रामाला सांभाळनां आल्याशिवाय फिरणं बिरणं बंद, टाटया ! ध्यानांत धर ! "

" पण आत्या, विश्वास जरा असामान्य आहे. प्रत्यक्ष डायनामोच; शिवाय त्यानं टामेटो खाल्ले आहेत. तेव्हां "......पण ते कांहीं जमले नाहीं.

" जिवा, तुझ्या टिप्स् अन् गाइडं गेलीं चुलींत ! "

" विश्वास म्हणजे अभ्यासक्रमाच्या बाहेर आहे, साहेब ! "

" पण आतां बॉबीबरोबर पार्ले वगैरे ? "

" उद्यां धरूं नका विश्वासला."

" अन आत्या ? "

" आज पाय मुरगळला म्हणून सांगावं, साहेब ! "

" असं का जिवा ! मग आतांच घोट्यावर आयडिन घालतो. तुझं म्हणणं बरोबर आहे. उद्यां विश्वासवर व्हिटामिनचा परिणाम झाल्याशिवाय राहणार नाहीं. "

" सकाळी रामा गुरे पिळीत असल्यामुळे कसलाच गाजावाजा होत नसे. मी माझ्या खोलींत आत्याच्या लायब्ररींतून स्कंदपुराणाची प्रत शोधून काढण्याच्या खटपटींत होतों. बॉबीचा न् माझा कार्यक्रम कसा काय जुळणार याबद्दल निरनिराळ्या योजना मनांत तयार होत होत्या; इतक्यांत आत्याचा चढता सूर ऐकूं येऊं लागला.

" जिव्या, माझी आरशी पाहिलीस का ! "

" होय, बाईसाहेब ? "

" कुठं आहे ती ? "

" मला माहित नाहीं, बाईसाहेब."

" मेल्या ! इतक्यांत म्हणालास ना पाहिली म्हणून ! "

" खरं आहे, बाईसाहेब. मीं ती पाहिलेली आहे, पण आतां कुठं आहे तें ठाऊक नाहीं."

" जिव्या, माझ्यापुढं तोंड करतोस ? "

" नाहीं, बाईसाहेब ! "

" मग, आरशीचं काय केलंस ? "

" गोपिकेच्या आंबोणांत तर गेली नाहीं ना ? "

" याद राख, जिव्या: तुझ्याशिवाय आरशी गेली नाहीं. " यानंतर " हो हो, तूंच तूंच ! " " नाहीं बाईसाहेब " " छे बाईसाहेब " इत्यादि सुरू झाले ! आत्याच्या मनांत देव बोलला कीं सगळ्या जगाचे मुटकळे करून जरी तिच्यापुढें ठेवले, तरी ती फिरायची नाहीं हे मला माहित होतें. बिचारा जिवा !

तीन्हीसांजा होतांच गोठ्यांतील प्रवेश कालच्याप्रमाणेच सुरू झाला. मात्र विश्वासरावांची व्यवस्था ठेवण्याचे काम आत्यानें स्वतःच्या अंगावर घेतलें होतें आणि मुरगळलेल्या पायाची वतावणी करण्यासाठीं मला लंगडावें लागत होतें. आरशी नसल्यामुळे विश्वासरावांच्या दांव्याची गांठ सोडतांना तिला अगदीं क्लोजअप घ्यावा लागला. विश्वासचें दूध पिणें झाल्यावर त्याचें मुस्कट फिरवण्यासाठीं तिला चांचपडावें लागलें ! एक तांबडी लाल चिंधी विश्वासच्या कपाळावरून डोक्यावर आली. त्याबरोबर तो जो उडाला तो आत्याच्या " अरे हाइकः हो हो. एकऊच " ला दाद न देतां गोठ्याच्या बाहेर सटकला. घाबरटपणाचें चिन्ह न दाखवितां आत्या लाडांत बोलूं लागली,

"हं, विश्वास, पुरेत हे चाळे. दिवसेंदिवस उंच उंच उड्या मारतो, गुलाम ! "

परंतु गुलामाच्या डोळ्यांवर आलेली ती तांबडी चिंधी बेफाम काम करीत होती. काल मी विश्वासला–अगर त्यानें मला–बराच वेळ खेळविलें होतें; परंतु ती चिंधी माझ्या नजरेस आली नव्हती. आतां ती कुठून आली, हा एक प्रश्नच होता. आत्या मला ओरडून म्हणाली,

" टाट्या, नुसता आ करून बघत बसूं नकोस. पाय मुरगळला तरी धार काढायला कांहींच हरकत नाहीं. तंवर मी पाहाते त्याचा तमाशा ! " मी व्हिटॅमिनची आठवण तिला करून देणार होतों; पण तेवढ्यांत तमाशा सुरू होऊन आत्या माझ्यापासून एक फर्लांगभर लांब गेली ! ती त्याला दरडावीत शपथा घालीत होती आणि तो बदमाष नुसता " उं अॅ ए, आं ऊं ए " अशीं उत्तरें करीत शेपटी वर चढवून उंच उड्या मारीत होता. आट्यापाट्या,

हुतुतू इत्यादि खेळांतील डावपेच तो जणूं काय आत्याला शिकवीत होता ! त्या वेळीं आत्याच्या अंगांत पांगारकर, आहिताग्नि, मोठे भोपटकर, कृष्णराव मराठे इत्यादि वीर संचरले होते, तर विश्वासच्या शरीरांत फडके, अत्रे, माधव ज्युलियन, मालिनी पाणंदीकर व " अपुर्ना " कर्ते यांसारख्यांची संयुक्त चेतना उद्भवली होती. यामुळें त्या चढाओढीचें कौतुक वाढत चाललें होतें. इतक्यांत तें प्रकरण डावीकडे वळले आणि गोठ्यांतून दिसेनासें झालें.

मीं गोपिकेच्या पायाखालीं बादली सारली. धोतर वर खोचले. आंबोणाचें घमेलें गोपिकेपुढें ठेवून दिलें आणि आतां धार काढायला सुरवात करणार, तोंच एक मोठा धप्दिशीं आवाज आला आणि त्याच्या मागोमाग आत्याची आरोळी ऐकली. मीं जिवाला फाटकापाशीं धांवत जातांना पाहिले. एका माणसाजवळून त्यानें कांहींसे मागून घेतलें आणि तो धांवत परत निघाला. लांबून " टाट्या, अरे टाट्, उडुप् उडुप् उडुप् मीं विहिरींत उडुप् उडुप्—पडलें...काढा— उडुडुप् उडुप् कोणी तरी लवकर ! " अशा आत्याच्या हाका ऐकूं येऊं लागल्या. मी तिकडे धांवत गेलों. रहाटाला दोर अडकवून जिवा विहिरीशीं कांहीं तरी करीत होता. विश्वास शांतपणानें पलीकडच्या काशीच्या शेतांतले टामेटो चरत होता. बेट्याला व्हिटामिनने व्हिटामिनचेंच वेड लागलें असावें. त्याच्या डोक्यावर ती तांबडी चिंधी पुन्हा आली, कीं तो सैरावैरा उडया मारी. मी विहिरीजवळ जाऊन पोहोंचतो तो तेथील देखावा पाहून चकित झालों ! रहाटावरील दोराच्या टोंकाला गळास अडकलेली मम्मुआत्या रहाट फिरवून जिवानें आस्ते आस्ते वर आणली. गळ सोडवून काढून तिला आम्हीं गरगर फिरविलें, तेव्हां एका मोटेइतकें पाणी थारोळ्यांत तुंबलें. नंतर ती सावध झाली आणि कोरडें नेसण्या- करितां मुकाट्यानें घरांत गेली.

ती परत आली तेव्हां जिवानें मोठ्या कष्टानें विश्वासला टामेटोंतून ओढून आणलें होतें व तो त्याला त्याच्या खुंटास जखडून टाकण्याच्या खटपटींत होता. कालच्यापेक्षां आज त्यानें जास्त मस्ती करून जिवाचींही हाडें खिळखिळीं करून टाकलीं होतीं. आत्या थकलेली दिसत होती हें खरें; पण शरीरांतले तिचें सत्त्व

त्राण तोंडांत आलें होतें. सगळ्या महाराष्ट्रीय वक्त्यांची वाक्शक्ति तिच्या त्या वेळच्या भाषणांत प्रकट होत होती. शेवटीं बाळूकाका कानिटकरांप्रमाणें प्रश्नोत्तररूप व्याख्यान सुरू झालें.

" जिव्या, मूर्खा, मी विहिरींत पडून कां मरत होतें, माहित आहे ? "

" तुला पोहतां येत नाहीं म्हणून." मीं सुचविलें.

" छे ऽऽ ! "

" आपली आरशी हरवली म्हणून, बाईसाहेब ! "

" बरोबर ! पण तें झालं एक कारण. पण विश्राम–माझ्या विश्रामांतला विश्रास–दांडगाई कां करूं लागला ते तुम्हीं जाणतां काय ? "

" त्याचा वाढदिवस असेल, बाईसाहेब आज ! "

" ना ऽऽ हीं ! "

" त्याला बाहेरची बाधा तर झाली नाहीं, आत्या ? "

" छे ! चुकतां तुम्हीं. अरे मेल्यांनो, ही तुमची विठमाई बरं ! "

तितक्यांत जिवानें खिशांतून कांहीं तरी काढून तिच्यापुढे केलें.

" ही घ्यावी आरशी, बाईसाहेब ! चिंचेच्या पाळ्यांत सांपडली बाबींना ! "

आत्यानें आरशी चढवतांच तिला दिव्य दृष्टि आली. विश्रामाच्या डोक्यावरील तांबडी धांदोटी तिला दिसली.

" हां ! तरीच ! " ती जवळ जाऊन म्हणाली.

" तरीच ग काय, आत्या ? "

" अरे बाबांनों, हा तांबडा रंगच कारण होतो असल्या तरुण गोऱ्ह्यांना बिघडायला."

" शाबास भाई गोऱ्हे ! " मी त्याच्या पाठीवर थोपटून म्हणालों.

" आपल्या लुगड्याचा तुकडा त्याच्या शिंगांत अडकला आहे, बाईसाहेब ! " जिवानें सुचविलें. चष्म्याच्या खालून आत्यानें त्याच्याकडे बघितलें.

परंतु ती चिंधी वारकाईनं तपासून पाहतां त्याच्या म्हणण्याचा खरेपणा तिला पटला असावा. मीं माझा मुद्दा मांडण्याच्या उद्देशानं सुचविलं,

" हीं तांबडीं लुगडीं कि नी आत्या, तरुण जनावरांना घातकच ठरतात ! "

" हं ऽऽऽ ? "

" अन् टामेटो देखील, बाईसाहेब ! " जिवानें टोला दिला.

" उद्यां मांगते कारीला सगळे टामोटे काढून टाकायला ! "

" म्हणजे काय, आमच्या गोऱ्ह्यांचे जीव घ्यायचे आहेत वाटतं ? टामेटोंतल्या विठमाईमुळं गुरं इतकीं भडकतील असं ठाऊक असतं, तर तिला लावूंच दिले नसते हे टामेटो ! " मीं अवसान आणलं.

" तोंपर्यंत रामालाच चारा काढू द्याव्यात, बाईसाहेब ! "

" तें असो, पण टाटचाला वासरं आवरतां आलींच पाहिजेत ! "

" त्याचा नको काळजी, आत्या. टामेटो नाहींसे झाले, आणि विश्वास जरा सुधारला, म्हणजे मी हवा तसा खेळवीन त्याला."

आत्याच्या आवाजांत कृतज्ञतेची किंचित् छटा आली. तिनें विचारलें, " अन् जिवबा, तूं काढलस मला विहिरींतून ? "

जिवानं मान डोलविली. आत्याचं लक्ष विहिरीकडे गेलं. रहाटापाशीं लोंबकळणारा गळ तिला दिसला. पुन्हा तिचा मायक्रोफोन फुटला.

" जिव्या, तो गळ ? " कंबरेवर हात ठेवून तिनें विचारलें.

" होय, बाईसाहेब ! "

" कोणाचा घेतलाय ? "

" विठूचा, बाईसाहेब ! "

" कुणाचा ? त्या झोंपड्यांतल्या विठ्याचा ? हरे राम ! जिव्या, तो महार ना ? "

" आपण बुडत होतां, बाईसाहेब. अन् गळ दुसरा मिळेना म्हणून... "

" जिव्या, चांडाळा, कुठं फेडशील हीं पापं ? मला विटाळलीस तूं मुद्दाम ! नव्हा माहिती, तुम्ही टपलेले असतां विटाळ कालवायला ! अरे देवा ! त्यापेक्षां

वरतून धोंडा टाकून बुडवली असतीस तर तुला दुवा देत मी स्वर्गात गेले असते: जन्मांत नव्हता असला कलंक लागला मला. कांहीं राहिलंच नाहीं मेल्यांना ताळतंत्र ! " याप्रमाणे साभिनय व्याख्यान देऊन आत्या पुन्हा स्नान करण्यासाठीं विहिरीकडे धांवली. लगेच बाबी बंगल्यांतून झपाट्यानें बाहेर पडून रस्त्यावर गेली. तिकडे बोट दाखवून मीं विचारलें,

" कशाला रे जिवा ? "

" भटजींना बोलवायला, साहेब ! "

" हं ! प्रायश्चित्त वाटतं ? मग कांहीं हरकत नाहीं. मला वाटलं, जीव द्यायची तयारी करते कीं काय ! "

" विहिरींत या प्रकरणाचा शेवट होईल असं नव्हतं वाटलं मला ! नाहीं तर दुसऱ्या गळाची व्यवस्था केली असती, साहेब ! "

" ए: जानेदो, जिवा ! बाकी तुझं ' चिंचेचं पाळं,' खूप आहे बुवा ! "

" म्हणजे, साहेब ? "

" चष्मा कसा हरवला ? लुगड्याची चिंधी कां अडकली ? अ ऽ ऽ ? ओळखलं कीं नाहीं, जिवा ? वकील आहे मी ! "

" खरंच, साहेब !

" बस, जिवा ! उद्यां काय बोर्बी—बी. बी. सी. आय्. पाळी—चार्मिंग ! "

---

# तारामण्डळ



"आहेत का बिनबुडवुंध? तार आहे हो तार!" अशा हाका आणि त्यांच्या पाठोपाठ दारावर धक्के बसूं लागले. मी लॉटरीचीं तिकीटें खरेदी करीत नाहीं, आणि परीक्षेला बसण्याचे माझे दिवस राहिले नाहींत. म्हणून "तार" म्हटलें कीं, कोणी तरी "ठार" झालें असलें पाहिजे अगर होण्याच्या पंथांत असलें पाहिजे अशी माझी दृढ समजूत होऊन बसली होती. त्यांतल्या त्यांत मलाच तार आली आहे असें ऐकलें म्हणजे माझ्या डोळ्यांसमोर तारांगणच दिसूं लागे. मंगळागौरीच्या दिवशीं आमच्या वाड्यांत पिंगा घालणाऱ्या मुली "इकडुन आली तार; तिकडून गेली तार! छबीचा नवरा मामलेदार!" असें खुशाल हंसत ओरडत, तेव्हां मला नवल वाटे. लहान मुलानें अजाणपणें सापाशीं खेळावें अगर अडाण्यानें विजेच्या तारेला हात लावावा, त्याप्रमाणें त्या अजाण पोरींनीं "तार" या भयंकर गोष्टीचा असा खेळ मांडलेला पाहून माझा थरकांप होई. आतां दारावरील धक्के आणि तारवाल्याच्या आरोळ्या ऐकतांच माझ्या हातांतला जिलेट गळून पडला. कापसांत ठेवलेल्या हिरव्या गोळ्याप्रमाणें साबणाच्या फेसांत ठेवल्यासारखें दिसणारें माझें तोंड न पुसतांच मीं दार उघडून तार घेतली. सही करतांना मी इतका कांपत होतों कीं फेसाचे लपकेच्या लपके आजूबाजूस उडूं लागले. त्यांतून बचाव करण्यासाठीं बिचारा तारवाला काम उरकल्याबरोबर पळाला.

तार उघडून वाचल्याबरोबर मी उद्गारलों, "छान! वा:! हें काय लचांड?"

"काय साहेब!" जिवा, कांहीं तरी घेऊन आला होता, तें पाठीमागें लपवीत म्हणाला.

"मी लचांड म्हटलं, जिवा?"

"जी, होय!"

"जिवा, तें काय आणलंस, पाहूं!" ती वस्तु भीत भीत माझ्यापुढें धरवीत जिवा म्हणाला, "क क कुचा आहे, साहेबः मला वाटलं......"

"समजलों, जिवा! दाढी करतां करतां एकदम उठलों तेव्हां भुंगा आला असं वाटलः होय कीं नाहीं?"

"भुंगा नाहीं, साहेब; झुरळ!"

"समजल्या रे! पण माझ उठण्याचं कारण, ही तार."

"आपण लचांड म्हणालांत साहेब!"

"लचांड नाहीं तर काय, जिवा? मम्मुआत्याला एखाद्या बातमीदाराप्रमाणं तार पाठवण्याची काय गरज होती कुणाला अऊक? पण छेः, तिचे बेत एकदम व्हायचे नि मग या तारा!"

"तारा येणार, साहेब?"

"होय, आणखी एक तारा येणार, जिवाः आणि तिची ती अंबामामी! अंबातारा आपल्या घरीं संध्याकाळीं उगवणार आणि तारामंडळ सुरू होणार, जिवा!"

"च् च् च्!"

"अभिप्राय तर मार्मिक दिलास, जिवा; पण त्या "विद्याहरणाच्या" दिवशीं मीं अंबामामींवर इंप्रेशन चांगलं मारून ठेवलंय्, नाहीं का?"

"म्हणूनच इथं त्यांना हा डाक बंगला सांपडला, साहेब!"

"डोंट वरी, जिवाः जा, जरा साफसुफीला लाग!"

संध्याकाळीं अंबामामी, तारा, एक मोठें तांबड्या चौघडीचें गांठोडें आणि एक एनॅमलची टिफीन बॉक्स असे चार डाग आले. अंबामामींचें वर्णन मीं मागें एकदा सप्रयोग (म्हणजे विद्याहरण नाटकाच्या प्रयोगाबरोबर) दिलेंच आहे. म्हाताऱ्या माणसांच्या रंगरूपांत वयानें विशेष फरक पडत नसल्यामुळें अंबामामी कितीही वर्षांनीं आमच्याकडे आल्या असल्या, तरीं जॉनी वॉकर, स्टिल

गोइंग स्ट्रॉंग अशाच होत्या. राहतां राहिली तारा ! तारा मात्र थोडी दिशाभूल करण्यासारखी होती. नुसत्या नांवावरून वाचकांनीं ती शुक्राची चांदणी असली पाहिजे असा कयास बांधल्यास नवल नाहीं. परंतु सत्य हे कल्पनेपेक्षां अघटित असते ! तारा कंपनीच्या जर मोटरगाड्या आसत्या. तर आमचें हें मॉडेल दोन टनी ट्रकचें होतें, एवढें सांगितलें म्हणजे मी दिशाभूल कां म्हणालों ते लक्षांत येईल. ट्रकच्या बॉडीला जसे इतर सर्व भाग मोठे लागतात, त्याप्रमाणे आमच्या ताराचें हूड ( केसांचें छप्पर ) मागचा स्टॅपनें ( कचकड्याची वेणी ), हॉर्न ( जबडा ), हेड लाइट ( डोळे ), बॉनेट ( नाक ) आणि रेडिएटर ( नाकपुडी ) वगैरे सर्व अवयव विस्तृत प्रमाणावर होते. शिवाय तिला मानेच्या चवडींचा शॉक–ॲबसॉर्बरही होता. वेणीवरचीं चारदोन शेवंतीचीं फुलें नंबर प्लेटीसारखीं दिसत आणि लुगड्यांचे निरनिराळे रंग तिच्या बॉडीला येत असले, तरी सर्वसाधारण ट्रकप्रमाणे तिची ' चासिस ' काळीच होती. ट्रकमध्ये कोणी बांधेसूद-पणाकडे लक्ष देत नाहींत. अशी ही ट्रक आमच्या शोरूममध्ये प्रदर्शन करण्या-साठीं अंबामामींनीं आणली होती. अर्थात् लचांडच ठरलें ते !

दुसऱ्या दिवशीं सकाळचा चहाचा घोट घशाखालीं उतरला नाहीं, तोंच मामींनीं " स्थळांची " यादी काढली. कां कुणास ठाऊक, पण कोणी स्थळांची चौकशी करावयास निघाला म्हणजे आमचा पेटन त्याला विचारी, " कां रे बाबा ? अगदीं लाज कोळून प्यालास का ?" त्यामुळे मामींनीं कागदाचे ते भेंडोळें काढल्या-बरोबर अगोदरच उथळ असलेल्या माझ्या मेंदूनं स्थळ सोडून एकदम उचल खाल्ली. मामी म्हणाल्या, " हे पाहिलंस का, टाट्र ! काळ्या हौदाजवळ हे टुमणे राहतात. त्यांना दोनशे रुपये पेणसल आहे. मुलगा एकच नि सत्तेचं घर ! मुलाची आई नि मावशीच काय ती मुलगी पाहणार..."

" पण मामी, त्यांचा मुलगा फारच टुमदार आहे असं ऐकतो. शाळेंत होता तेव्हां आम्हीं त्याला ' बहाव्याची शेंग ' म्हणत असूं ! "

" इश्शऽऽऽ ! अन् तारा कुठं एवढी सुटलीय् ? "

" नाहीं, पण हाडपेरानं जरा..."

" इतकं बारीक पाहत बसलं, तर कुणाचं लग्न व्हायला नको, टाट्या: सगळ्यांना अप्सरा कुठच्या मिळायला? आणि आमचीं नाहींत का लग्नं झालीं हीं एवढालीं शरीरं असून? हं, हे दुसरे तुल्या मारुतीजवळ डांगरे म्हणून राहतात. घरची शेतीवाडी: मुलं दोन: इष्टेक चांगली. मुलीला पाहणार मुलाचा बाप, चुलता आणि काकू. थोरल्या मुलाचं लग्न यंदा कर्तव्य आहे त्यांना!"

" कोण तो फोकूच कीं काय, मामी? खरोखरीच डांगर आहे. शाळेत असतांना माझ्या क्लासांतच होता. अजून तिथच आहे म्हणा. परवांच्या हरताळांत शाळेंत बेटा एकटा हिंडत होता, तर हेडमास्तरनीं रिपोर्टांत सगळ लिहिलं, सबंध वर्ग हजर होता! बाप रे! सामान्य मनुष्यदेहाचा वर्गच आहे तो ही–ही ही!"

" हां!" मामी एकदम ओरडल्या. चष्म्याच्या वरतून त्यांनीं माझ्याकडे एकदा पाहिलें. चूक सुधारण्याच्या उद्देशानें मीं म्हटलें, " खरंच मामी, आमचा हा फोकू डांगरे तुल्या मारुतीजवळ नव्हता राहात! ढोल्या गणपतीसमोर होता त्यांचा वाडा! तुझे हे डांगरे दुसरेच असतील मग."

" उगीच तोंड सोडायची सवयच आहे तुला, टाट्! मुकाट्यानं ऐकून घे! हे आणखी पोटफुग्यांचं स्थळ!"

" ओः कुठलं, सदाशिवपेठ हौदाजवळचं कीं काय? काळा हौद रिकामा करून आतां ते तिकडे गेले आहेत."

" गऽऽप रे! तुझं काय जातंय् ते आणखी एक हौद प्यायले म्हणून!"

" पण मामी, तिथून ते पुढं नाकझरीच्या समाचाराला जाणार..."

परंतु माझी कुरकुर बिलकूल न ऐकतां मामींनीं आणखी सात स्थळें मला सांगितलीं. जर एवढी मंडळी आमची टूक पाहायला येऊन गेली, तर माझ्या घरांत शिल्लक काय राहाणार आहे याचा विचार करीत मी बाहेर पडलो, तों दारांतच जिवा भेटला. मीं त्याच्या कानावर सर्व प्रकार घातला आणि म्हणालों,

" ती मागची एक सर्कस गेली नि आतां ही दुसरी आली! च्य! या लोकांना आपलं घर म्हणजे जुन्या मंडईचं मैदान झालंय् जसं कांहीं!"

" काय कराव, साहेब ; आम्यांचा वशिला नसता तर......"

" या जरतरीचा काय उपयोग, जिवा ? आजन्मापुरता मी चतुर्थाश्रमी आहें."

" चतुर्थाश्रमी ? "

" काय करणार ? स्थळं पाहायचीं ना ? लाज मर्यादा ठेऊन कसं चालेल ? "

" कोणतीं, साहेब ? "

" अरे. ते पोफळे ! "

" परवांच्या फौजदारींतले आपले पक्षकार, साहेब ! "

" ऑ ? असं का ? बरं हे मुंगळे ? "

" स्मॉलकॉजचे शिरस्तेदारच ना ? "

" अर्रर्र ! माझ्या कसं लक्षांत आलं नाहीं कुणाला ठाऊक ! बरं, तिसरे आपले भिकाजीपंत भोपळे; इथं तर कांहीं हरकत नाहीं ? "

" त्या दिवशीं काव्यगायनांत त्यांचा भोपळा फुटला, साहेब ! "

" एः ! कमाल करतोस बुवा तूं ! मी इतका कसा चकलों बुवा ? पिलुमामा पिंगळे तो सारू ? "

" आपल्याला त्यांचे वीस रुपये अजून द्यायचे आहेत, साहेब ! "

पाण्यानें भरलेल्या माठप्रमाणें मी झिरपूं लागलों ! रुमालानें तोंड पुशीत मीं विचारलें.

" मग, आतां जिवा ? "

माझ्या हातांतील यादी नीट पाहून जिवा म्हणाला, " टुमणें आणि डांगरे ठीक आहेत, साहेब ! "

" आणि बाकींच्याबद्दल खुलासा ? "

जिवानें बाकीच्या प्रत्येक नांवापुढं एकेक अजब थाप लिहून दिली. निवडून काढलेल्या दोनच स्थळांकडे जाऊन त्यांच्या येण्याचा वेत वगैरे नक्की करून आलों. दुसऱ्या दिवशीं रघुनाथराव टुमण्यांना सकाळची आणि गोविंदराव डांगऱ्यांना संध्याकाळची अशा अपॉइंटमेंटस् दिल्या.

घरीं येतांच जिवानें लिहून दिलेल्या थापा मामींना सांगितल्या. त्यांचे "हुं ऽऽ! हां, काय बाई तरी! अन् मग सांगवतं कसं यांना? च् च् च्! अन्गो बिचारा!" असे बरेच उद्गार निघाल्यावर मीं टुमण्यांच्या आणि डांगऱ्यांच्याबद्दल सांगितलें. मामी खुलल्या! माझ्याकडून चुकारपणा मुळींच होत नाहीं असें दर्शविण्यासाठीं मी दाराआड उभ्या राहिलेल्या एका व्यक्तीकडे पाहून हंसत म्हणालों, "अन् मामी, ताराबाईंना जरा महेश्वरी लुगडं, पोफळी पदराच नेसायला सांगा. आणि डोक्यांत एखादी वेणी नाहीं तर फुल...कारण...हो. आमची ही शहरी मंडळी. त्यांची मेंटॅलिटी जरा निराळी असते म्हणून म्हणतों!"

"स ऽ ऽ ऽ गळं मला ठाऊक आहे, दादा! पण तुला मात्र बजावून ठेवतें. चार जणांदेखत संभाळून घ्यायचं काम तुझं आहे. 'इंग्रजी पांच बुकं झालींत, पेटी वाजवते, शिवणकामांत पटाईत; घरकामाला अगदीं वाघ! रांधाकांत सुग्रण, गळा गोड; कित्ती तरी मेळ्यांत पदकं मिळवली आहेत. कशिदा काढते, पोहायला येतं, शिशुसप्ताहांत बक्षिस मिळालंय!' असं सगळं ठांसून सांगायचं बरं का! मी पाहतें आहें कालपासनं; नाहीं तिथं तोंड हवं तितकं वाहवेल तुझं! पण पाहिजे तिथं ब्र निघेल तर शपथ! म्हणून अगोदर सांगतें आहें."

"काळजी नको, मामी त्याची! एकदा आपलं माणूस म्हटलं, म्हणजे आपण नाहीं मागंपुढं पाहत हां, हवं ते बोलायला. तुझी हरकत नसल्यास याच्यापेक्षां कित्ती तरी गोष्टी सांगेन मी. कसं केलं तरी वकील आहें. बोलायचा तर धंदाच आहे आमचा." असा धीर देऊन मी स्नानाच्या तयारीला लागलों.

संध्याकाळीं घरीं येऊन पाहतों तों माझ्या छोट्या खोलीचा ऐनेमहाल बनलेला दिसला. जिकडे तिकडे चकपक्! या खोलींतून त्या खोलींत जिवाची तर सारखी धांवपळ चालू होती. कपडे काढून मी कपाटाजवळ गेलों. पाहतों तों आंतल्या वस्तूंचीही उलथापालथ झालेली! मीं रागावून जिवाला हाक मारली,

"जिवा, इथली स्नोची बाटली उचललीस?"

"नाहीं साहेब; मामींनींच घेतली!"

"बरं, पावडरचा डबा!"

" मामींनींच आंत ठेवलाय्, साहेब ! "

" अंझोरा ? "

" तिकडेच, साहेब ! "

" बरं, कॉलरचा स्टँड इथं होताः तो तर नाहीं मामींनीं नेला खास ! "

" त–त–त्याची चमकी करून आणली, साहेब ! "

" शाब्बास ! जिवा हें तर भयंकर दिसतंय् ! " जिवानें खालीं मान घातली. मी इकडे तिकडे पाहू लागलों. " हा कागदांचा हार कुठून आला, जिवा ? "

" ताराबाईंनीं केला, साहेब ! मामींनीं ठेवला तिथं ! "

" हे रुमाल ? हीं कमळं ? "

" ताराबाईचींच, साहेब ! "

" हा फुंकण्यांचा पडदा ! पोतीचं ताट ः कशिद्याची परडी, झिगाचं तोरण ः "

" सगळं ताराबाईचं हस्तकौशल्य ! "

" वाः तारामंडळ आर्ट गॅलरीच झाली ही ! इतक्या कुशल आहेत ह्या ? "

" असं मामी म्हणतात, साहेब ! "

" अस्संऽऽ ! अन् जिवा, खिडकीला हा अस्मानी पडदा कशाला ? "

" व्याही पाहायला आले, म्हणजे ताराबाई इथं बसणार, साहेब ! मग त्यांच्या अंगावर या पडद्यांतून किंचित् निळसर प्रकाश पडेल ! अशा प्रकाशांत माणूस बरं दिसत असं मामींचं म्हणणं ! "

" शाब्बास ! " मी अगदीं थिजून गेलों ! सिनेरियो आणि सेटिंगजमधील अंबामामींचें तें नैपुण्य पाहून माझी मलाच लाज वाटली ! वरतून ओक्यावोक्या दिसणाऱ्या या बायका आंतून किती इंग्लिस असतात याची मला चांगली कल्पना आली. " कहर आहे, जिवा ! " एवढाच शेरा मी देऊं शकलों. वधू-परीक्षेसाठीं एखादी युनिव्हर्सिटी काढून मामींना तिच्या चान्सलर कराव्या कीं काय या विचारांत मी गर्क झालों; इतक्यांत पेटी, तबला, दिलरुबा इ. वाद्यें, निरनिराळ्या नमुन्यांच्या ब्लाउज व जंपर्सचें एक गांठोडें, सुतरफेण्या, रसगुल्ले

आणि आंब्याची बर्फी इत्यादि मिठाई असा बाजार दोन हेलकऱ्यांनीं घरांत आणला. थोड्या वेळानें निरनिराळ्या वस्तूंची योग्य ठिकाणीं मांडणी करण्यांत जिवाची तारांबळ उडून गेली.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं ठरल्याप्रमाणे ढुमणे मंडळी आलीच. तारेचा मेकप मामींनीं स्वतः केला होता. आमच्या स्वयंपाकघरांत मामींनीं ग्रीनरूमचा थाट उडवून दिलेला होता एवढें सांगितलें म्हणजे हा मेकप कसा होता तें लक्षांत येईल. एखाद्या स्टेट गेस्टच्यावर ढुमण्यांची बडदास्त ठेवली जात होती. पुरुष-मंडळींत येऊन बसल्यावर तारेला व्याह्यांनीं कांहीं प्रश्न विचारले. तिने दिलेलीं उत्तरें फारच गूढार्थाचीं असावींसें दिसलें. कारण त्यांचा बोध ढुमण्यांना माझ्या-पेक्षां अधिक झाला नाहीं. पुढें, वाचण्याची तीच गत. अर्थात् जेवणारांना न आवडणाऱ्या पदार्थांचा उगीचच आग्रह सुरू झाला म्हणजे तो जसे बचावाचें धोरण स्वीकारतो. त्याप्रमाणे ढुमण्यांनीं आतां पुरेपुरेचें ढुमणें सुरू केलें. मीं लगेच मामींनीं सांगितलेलें सर्व तारामाहात्म्य भराभर म्हटलें आणि शेवटीं ठरल्याप्रमाणें म्हणालों, " जरा बाजाची पेटी, नाहीं तर दिलरुब्यावर एक फक्कडसा मालकंस म्हणून दाखव पाहूं, ताराबाई ! " तारेनें उठण्याचा आव आणला; इतक्यांत पानाचा तोबरा एका गालफडांत ढकलून ढुमणे उद्गारले,

" उं हुं ! उं हुं ! णॉको ! ज्यरूर णॉही कॉई टर्यॉची ! " तारा चटकन् पुन्हा बसली.

" जिवा गोपूकाकांकडे जा; आणि त्यांचा पोर्टेबल घेऊन ये पाहूं जरा ! " मी म्हणालों.

" कॉशॉला ? "

" टाइप करून दाखवील ताराबाई ! "

" छ छ छ ! कॉशॉलॉ तसदी उर्गाच ? "

" बरं जिवा, ताराबाईनीं केलेल्या बर्फीच्या वड्या आण पाहूं ! "

जिवानें आणलेल्या वड्या मिटक्या मारीत खात ढुमणे म्हणतात, " वाः ! उत्तम झाल्यात. अगदीं तुळजाराम मोदीकडील बर्फीच्या तोंडांत मारतील ! "

मीं " कसचं, कसचं " केलें; तारा आंत गेली आणि टुमणे उठले. जातां जातां ते म्हणाले,

" हें पाहा टाटासाहेब, आमच्या नानाचा पुढं चित्रपट काढण्याचा विचार आहे. तेव्हां...राग नका येऊं देऊं...आपलं अगोदर स्वच्छ विचारलेलं बरं ! ताराबाईला सिनेमांतलं काम जमेल कीं नाहीं ? " क्षणाचा विलंब न करितां मी उत्तरलों,

" ओः ! त्याचा प्रश्नच नाहीं. ताराबाई लहानपणापासून नाटकं करण्यांत पटाईतच आहे. तसं पाहिलं तर किर्लोस्करांची ती भाचेनात लागते आणि गणपतराव जोशांची चुलत पुतणी ! म्हणजे दोहींकडूनही तो गुण उतरलाच आहे. नानासाहेबांसारख्या नटश्रेष्ठांच्या तालमींत ती एकदा......"

परंतु सगळं वाक्य संपण्याच्या अगोदरच हो हो, हॅा हॅा करून टुमणे बाहेर पडले देखील.

पुढें दुपारीं त्यांची चिठ्ठी आली. " चित्रपटकलेच्या उच्च शिक्षणासाठीं जर्मनींत जाण्याचा चिरंजीवांचा बेत आहे. तरी तूर्त लग्न कर्तव्य नाहीं. तसदीची माफी असावी. " यावर मामींची तासभर जी पुटपुट चालू होती, तिच्यामुळें घरांत एक तास खरोखरीच टाइपरायटर वाजत राहिला !

संध्याकाळीं गोविंदराव डांगरे आले. सकाळच्याप्रमाणेंच सर्व प्रयोग चालू झाला. फक्त खाण्यापिण्याचें ( पिण्यांत धूम्रपान आलेच ) प्रमाण जास्त होतें. " ताराबाईनें केलेला " दुध्याहलवा त्यांना फारच आवडला व नमुना म्हणून एक द्रोणभर हलवा उपरण्यांत बांधून घ्यावयास त्यांनीं कमी केलें नाहीं. शेवटीं जातां जातां टुमण्याप्रमाणेंच त्यांनीं अवचित प्रश्न काढला, " पण, खरंच, बरी आठवण झाली. टाटासाहेब, मुलीला घोड्यावर बसतां येतं का ? "

मीं तावडतोब सांगितलें,

" म्हणजे ? न आलं तरच नवल ! अहो, ती लहानपणापासून जवळ जवळ नेहमींच घोड्यावर आहे असं म्हणानात. घोडेपीर तर आज कैक पिढ्या त्यांच्या

घराण्यांत आहे. शिवाय तिची प्रॅक्टिसही कांहीं थोडी नाहीं. पहिल्यानं काठीचा घोडा होता. पुढं, बुद्धिबळांतले घोडे पायाच्या बोटांत धरून टापा वाजवीत पळतांना आम्हीं तिला कितीदां तरी पाहिली आहे. त्याची काळजीच नको अगदीं. तिच्याजोगतं कुठलंही जनावर आणून उभं करा. एका चपराकींतच..."

मला पुढें बोलूं देण्याची तसदी न देतां डांगऱ्यांनींही एकदम दाराबाहेर धूम ठोकली! कांहीं वेळानें त्यांची चिठी आली. "घरीं आलों तों भयंकर प्रकार! चिरंजीवाचे मन एकाएकीं अस्वस्थ झालं असून सारखा 'घोडेपीर! भूतेपीर! असा धोश्शा चालू आहे. अशा स्थितींत कार्य पुढील मार्गशीर्षावर ढकलणं भाग पडत आहे. बाकी सौ. कां. ताराबाई आम्हांस पसंत आहेत. तटावरून घोडा फेकणारी ती साक्षात् लक्ष्मुम्बाईच आहे. असा आमच्या मंडळीचा अभिप्राय पडला. सुज्ञांस अधिक लिहिणे नलगे!" मीं बेफिकीर मनानें ही चिठी मामींना वाचून दाखविली. त्यांनीं आदळआपट खूप केली. शेवटीं प्रकरण नेहमीप्रमाणें नशिबाच्या योगावर आलें. मला मात्र एकदां हे लिगाड उद्यां हलणार या विचारानें रात्रीं गार झोंप लागली.

सकाळचा चहा झाल्यावर मामी गाड्या पाहायला सांगतील, असा माझा अंदाज होता. तो सपशेल हुकला! उलट मामीनीं मला अगदीं हलक्या आवाजानें बोलावून, माजघरांत नेलें. ओठांना कान्होल्यासारखी मुरड घालीत त्या म्हणाल्या,

"अलीकडच्या पोरी भारीच झांबरट हो, टाट्ट!"

"कां हो? पळून बिळून गेली कीं काय?"

"ना ऽ ऽ हीं! पण काल अवशीस जी उठून बसली ती उजाडेवेरीं डोळा नाहीं. सारखा एक ध्यास. आणि तो तरी काय विचित्र बाई!" पहिले बोट हनुवटीखालीं धरून मामींनीं डोळे किलेकिले केले. त्या वेळीं त्या थेट फू मांचूसारख्या दिसूं लागल्या.

"कसचा ध्यास?"

"ध्यास कसचा रे! वेडच आहे तें. मी डागच देणार होतें तिच्या तोंडाला. पण म्हटलं एकदां तुझ्या कानावर घातलेलं बरं!"

" अहो हो. पण तें काय ? "

" तिला म्हणे एका ज्योतिष्यानं सांगितलंन्, कीं तिचं लग्न एका वकिलाशीं व्हायचंय् ! आणि तें डोक्यांत घेऊन कालपासनं भलतंच बरळत सुटलीय्. "

" कुणावर मन गेलं आहे कीं काय तिचं, मामी ? "

" दुसऱ्या कुणावर, तुझ्यावरच ! "

" ओः ! ऑ ! अं-आंः- ! अं-आं-काय थट्टा ही, मामी ? "

" तर काय ? पांचटपणा सगळा. दोन दिवस तुला पाहते काय, काल तूं दोनदां लोकांपुढं तिचं गुणवर्णन केलंस- त्यानं हुरळते काय- आणि एकदम प्रेम बसलं म्हणते काय ! साराच चमत्कार ! मी बोलायला गेलें तर म्हणते लग्न करायचं तर तुझ्याशींच; नाहीं तर..."

" बाप रे ! नाहीं तर काय ? "

" डाव्या हाताची मूठ वळून अणि दांत गच्च मिटून मामी म्हणाल्या, ती पहा कार्टी, मागच्या विहिरीवर जाऊन बसलीय् केव्हांची ! "

" हरे राम ! " एवढेच उद्गार माझ्या तोंडून निघाले आणि पोटांत कालवाकालव सुरू झाली. " आतां काय करणार, मामी ? पहिल्या भेटींत प्रेम; लगेच निश्चय- जाहीरनामा आणि सत्याग्रह ! इतक्या झपाट्यानं या मुलींची मोहीम सुरूं झाली हं, मामी ! "

" हं ऽऽ ! ! पांडुरंगा, मिटव एकदा डोळे माझे ! "

" मानसोपचार डॉक्टरांना घेऊन येऊं का, मामी ? "

" आतां आणखी थेरं नकोत, टाटू ! तूंच हो शहाणा आणि हो म्हण झालं एकदाचा ! "

" मामी...मीमा...मेमा..."

" असा बावचळूं नकोस, टाटू ! आपद्धर्म म्हणून करायचं झालं ! "

माझ्या देहयंत्राचा ठोकळा झाला ! मामींनीं जणूं काय त्याच्यावरून इस्तरीच मारली होती ! हातापायांना चलनवलन येईपर्यंत अमोनियाची बाटली नाकाला

त्याकडे पहात राहिलो. जिवा समोर दिसतांच माझ्याने राहवेना. स्टॅटेनियस ओव्हरफ्लो बाहेर आला--

"जिवा ! गेला, मेला, टार जर्जर झाला, बाबा हा हुज्जा: प्रेम मोताद तारक्यांना !"

"अगं काय, साहेब !"

"अरे बाबा, तिचं प्रेम बसलं माझ्यावर ! मला 'तारा' लागली, आतां ताराज्ञा होणार !"

"एकदम झपाटा आला, साहेब !"

"होय रे बाबा. जा. चवलींच्या गोळ्या घेऊन ये !"

"थोडं थांबाव, साहेब ! तोवर सांपडेल एखादा इलाज !"

"कसचा इलाज आतां, कपाळाचा !"

दुसरा दिवस विमनस्क स्थितींत गेला. मनःशांतीपासून इतर कशानी मला ढकलत नव्हती. त्या दिवशीं दोनतीन प्रसंग जरा चमत्कारिक घडले. दाढी करतां करतां साबणाने लक्के पुसण्यासाठीं जिवाजवळ कागद मागितला. त्यानं दिलेल्या कागदावर तांबड्या शाईनें कांहीं तरी लिहिलें होतें. पण तें वाचण्याइतकें माझें चित्त ठिकाणावर नसल्यानें मी त्या कागदाला साबण पुसला तोंच आंतून "अग बाई ! च् च्" असे उद्गार ऐकूं आले आणि फळीवरचा उंच सुगंधि शींही खालीं पडला. बाहेर जातांना कोट अडकला तो हो एकदम कॉलरींतून शर्टांत कांहीं तरी शिरल्यासारखें वाटलें. मी झटकन् कॉलरींत हात घातला, तो प्राणी चिमटींत गच्च पकडला आणि खिडकीच्या बाहेर जोरानें भिरकावला. मग खिडकींत जाऊन तें काय होतें हें पाहिलें. सोनचाफ्याचें फूल ! इतक्यांत स्वयंपाकघरांत कसली तरी आदळ आपट झाली.

शेजारचा गण्या रंगाची पिचकारी दुरुस्त करून या, म्हणून मागता माझ्या मागें लागला. मला मोठेपणा देणाऱ्या मुलांचें काम करतांना असा माझा रिवाज आहे. म्हणून त्या मनःस्थितींतही मी गण्याच्या पिचकारींतला दट्ट्या काढला;

जिवानें पुढें केलेलें एक फडके फाडलें आणि त्याच्या चिरटोळ्या दट्ट्याभोंवतीं गुंडाळू लागलों. त्या वेळीं तर अंतर्गृहांतून एक अस्फुट किंकाळीच ऐकली !

संध्याकाळीं कोर्टांतून आलोंः जिवाने तोंड धुण्यासाठीं पाणी पुढें केलं, तें घेऊन मोरीवर गेलों आणि चूळ भरून हात धुतले. तें पाणी वाईट लागलें, म्हणून जिवाला म्हणालों "कसचं रे पाणी हें? अगदीं मचूळ न् कसंसंच लागतंय् !" तोंच "म्यच्च्यूळ अन् कशशंच् !" असा माझ्या मागें खणखणीत आवाज निघाला. मीं दचकलों ! मागें वळून पाहतों तों अंबामामी चष्म्याच्या खालतून पाहत आपल्या नाकाची डबल बॅरल बंदूक माझ्यावर रोखून उभ्या ! मीं चिडून विचारलें, "काय झालं मामी, जांवयांवर उगीच खेंकसायला? आधींच मला नाहीं चैन, न् त्यांतनं तुमचा हा धुडगुस !"

"जळ्ळा जांवईपणा तुझा ! पोरीनं किती खटपटीनं पन्हं बनवलं होतंन् आणि त्याच्या चुळा कि रे टाकल्यास मोरींत, निलाजऱ्या !"

"पन्हं ? मला काय माहित तें पन्हं होतं म्हणून ?"

"जीभ आहे, का काय आहे कुणाला ठाऊक ! आजचे तुझे विलक्षण चाळे पाहून तारा विटून गेली अगदीं ! सारखी डोळ्यांतून पाणी काढते आहे !"

"मीं काय केलं, मामी ?"

"आतां काय करायचं राहिलं आहे ? एक सोन्यासारखी कविता तुझ्यावर तिनं रचलीन् आणि तिला तूं साबण फासलास. तिन कोटाला हौशीनं लावलेलं फूल रस्त्यावर फेकून दिलंस. एक वरीसभराची मेहनत लागली होती, तो रुमाल विणायला; आणि त्याच्या चिंध्या करून तूं त्या कांटर्याच्या पिचकारीला गुंडाळल्यास ! आणि पन्ह्याचा आतां हा प्रकार !"

"पण मामी, मीं जाणूनबुजून का केल्या या चुका ? माझं मनच मुळीं..."

"नसायचंच कधीं ठिकाणावर. तरी मीं ताराला हजारदां सांगितलं, कीं बाई ग, नीट विचार करून बोल काय बोलायचं तें ! पर झालं; तिचे डोळे लवकरच उघडले..." एकदर प्रकार कमा झाला आणि त्याचा परिणाम काय होणार तें

मनांत येतांच मला हंसूं आलें. त्यामुळें मामींचा विलक्षण भडका उडाला आणि त्यांच्या तोंडून किती तरी ठिणग्या माझ्यावर पडल्या. शेवटीं "मम्मुताईचं नांव चांगलं राखशील बरं, दिवट्या! अशा माणसाशीं लग्न करण्यापेक्षां विहिरींत जीव दिलेला बरा, असं तारा मला म्हणाली! तिकिट काढायलाच गेलीय अत्तां हपिसांत!" असें म्हणून त्यांनीं बांधाबांध केली. थोड्या वेळानें माझें घर निरंबातारा झालें!

जिवा दिवे लावण्याच्या उद्योगांत होता, त्याला उद्देशून मी म्हणालों, "वाह्वा रे तारा! खूप करते प्रेमाच्या मोहिमा!"

"ताराबाईना दोष देऊं नका, साहेब: त्यांना सगळं समजत होत!"

"वा:! मग कालची ती जीव देण्याची भाषा विसरलास वाटतं!"

"त्या काल तसं मुळींच म्हणाल्या नव्हत्या. मामींनीं त्यांना विहिरीवर बसवून ठेवलं, साहेब! आपल्यावर प्रेम वसण्याची भाषाही ताराबाईची नव्हती, साहेब!"

"अरेच्चा! म्हणजे कालची कारवाई अंबामामींची!"

"होय, साहेब; आणि आजही ताराबाईचं मन वळवण्यासाठीं त्यांनींच खटपट केली!"

"मग आज ताराबाईनं जीव देण्याचा खरोखरीच धाक घातला तर?"

"म्हणून तर मामींना इतका संताप झाला, साहेब!"

"खरंच कीं जिवा, तें माझ्या लक्षांत आलं नाहीं! नाहीं तर म्हटलं या मुलीचा हा प्रेमाचा पुंडावा चांगलाच आहे!"

"पुंडावा होता: पण मामींचा, साहेब?"

"एकदम कबूल! पण जिवा, प्रेमाच्या वेढ्यांतला तूं मात्र मुरारबाजी ठरलास! एकदम कत्तल!!"

# मोरांची भानगड !




आमन्याच घराच्या दिशेनें येत असलेली एक तरुणी मीं अचानक पाहिली. लगेच " नंदनवन फुललें ऽऽऽ पाहिलें ऽ ऽ आ ऑ ए...." इत्यादि सुरावट गुणगुणूं लागलों. टेबलावर कार्ट्रेक्ट अॅक्टचें पुस्तक उघडून ठेवलें. शर्ट झटकून डोळ्यांतलीं चिपडें काढून टाकलीं. सिगारेटची पेटी कोटाच्या खिशांत दडविली आणि दार उघडून ठेवलें. " ही तरुण कोण गोड बाला ? उल्हास अहा उताला आला !" " सतेज काळे टपोर डोळे, विसरताळा गरीब भोळे ", " गोरी सलील सुंदर, देखन ही कुमारी " इत्यादि दृश्य विषयांस साजेशा माधवराव-कविकृत शब्दपंक्ति तोंडांत घोळूं लागल्या. ती दारांतून प्रविष्ट होतांच तोंड शक्य तितकें फताडें केलें. आपली बॅग टेबलावर ठेवून ती इकडे तिकडे नवखेपणानें पाहत खुर्चीवर बसली.

बोलावयास मी साठमूठ करीत आहें असें पाहिल्यावर तिनेंच प्रथम सुरवात केली, " आमच्या शाळेंत नवीन प्रयोगशाळा करावयाची आहे."

" असें का ? वा ! आनंदाची गोष्ट आहे. प्रयोग करून पाहायचे शाळेंतल्या मुलींचे हेच दिवस !" मीं कसेंबसें उत्तर दिलें.

" प्रयोगशाळेच्या मदतीसाठीं आम्हीं " पुण्यप्रभावाचा " प्रयोग करून दाखविणार आहों !"

नाजुक भावना मनांत थरारूं लागल्या, कीं तोंडावर एक प्रकारचें हास्य येतें, तें तिच्यापासून दडविण्याचा प्रयत्न करीत मी म्हटलें,

" ओहोः वाः! आमच्या समाजाला त्याचीच जरूर आहे!" माझ्या मार्मिकपणाची मलाच शाबासकी वाटली. परंतु उलट ती त्रासून म्हणाली,

" तसं नव्हे! पुष्पप्रभाव नाटकाचा प्रयोग करायचा आहे."

" ठीक, ठीकः दुधांत साखरच मग!"

" खेळाचीं तिकिटं आणलीं आहेत. पाहा बाई आपल्याला कोणतं हवं तें!"

" अ...अ...कुठपर्यंत आहेत?"

" बारा आण्यांपासून पांच रुपयांपर्यंत."

" फाडा ग्यालरी एक बारा आण्यांच."

" इश्श ऽऽऽ? वकील मंडळींनी पांच रुपयांचीं घ्यायचीं तीं. हें काय?" असें म्हणून तिनें लपकन् एक मुरका मारला! माझ्या जातीवर जाऊन मी चटकन " आ! हा!" असें उद्गारलों, आणि लागलीच जीभ चावली. पण तिनें विचारलेंच,

" काय म्हणालांत?"

" कांहीं नाहीः कालपासून जरा अर्धशिशी दुखते आहेः मधेंच अशा शिणका मारतात."

कादंबऱ्यांतील नायिकाप्रमाणें सगळ्याच मुली आयत्या वेळीं एकदम घाम घेऊन ऊठत नसतात म्हणून ठीक! वेळ निभावली, असें हसतांच मी सांगितलें, 'मग तुम्हांला वाटेल तें द्या!"

तिनें थिएटरचा नकाशा काढलाः एका नंबरावर फुली केली, तो नंबर तिकिटावर लिहिला आणि तिकिट फाडून माझ्यापुढें टाकलें. आंतल्या खिशांतून मीं पेटींत पाकिट काढलें. पण उघडून पाहतों तों तें साफ रिकामें! एकामागून एक सगळे खिसे चाचपले: तरी तंबाखूचा एकही तुकडा हातीं लागेना! बरें, तोंडावर आश्चर्य दाखविण्याची सोय नव्हती. कमलेच्या नटाप्रमाणें सगळें आंतल्या आंत जिरवावें लागलें. कांहीं तरी एकदम आठवल्यासारखें करून पेटी उघडली, तों पुनः धक्का बसला. तसाच माजघरांत गेलों आणि गड्यांचा

डबा, मिठाचा रांजण आणि मसाल्याचे पाळें हीं भराभर उपडीं केलीं: पण व्यर्थ ! आतां मात्र चांगलाच बावरलों: जिवाही बाहेर गेल्यामुळें मदतीचा कुठचाच इलाज दिसेना. माजघरांतून बाहेर आलों, तेव्हां ती खुशाल भिंतीला टांगलेलीं कॅलेंडरें पाहत फिरत होती. माझा पडलेला चेहरा पाहतांच ती हसून म्हणाली,

" इश्श ! आटपा ना लवकर. मला समजतात या युक्त्या सगळ्या ! "

" छे छे ! मी अशी ट्रिक फोटोग्राफी जन्मांतरीं करणार नाहीं...पण... पण..."

" खरं सांगायचं, म्हणजे चांगले बावरलां आहांत तुम्हीं ! "

" ओः ! अं...हेः ! त्याचं असं झालं..."

" बोला ना लवकर ! का जाऊं मी आपली ? "

" न्-नाहीं, वा ! असं कसं ? पण ही महिन्याचा शेवट आल्यामुळं जवळची कॅश संपली आहे. बाकी नोकर गेलाच आहे चेक घेऊन बँकेंत..."

" आज हो कुठची बँक उघडी ? आज तर रविवार ! "

या तडाख्यानें मात्र मी इतका गोंधळलों, कीं खालीं खुर्ची आहे असें समजून एकदम बसावयास गेलों, तों जमिनीवर आपटलों ! सावरून घेण्याच्या हेतूनें चटकन् उठून म्हणालों, " पाहिलंत, डोकंदुखीमुळं कशा घेऱ्या येतात त्या ! "

" बरं, आतां कांहीं फार बोलूं नका ! उद्यां पाठवा चेक बॅंकेत. मी पैसे न्यायला परवां येईन."

" आभारी आहे मीः पण आपलं—आपलं—"

" माझं नांवच किनी ? मिस् झिगी उल्हासकर. आतां जातें मी ! "

ती गेली. कॉलेजशिक्षणानें आंचवलेल्या माझ्यासारख्यांच्या आचारविचारां-विपर्यींचें तिचे सूक्ष्म ज्ञान पाहून मी चकित झालों. आणि विनाकारण उद्भव केलेली ही भानगड मिटवावी कशी या विचारांत गढून गेलों.

जिवा बाहेरून येतांच त्याला मी सर्व हकीकत सांगितली आणि विचारलें, " मग जिवा, ती परवां आली म्हणजे ? "

" तिकिट परत करावं, साहेब ! "

" मोठंच सांगितलंस, जिवा ! "

" दुसरा काय इलाज, साहेब ? "

" च् ! पण जरा दमानं घेऊं रे. ती झिंगी उल्हासकर कशी–! पण जिवा, तुला विशेष सांगायला नकोच म्हणा ! पोरगी म्हणजे थेट ग्लोरिया स्वान्सन् ! "

" मरना लाय नाहीं, साहेब ! "

" मरना दो, तुझी मरना, प्रत्येकाची आवड निराळी असते, जिवा- ग्लोरिया म्हणजे मूर्तिमंत रति, अहाहा ! "

" पण साहेब, हा पांच रुपयांचा प्रश्न आहे ! "

" म्हणून इलाज पाहिजे जिवा. परवांपर्यंत पांच रुपये मिळवायचे आहेत ! "

" चार आण्यांत ग्लोरियाचं फक्कड चित्र मिळेल, साहेब ! "

" कच्चा रे कच्चा अगदीं ! नुसतीं चित्रं पाहायचीं असलीं तर राजभुवनाच्या दुसऱ्या मजल्यावरून एक सिंगल झोंकून ये. म्हणजे पुन्हा बोलणार नाहींस; म्हणे चित्र पाहा फक्कड ! तोंड पाहा याचं ! "

" म्हणजे, पांच रुपये हवेच असं दिसतं एकंदरींत ? "

" मग शंका आहे कीं काय ? अशा मुली आपल्या पावलीं घरीं आपोआप चालून येत नसतात, महाराज ! "

कांहीं वेळ विचार केल्यावर जिवा म्हणाला,

" सोन्याचा भाव वाढलाय्, साहेब ! "

" आतां तर कळसच केलास माझ्या सोन्या ! बेटया, सोनं आहे कुणाजवळ इथं ? "

" आत्यासाहेबांचा मोर इथंच राहून गेला होता, साहेब ! "

" आं ! खरंच ! पण कुठं ठेवला होतान् काय कीं ? "

तावडतोब आम्हीं मोर हुडकून काढण्याच्या खटपटीस लागलों. कांहीं वेळानें तो कुंकवाच्या कुयरींत सांपडला. इतक्यांत जिवानें शंका काढली, " पण साहेब, आत्यासाहेबांना तो पुन्हा लागला तर–"

" ए: ! आत्याची आठवण इतकी धड आहे कुठं, जिवा ? अन् शिवाय अशा लढयाओढयाच्या कामांत सगळे गुन्हे माफ असतात ! "

" खरंच साहेब ! "

लगेच मी बाहेर पडलों. सराफकटयांत गेलों, मोर आटवला: त्याचा रवा पाडला. धर्मकांटयावर वजन केला आणि एक तोळा चार गुंजांचे सव्वाबत्तीस रुपये घेऊन परत निघालों. आत्याच्या विसराळूपणावर मी नेहमीं चरफडत असे. " निघावें परी वस्तुरूपें उरावें " अशा शब्दांनीं तिच्या या खोडीची मी भरपूर टिंगलही करीत असें. पण आज तोच अवगुण माझ्या पथ्यावर पडलेला पाहून दैवाच्या विचित्र लीलेचें मला कौतुक वाटूं लागलें. आणि परवां झिंगी आली, म्हणजे कसकसें संभाषण करावयाचें या मनोराज्यांत मी दंग होऊन गेलों.

पण दैवाचें कौतुक कोणीं करूं नये ! घरीं आलों तों जिवानें मुकाटयानें एक पत्र माझ्या हातांत ठेवलें. माझ्या पोटांत धस्स झालें ! ते उघडून वाचतांना माझा हात थरथर कांपत होता. वाचतां वाचतांच एकाएकीं माझ्या तोंडून उद्गार बाहेर पडले.

" अर्रर्र. च्च्, ठार झालों, जिवा ! "

" काय. साहेब ! "

" कर्म माझं ! नुसता गामा आहे. जिवा ! "

" कोणता, साहेब ? एक्का कीं कल्लू ? "

" अगदी शंभरनंबरी कल्लू ! सारखी कुस्ती करतोय् माझ्याशीं. अशा चाटा मारण्यांत पटाईत. "

" कल्लू चाटा मारीत नाहीं, साहेब ! "

" कांहीं का मारीना ? " मीं म्हटलें, " जिवा ! व्यायामाचा मी कुठं आहें माहितगार ? "

" वस्तादांनीं कुठचा पेंच घातला, साहेब ? "

" हा काय: या पत्राचाच. जिवा ! मम्मुआत्याचं वारंट आलंय् ! "

" वारंट, साहेब ? "

" विसरून राहिलेला राव्हा तोळ्याचा मोर पाठवून देण्याची ऑर्डर ! "

" समजलो साहेब ! बेसावध स्थितींत नशिबाचा हल्ला आलाय्. साहेब ! "

" म्हणजे, खैबरखिंडींत जनरल पोलाकच जसा कांहीं ! "

" पण आतां असं करतां येईल, साहेब—"

" काय म्हणतोस. मार्ग आहे ? जिवा. आज तुझ्या इंजिनांत स्पार्क लवकर पडली म्हणायची ! "

" मोर परत घ्यावा. साहेब ! "

" हाच का मार्ग ? हॅः ! अरे. मोर आटवून, रवा पाडून विकला चक्क ! आतां ! "

" अर्रर्र, चुच्च् ! "

" अर्रर्र करीत मोराचीं पिसं लावून बसा मेंढ्या हाकीत आतां ! एः ! तोंड काढतोय म्हणे ! "

तिसऱ्या दिवशीं मला वास्तविक किती उल्हास वाटायला पाहिजे होता ! पण मध्येंच असें गंडांतर आलें, त्याला काय करणार ? प्रसंगास साजेसा मेकप कसा तरी केला झालें. झिगी आल्यावर आपणाशीं किती उत्साहानें बोलेल, थट्टा करील; आपण मात्र नुसते हं हं करणार. म्हणजे सगळ्या रोमान्सचें दहीं होणार इत्यादि विचार माझ्या मनांत येऊं लागले. याकरितां आत्याचें पत्र जणूं आलेंच नाहीं, असें घटकाभर समजून तसें होऊं न देण्याचा मी प्रयत्न करूं लागलों. सरासरी नऊदहा वाजतां ती आली. परंतु ग्लोरिया स्वान्सनचा मूर्तिमंत उल्हास सोडून ती आतां नॉर्मा शियरर झाली होती. संभाषण देखील कामापुरतें करावयाचें, असा तिचा निश्चय दिसला. ती म्हणाली " देतां ना. पैसे परवांच्या तिकिटांचे ?"

" हो हो, हे घ्या ! " मीं पैसे दिले. तिनें ते पोलक्याच्या खिशांत ठेवले आणि रेल्वेंतील धोक्याच्या सांखळीला हात धरून ठेवावा त्याप्रमाणें आपली गळ्यांतील एकदाणी धरून ती उठली. " बरं आहे. येतें ! " इतकेंच म्हणून

दारापर्यंत गेलीही. फटफट्या मोटरीला सायलेन्सर बसवावा, त्याप्रमाणें मला अतिशय चमत्कारिक वाटूं लागलें. शेवटीं धीर करून मीं विचारलेंच,

" का हो ? आजारी बिजारी आहे कीं काय कुणी ? "

" अंऽहं ! "

" परवां मजकडून तर कांहीं चूक नाहीं ना झाली ! "

" छे छे. "

" मग कां असं ? "

" असं म्हणजे ? "

" म्हणजे-म्हणजे ? हा अगदीं टॉवर ऑफ सायलेन्स् ? "

" हं हं ! त्याचं कारण घरगुती आहे. "

मीं आतां एकदम प्रश्न केला. " कां. स्थळं पाहाताहेत वाटतं ? "

" कर्माचीं आलीं आहेत स्थळं ! माझ्यासारख्या धांदरट मुलीला कोण विचारणार, कुत्रा ? "

" कोण म्हणेल असलं भलतंच ? " परंतु पुढें भाषण न करतां ती एकदम निघून गेली. एकूण रोमान्सचें दहीं व्हायचें तें झालेंच ! एकाच विषयाचे दोन पेपर असले, आणि एक वाईट गेला म्हणजे राहिलेल्या पेपरांत मार्क भरून काढूं अशी विद्यार्थ्याला मोठी उमेद असते. परंतु तोही तसाच गेला, म्हणजे त्याची जशी स्थिति होते. तशी माझी झाली. एखाद्याबद्दल मला कांकीं आपलेपणा कसा वाटूं लागतो. ही एक आश्चर्याची गोष्ट आहे. प्रस्तुत प्रकरणांत ते आश्चर्य घडून आलें. संध्याकाळीं सहज फिरावयास म्हणून निघालों, तो विचारांच्या तद्रींतून जेव्हां भानावर आलों तो नेमका ढोलकर आळींत ! आणि एका मिनिटांत उल्हास-करांच्या वाड्यांत जाऊन पोहोचलों देखील. दरवाजांतच मुलींचा भोंडला चाललेला होता. एक पांचसहा वर्षांची मुलगी " एलमा पलमा गणेशदेवा"चा पाठ सांगत होती आणि बाकीच्या तिच्यामागून म्हणत होत्या. पाठ सांगणारीचा तोंडवळा थेट तिच्या ताईसारखा म्हणजे झिगीसारखा दिसला; म्हणून मीं तिला म्हणालों, " काय बाळ, ताई कुठं आहे तुझी ? "

" थांबा हो ! आम्हाला खिलाफत ओळखूं द्या ! "

" खिलापत ? "

" खि ऽ ऽ रा ऽ ऽ प ऽ ऽ त ! " दुसऱ्या एका विदुषीनें खुलासा केला आणि जेव्हां त्यांचें तें खिरापतप्रकरण संपलें, चट्टामट्टा झाला, तेव्हां माझ्या प्रश्नाचें झिगीमायनरनें उत्तर दिलें, " ताई वल आहे ःयालल्लींत ! "

" काय करीत आहे ? "

" ललतेय ! "

" ललतेय् ? कां ग ? "

" अं–अं–किनी, आई तिला म्हणाली–अं–अं–नाटकांत काम कलूं नको मणून ! "

" नाटक ? "

" हो. ताईचं मोठ्ठं नाटक होनाल आहे तिच्या शाळेंत ! आमी जानाल आहों ! "

" मग ताईला कां काम करूं देत नाहींत ? "

" आई मणाली, ती छांदिष्ट मुलगी आहे म्हणून ! छांदिष्ट म्हणजे काय हो ? "

" छानदार ! पण असं केलं काय तुझ्या ताईनं ? "

" अं–अं–तिनी हलवलन कांहीं तली. म्हणून माल दिला ताईला त्या दिवशीं."

" माल कशाचा ? "

" आहो, आमची किनी, धुणं वाळत घालायची काठी आहे ना ? तिनी आई माल देते चांगला ! "

" बाप रे ! बरं, मग ? "

" मग ताईनं सांगितलं बाबांना ! बाबा खूप बोलले हो आईला आणि ताईनं पण आईशीं गडी फू केली आहे."

" चांऽऽगऽऽलं ! "

मी मुकाट्यानें माघारीं फिरलों.

घरीं आलों, तेव्हां जिवा दिवे लावीत होता. मीं कपडे काढून .इकडे. तिकडे भिरकावले आणि तसाच सतरंजीवर पसरलों. छातीवर एक पांढरा केस दिसला तो उपटून काढला आणि जिवाला म्हणालों,

" तीन दिवसांत म्हातारा झालों, जिवा ! "

" असं काय बोलावं, साहेब ! "

" काय करावं जिवा ? एवढाल्या मुलींना काठीनं बदडणाऱ्या या आया ! छान् ! "

" आत्यांचीच जात, साहेब ! "

" बाप रे ! जिवा, काढलीस का तिची आठवण ! तिच्याकडून दुसरा बॉंबगोळा केव्हां येतोय् या भीतीमुळंच तर केसांची अशी दशा झाली आहे."

" उद्यांचं नाटक पहायचं तर सुख मिळालं ? "

" छट्, आपण नाहीं पाहणार नाटकबिटक."

" मुलीच करणार आहेत तें, साहेब ! "

" असूं देत. आपलं नाहीं मन लागत नाटक पाहायला."

" असं कां साहेब ? " जिवानें घाबरून विचारलें.

" अरे, तिच्यावांचून नाटक कसचं रंगणार ? सगळीच ट्रॅजिडी–"

" ट्रॅजिटी ती काय, साहेब ? "

जिवाच्या पिरपिरीनें संतापून मीं उत्तर दिलें, " झिंगीसारख्या वयांत आलेल्या मुलीला काठीनं बदडणं, समजलास. माझं तिकिट घेऊन तूंच जा झालं नाटक पाहायला. आपण तर अगदीं " ल्हास " झालों बुवा ! "

खरोखरीच दुसऱ्या दिवशीं संध्याकाळीं मी नाटकाला गेलों नाहीं. जिवा गेला. तिची मूर्ति डोळ्यांपुढें उभी करून उसासे टाकीत रात्रीं एक वाजेपर्यंत तळमळलों. आरशांत डोकें निरखून पाहिलें, तों आणखी तीन पांढरे केस सांपडले. आतां

अधिक जाग्रण करून उपयोगी नाहीं, हें समजलों; माझा नेहमींचा आस्तिक काळभैरव—कफल्लक—कफल्लक इत्यादि मंत्र पुटपुटलों आणि झोंपीं गेलों.

दुसऱ्या दिवशीं मला जरा हुषारी वाटूं लागली. चहा वगैरे झाल्यावर एकदम बाहेर पडावेंसें वाटलें. त्या दिवशीं सारखीं डोक्यांत चक्रें फिरूं लागल्यामुळें जेव्हां भानावर आलों, तेव्हां नेमका डोलकर आळींत. प्रेमविद्ध माणसाप्रमाणें एक विचार सहज मनांत आला. तिलाही आपल्याप्रमाणेंच नाटक गोड न लागतां तीही अंथरुणावर तळमळत राहिली असेल कीं काय, याची शहानिशा करून घेण्याची आतुरता उत्पन्न झाली. म्हणून मीं उल्हासकरांच्या वाड्यांत शिरलों. पाहतों तों समोरच ती एका पायरीवर डोळे चोळीत बसलेली ! जवळच पाण्यानें भरलेली तपेली पाहतांच ती आतांच उठलेली असावी, असा अंदाज केला. त्यानें हुरूप वाढून मीं एकदम विचारलें,

" काय हो, कसं काय आहे ? "

" हो, पुरे झालं ! खूप आलांत नाटकाला काल ! "

" उपयोग काय येऊन ? "

" मग या पोकळ चौकशा कशाला उगीच ? "

" तुम्हीं गेलां होतांत वाटतं ? "

" न जाऊन काय करूं ? कामच होतं माझं मुळीं ! " ती टोलाटोलीच्या आवेशानें म्हणाली. मी हताश झालों. तोंडदेखलें कांहीं तरी म्हणावयाचें म्हणून विचारलें,

" प–प–पण तुम्हीं काम करणार नव्हतांत असं ऐकलं ? "

" मला काय ठाऊक आयत्या वेळीं आपण असा प्रकाश पाडाल म्हणून ? "

" ए: फार तडकफडक बोलतां बुवा ! "

" मग थापाड्याशीं दुसरं काय बोलणार ? नाटकाला येईन म्हणून म्हणालांत आणि आलां नाहीं न् कांहीं नाहीं. "

यापुढें ती खोंचदार हास्य तोंडावर खेळवीत म्हणाली,

"बाकी जिवाबरोबर तो मोर पाठवला नसतात, तर बाजाच होता सगळा !"

तिनें ही ओव्हर बाउंडरीच मारली ? मी दिङ्मूढ झालों. मोर कसला, आणि तो मीं केव्हां पाठविला ? सगळाच चमत्कार ! खरोखर, स्त्रीस्वभाव म्हणजे पाऱ्याचा थेंब; हातीं कसा तो लागायचा नाहीं ! आश्चर्याच्या भरांत मीं विचारलें, "अँ: ? मीं कधीं मोर पाठवला बुवा ?"

"आतां पुरे कीं हें सौजन्य ! माझ्याकरितां एवढा मोर नवीन करायची कशाला खटपट केलीत, टाटासाहेब ? हौसेसाठीं इतका खर्च ?"

"उगीच कशाला अशा तंगड्या ओढतां गरिबाच्या !"

"एहॅ, सोंग तर खूप आणलंय् ! पण मला सगळं समजलं आहे, बरं का ! मीं नाटकांत काम करावं, म्हणून आयत्या वेळीं नवीन मोर बनवून दिलात तुम्ही ! माझ्या धाकट्या बहिणीकडून ती बातमी कळल्याबरोबर मुळींच राहवलं नाहीं तुमच्याच्यानं ! लगेच मोर करूनसवरून पार ! काल संध्याकाळीं सात वाजतां जिवा मोर घेऊन आला आणि तुम्हीं तो मुद्दाम तयार करून पाठवला, असं सांगूं लागला, तेव्हां मला प्रथम तें खरंसुद्धा वाटेना ! माझा तस्साच मोर हरवला होता. तरी तुम्हीं माझ्यासाठीं नवा मोर करून पाठवाल अशी माझी कल्पनाच नव्हती. पण तो जेव्हां ऐकेना, तेव्हां घेतला झालं. मला एक प्रकारचा विजयानंद वाटायला लागला. कारण, या एवढ्याशा मोरासाठीं आई मला इतकं घालून पाडून बोलली आणि आणि..." पुढें सांगायला ती लाजत आहे असें पाहून मीच म्हणालों, "जाऊं द्या. होगया सो होगया ! या जुन्या माणसांना सोनं म्हणजे जीव कीं प्राण असतं बुवा !"

"नाहीं. आईच्या रागवण्याला तसं कारण होतंही. दोनच वर्षांपूर्वी मी डोक्यांतला मोर एका देवळांत हरवून आलें. पण तेव्हां कांहींएक न बोलतां आईनं मला तसलाच एक नवा मोर करून दिला, आणि आतां तोही मीं हरवला !"

या हकीकतीनें मी जरी बिचकलों, तरी बिथरलों नाहीं; मला तिनें दिलेलें सर्व क्रेडिट मी मोठ्या नाखुषीनें पदरांत घेतलें. आणखी थोड्या गप्पा मारल्या आणि " मधुबनमे शाम " गुणगुणत परत निघालों. येतां येतां एक विलक्षण शंका मला आली. जिवानें एखादा नकली मोर करून तर उल्हासकरांच्या गळ्यांत बांधला नसेल ना, अशी भीति वाटूं लागली. कारण एरवीं एवढा पैसा त्याच्या-जवळ कुठून आला ? तरी पण एकंदरींत उल्हसित मनानेंच घरीं पोंचलों; आणि एकदम जिवाला हाक मारली, " काय पठ्ठे बापूराव ? " पठ्ठे बापूरावांनीं मात्र चेहऱ्यावर एक सुरकुतीही पडूं न देतां एक पत्र खिशांतून काढून माझ्या हातांत ठेवलें. आत्याचाच तो बॅांब गोळा ! मी त्रासून जिवाला म्हणालों,

" वागावं कसं त्याची तुला मुळींच अक्कल नाहीं, जिवा ! "

" म्हणजे, साहेब ? "

" सांगतों, ऐक. आर्यनच्या पडद्यावर एक छानदार चित्रपट चालू आहे. एखादा दगाबाज चोर लेडीच्या मुसक्या बांधण्याच्या खटपटींत आहे. आषकानं एका इमारतीच्या तिसऱ्या मजल्यावरून तें पाहिलं आणि लागलीच कोट-टोपी फेकून तो नळावरून उतरूं लागला. इतक्यांत जर फिल्म तुटली, तर चवली-पावलींतले रसिक काय करतील, जिवा ?"

" ऑपरेटरच्या खिडकीकडे त्यांनी जोडा फेकलेला मी कित्येक वेळां पाहिला आहे, साहेब ! "

आणि सांगायची मजा अशी कीं, तूं आतां त्याच संभावनेला पात्र आहेस ! "

" कां, साहेब ? "

" माझी ' वन् अवर वुइथ यू ! फीचरिंग ग्लोरिया स्वान्सन ' ही फिल्म एकदम तोडलीस म्हणून ! "

एवढ्या शरसंधानानेंही जिवाच्या चेहऱ्यावर सुरकुती पडली नाहीं. 'कोडगा आहे. झालं !' असें पुटपुटून मीं पत्र फोडलें आणि वाचूं लागलों. पण वाचतां

वाचतां आनंदानें बेहोष होऊन मी म्हटलें, " फिल्म अगदीं योग्य ठिकाणीं तोडलीस, जिवा ! पुढील चित्रपटांतील देखावे आतांच पाहावे म्हणून तोडलीस ! सिम्प्ली वंडरफुल ! पुढचा चित्रपट कोणता, माहित आहे, नाहीं ? अरे, 'ऑल क्वाएट ऑन् दि वेस्टर्न फ्रन्ट !' "

" मला आनंद झाला, साहेब ! " पुराव्याच्या अभावीं सोडून दिलेल्या आरोपीला एखादा टेसबाज जज्ज म्हणतो, त्या ऐटीनें जिवा म्हणाला.

" पण जिवा, ही भानगड काय आहे, बाबा ? आत्याला तिचा मोर कुणीं परत पाठवला ? आणि मिस् उल्हासकरांनाही त्यांचा मोर कुठून नेऊन दिलास ?"

" ख-ख-खैबरखिंडींतून आपल्याला सहीसलामत बाहेर काढण्यासाठीं मी तें केलं, साहेब ! "

" ऑ ? जिवा ! म्हणतोस तरी काय ? पाहूं तुझा दंड ! "

" दंड कशाला, साहेब ? "

" एखादं अद्भुत यंत्रबिंत्र बांधलं आहेस कीं काय तें पाहतों ! "

" नाहीं, साहेब ! "

" मग एखादा जादूचा दिवा ? "

" कशाला साहेब ?" असें म्हणून जिवानें खिशांतून नरोत्तमशेटचें पांच रुपयांचें बिल काढून हातांवर ठेवलें. तीन रुपयांचा एक गिलिटाचा मोर आणि एक सोन्याचा मोर पॉलिश करण्याची मजुरी दोन रुपये, असा त्या आंकड्याचा तपशील होता. मीं घाबरून विचारलें, " शाबास तुझी ! उल्हासकरांना खोटा मोर नेऊन दिलास बेधडक ? "

" नाहीं साहेब ! त्यांचा खरा मोर त्यांना परत दिला."

" म्हणजे ? "

" त्या पहिल्यांदा आपल्याकडे येऊन गेल्या, तेव्हां त्यांचा मोर इथं सतरंजीवर पडलेला सांपडला, साहेब. तो मोर आत्यांच्या राहिलेल्या मोरासारखा हुबेहुब होता. मिस् उल्हासकरांच्या हकीकतीवरून संतरंजीवरचा मोर कोणाचा हें मीं ओळखलं

आणि तो पॉलिश करून घेऊन नाटकाच्या दिवशीं संध्याकाळीं त्यांना परत नेऊन दिला. निरोप मात्र जरा खुलवून . ..."

" घुटमळूं नकोस, जिवा ! मला समजलं आतां सारं ! पण ही एक नवीनच भानगड करून बसलास ! "

" कोणती, साहेब ? "

" या गिलिटाच्या मोराची ! आत्याला तें समजलं म्हणजे कहरच ! "

" नाहीं, साहेब ! आत्यांना मुळीं तो जोगेश्वरीच्या देवळांत सांपडलेला होता ! "

" अरेच्चा, ऑं ! म्हणजे तोही उल्हासकरांचा कीं काय ? "

" असं दिसतं, साहेब ! "

" पण तुला काय माहिती या पंचाइती ? "

" केसांत खोंवायच्या मोरांचा आणि आत्यांचा काय संबंध हें मला कोडंच पडलं होतं, साहेब ! पण उल्हासकरांच्या इथं चवकशी केल्यावर तें उलगडलं ! "

" मग आतां मम्मुआत्या काय म्हणेल ?"

" त्यांना जरा आश्चर्य वाटेल; बाकी कांहीं नाहीं, साहेब; बोलूनचालून सांपडलेला माल ! "

" हा काढलास खरा मानसिक सिद्धांत ! "

" पण त्यासाठीं पांच रुपयांचा भूर्दंड पडला, साहेब ! "

" एः ! जिवा, घटकाभर असं समजूं: कन्याशाळेच्या नाटकाचीं दोन तिकिटं घेतलीं. हं, जा आतां भेळ खायला ! लाजूं नकोस असा; मला सगळं ठाऊक आहे–पळ......सुट्टी तुला आज."

---

# रामराव आणि भालेराव



त्या दिवशीं बारमध्यें पाऊल टाकतांच मीं नेहमींप्रमाणें "टाटासाहेब" अशी मोठ्यानें ललकारी दिली; पण तिला "झिंदाबाद" असा पेटनचा ठराविक निनाद आला नाहीं.उलट, जेथें पेटन बसायचा, तेथें तरुण वकिलांची एकच खेंचाखेंच चाललेली दिसली. मीही अर्थात् त्यांच्यापैकींच एक असल्यामुळें त्या गर्दींत घुसलों. तरुणांनीं एवढया खेंचाखेंचीनें पाहण्यासारखें तेथें दुसरें काय आढळणार? माझ्या अंदाजाप्रमाणें तो एका तरुणीचा फोटो होता. प्रत्येकजण तो फोटो दोनदोनदा हाताळी, डोळे त्याच्यावर रोखून माना वेडयावांकडया करी, आणि "वा: ? आलम आरा" असें स्वतःशीं पुटपुटे. बऱ्याच वेळानें तो पेटनच्या हातांत परत आला आणि जेव्हां त्यानें तो आपल्या टेबलाच्या ड्रॉवरांत ढकलला, तेव्हां ते तहानेले डोळे इकडे तिकडे पांगले. तरीही एकाला " अजुनी जीव झाला नाहीं तृप्त दर्शनानें" अशी कव्युक्ति मोठ्यानें गुणगुणल्याशिवाय राहवलें नाहीं. लहानपणची एकाएकीं आठवण होऊन मीं पेटनला म्हटलें, "मला वाटलं, पेटया, पर्वतीवरून विंचूबिंचू पकडून आणला असशील ! पण पाहतों तों हूरी—अँ —अँ हूरी ! म्हणजे काय, पाडाची कैरी !"

"शट् अप्, टाटया ! नेहमीं कसल्या या तुझ्या अचकट विचकट गप्पा ?"

"ओ हो ! काल मालवीयांच्या व्याख्यानाला गेला होतास वाटतं ?"

"छे !"

"मग डोक्यावरून हें वारं केव्हां गेलं ?"

" अरे शंखा, ही माझी चुलत बहीण शांता; लग्नाची आहे म्हणून काकूनं फोटो पाठवलान् माझ्याकडे, तो दाखवीत होतों चार होतकरूंना ! "

" आय् सी ! " मोठ्या शिष्टपणानें मी म्हणालों. पण निलाजऱ्याप्रमाणें तो फोटो पाहायला मागितलाच पुन्हा ! डोळे भरून तो पाहिला; तरी समाधान वाटलें नाहींच. कारण स्त्रीसौंदर्याची खुमारी नुसत्या दर्शनानें लाभत नाहीं. आपली रसिकता मोकळेपणानें प्रकट करावयास कोणी तरी जवळ असावें लागतें. पण चालू बाबतींत शिष्टाचारामुळें तें जमणें अशक्य होतें. सीनियर वकिलांपैकीं एकट्या ओंकारांनींच तेवढा तो पाहावयास मागितला. पण त्यावर नजर टाकली न टाकली असें करून लगेच तो परत दिला. खरें म्हटलें म्हणजे, ओंकारांची मला कींव आली ! त्यांनाही शिष्टाचारामुळें स्वतःची कलाभिज्ञता पोटांतच दाबून ठेवावी लागली !

दुसऱ्या दिवशीं काम नसल्यामुळें मी कोर्टांत गेलों नाहीं.संध्याकाळीं वर्तमानपत्र वाचीत सहज खिडकीजवळ पसरलों होतों. अशा वेळीं एकदम " टाटा, आहेस का जागा ? " म्हणून मागील बाजूनें कोणी पुकारा केला. या वेळीं असा तऱ्हेवाईक प्रश्न करणारें आहे तरी कोण, म्हणून मागें वळून पाहिलें, तों पेटन ! बिचाऱ्याचा चेहरा, मुसळधार पावसानें बाजरीचें ताट जसें खालीं पडावें त्याप्रमाणें " पडलेला " पाहून मी दचकलों, आणि विचारलें,

" कां रे पेटन ? भंभाणियासाहेब खुशाल आहे ना ? "

या सबजज्जांवर पेटनची विशेष भक्ति होती; दर अमावास्येस " भंभाणिया-साहेब घणूं जीवो !" अशा मजकुराची एक चिठ्ठी चेंबरमध्यें पाठविण्याचा त्याचा नियम असे.

" भंभाणिया खणखणीत आहेत रे टाटा ! पण—पण तो फोटो ! " पेटन चांचरत बोलला.

" फोटो ? अन् तो मला काय ठाऊक ? मीं कांहीं इतका हा नाहीं मुलींचे फोटो पळवायला !"

" तसं नव्हे रे; तो फोटो अचानकपणं नाहींसा झाला ! "

" ऍ ? कुठून ? " मीं एकदम उठून बसलों.

" बाररूममधल्या माझ्या टेबलाच्या खणांतून ! "

" ओः ! अस्सं; टेबलांना बर्गलर अलार्म लावण्याचा अर्ज केला पाहिजे डी. सी. ला ! "

" बर्गलर अलार्म मरूं दे रे ! फोटोला पाय कसे फुटले, हा महत्त्वाचा प्रश्न आहे आधीं ! "

" मला वाटतं, बेडकाला पाय व शेपटी कधीं फुटतात हें पांचवीच्या पुस्तकांत सचित्र–"

" च्च्, टाटया बी सीरियस् ! आमची काकू म्हणजे अशी तशी बाब नाहीं. तिला आमच्या गांवांत सगळे लोक " टारझन " म्हणतात, यावरून काय तें समज. तिच्या लग्नाच्या मुलीचा हा फोटो आणि माझ्या हातून तो गहाळ झालेला. तुफानाचीं पूर्वचिन्हं नव्हेत का हीं, टाटया ? "

" खरंच; मग पोलिसांत कळवूं का ? "

" वाः महाराज ! आमच्या घराण्याला कांहीं अब्रू आहे बाबा ! आणि काकूला तर त्याचा जाज्वल्य अभिमान आहे ! "

" अस्सं ऽऽऽ ! आत्तां जराजरा दिशा फांकूं लागल्या ! हां ! उपवर मुलीचा फोटो ! टेबलांतून नाहींसा झालेला. ठेवण्याची जागा बाहेरच्या इसमास माहित असणें कठीण. प्रकरण नाजुक. घराण्याच्या अब्रूचा प्रश्न. सबब पोलिसांत देतां येत नाहीं ! ठीक; येथपर्यंत मुद्दे जमले ! तेव्हां फोटोचा पत्ता लावायचा कसा ? बेटया, मला तर खुला रस्ता दिसतोय्. "

मी विचार केलासें दाखवून म्हणालों,

" खासगी डिटेक्टिव्ह रामराव व्हायला पाहिजे मला ? "

" बरोबर बोल्लास. परंतु...अं...मला वाटतं हें काम जिवाला सांगावं ! "

माझ्या हुशारीचं बजेट कोणी असं आंतबट्टयाचं काढलं म्हणजे माझ्या अंगाचा तिळपापड होतो. मी वस्‌कन ओरडलों, "जिवा ! जिवाला काय कळतंय् याच्यांत!

उगीच आपली इकडे तिकडे जरा हातचलाखी करतो; म्हणून डिटेक्टिव्ह झाला कीं काय ? छट् ! पेटन, असलीं कामं फार जोखमीचीं बरं ! कोणचा प्रसंग प्राणावर बेतेल, कोण सुरा खुपशील, कोण बडगा घालील, कोण पिस्तुल मारील, कोण विष पाजील, याचा कां ऽ ऽ ऽ हीं नेम नसतो. जिवा या कामांत अजून बच्चा आहे, पेटन ! ”

“ बरं बुवा, तूं हो रामराव ! पण भालेराव हवा ना कुणी तरी ? ”

ही त्याची कल्पना मात्र मला एकदम पटल्यामुळें मीं जिवाला हांक मारून सर्व हकीकत समजावून सांगितली, आणि म्हणालों, “समजलास, जिवा ? तुला आतां भालेराव व्हायला पाहिजे ! ”

“ होय, साहेब; टायगर कुत्रा पाहूं का एखादा ? ”

“ म्हणजे ! हुंग्या डिटेक्टिव्ह ! छे छे, जिवा, आतां तिसऱ्याचं कामच नाहीं इथं ! ”

“ रहस्य जरा गहन आहे, साहेब ! ”

“ तर ! अट्टल गुन्हेगारांशीं गांठ आहे, जिवा ! ” मीं पेटनला विचारलें, “ वकिलांपैकीं सगळ्यांना विचारलंस का एकदा ? ”

“ हूं ! ज्यूनियरपैकीं बहुतेक बिचारे गर्भगळित झालेत या बातमीनं ! ओंकारांनीं त्यांच्या एका मुलीचा फोटोही असाच सर्वांना दाखवण्याचा काल सपाटा लावला. पण जेव्हां का माझ्या फोटोची हकीकत कळली स्वारीला, तेव्हां लागलीच त्यांनीं आपला फोटो उपरण्यांत गुंडाळला आणि तडक घरीं घेऊन गेले. आणखी भयंकर गोष्टी सांगूं लागले ते ! ”

“ भयंकर, साहेब ? ” जिवा मध्येंच उद्गारला.

“ तर काय ! ते म्हणाले, कीं मुलींना पळवून नेणारी एक अट्टल बदमाषांची टोळी इथं आली असावी. फोटो लांबवण्याची कारवाई त्यांचीच. अगोदर फोटो नी मग......”

" घ्या ! काय नीचपणा हा ! "

इतका संवाद झाल्यावर पेटन निघून गेला.

दुसऱ्या दिवशीं जिवाला हँडबॅग घेण्यासाठीं म्हणून बरोबर घेऊन मी कोर्टांत गेलों. पेटनच्या टेबलाची सूक्ष्मदर्शकानें तपासणी केली. ओरखडे, बोटांचे ठसे, डाग, आणि विडीची राख वगैरे बारीक सारीक गोष्टींचा तर्जुमा जमविला. कोर्टांत इकडे तिकडे हिंडून वहिमी इसमावर पाळत ठेवण्यास जिवाला सांगितलें. फोटो पळविणारी टोळी जरी बाहेरची असली तरी वकिलांपैकीं कोणी तरी तिचा साथीदार असलाच पाहिजे, अशा ठाम विचारानें शंकास्पद इसमांच्या उलटतपासणीच्या उद्योगास मी लागलों.

" ऍ हॅ, मिस्टर लुकतुके आज हवा मोठी झक्क आहे बुवा ! "

" वाहवा, टाटासाहेब, हवेवर आलांत आज ? "

" तसं नाहीं हो ! आपलं उगीच ! पण...पण हें पाहा !...रागास येऊं नका हो ! "

" च्या ! आज ही काय प्रस्तावना बुवा ? चहाबिहा काढणार आहांत कीं काय ? "

प्रश्नोत्तरें चालू असतां लुकतुक्यांचा चेहरा आणि सूक्ष्म हालचाली यांवर माझी तीक्ष्ण नजर होती. त्यामुळें इथेंच कांहीं तरी पाणी मुरतें आहे अशी शंका येऊं लागली.

" चहाचा लग्गा नाहीं हो ! आपलं हें तुम्हाला विचारणार होतों. काय बरं ? हों; पेटनच्या सिस्टरचा फोटो पाहिला होतात, नाहीं तुम्हीं ? "

" फार अपीलिंग होता बुवा ! "

" परवां तुम्हीं घरीं केव्हां गेलांत ? "

" झाला जरा उशीर ! कां बरं ? "

" नाहीं; बाररूममध्यें दुसरं कोणी होतं का त्या वेळीं ? "

" तें नाहीं बुवा आठवत एवढं ! "

या उडवाउडवीव रून मी काय तें समजलों, आणि डायरेक्ट मेथडनें प्रयत्न करण्याचा निश्चय केला. त्याच्या कोटाची कॉलर गच्च पकडून मीं त्याला एका बाजूला ओढलें; आणि दांत गच्च मिटून शक्य तितक्या खोंचदारपणानें विचारिलें,

" कालचा तो फोटो काय केलात तेवढं सांगा पाहूं, लुकतुके ! "

" अरे हट् ! कांहीं तरी मूर्खासारखं विचारतोय् ! " असें चिडून म्हणत लुकतुक्यानें एक हिसडा मारला आणि स्वारी निसटली. चोरीचें " मोटिव्ह " या ठिकाणीं जमत असल्यामुळें साठ टक्के गुन्हेगार हाच, अशी माझी खात्री झाली आणि पुढचा पुरावा कसा गोळा करतां येईल या विचारास मी लागलों.

जरा वेळानें असेच एक तरुण वकील कोटाच्या आंतील खिसा वारंवार चाचपीत जातांना आढळले. ताबडतोब मीं त्याला गांठलेंच.

" शुक् शुक्...मिस्टर कारभारी ! " गृहस्थ पुन्हा आपल्या खिशांत हात घालून उभा राहिला. तिथें एक फोटो तरी, नाहीं तर भरलेलें रिव्हाल्वर असलें पाहिजे असा तर्क बांधून मीं त्याला सावधगिरीनें विचारलें,

" हॅः हॅः, आज गडबड दिसतेय् विशेष ? "

" नाहीं बुवा, भंभाणियाकडे एवढा पिटिशन द्यायला चाललों होतों झालं ! "

" होय का ? मग थांबा जरा; कारण ते आतांच चेंबरमध्यें गेलेत ! " कावऱ्याबावऱ्या मुद्रेनें चहूंकडे पाहत तो थांबला. मी धीरानें प्रश्न केला,

" काय हो, कालचा चमत्कार कळलाच असेल तुम्हांला ! "

" हॅा हॅा, कोनकरांच्या वाड्याखालीं उस्वास लागला, तोच ना ? वंडरफुल हं अगदीं ! "

" अरे गुलामा, चांगलाच ठक दिसतोस ! " असें मीं मनांत म्हणालों. पण उघड विचारलें,

" तो नव्हे; आपल्या पेटनच्या फोटोबद्दल म्हणतोंय् मी ? "

" हं हं, तो होय? पेटन म्हणतो तो गमावला म्हणून! खरं का हें, टाटासाहेब!"

" हो तर! अगदीं मिस्टीरियस्ली!"

" ओ! असं का?" पुन्हां त्या महाठकानें आंतल्या खिशांत हात घातला. आतां प्रश्न विचारून त्याला सावध करण्यांत हंशील नाहीं. हें मीं ओळखलें. काय करावयाचें तें अचानक केल्याशिवाय जमणार नाहीं, हें जाणून मीं इकडे तिकडे पाहिलें आणि निमिषार्धांत कारभाऱ्याच्या कोटांत हात खुपसला. परंतु तो बाहेर काढण्यापूर्वींच त्यानें गच्च पकडला आणि आरोळ्या ठोकण्यास सुरवात केली. लागलीच आमच्या भोंवतीं माणसांचा गराडा पडला. माझा हात धरून विजयानंदानें कारभारी पेटनला म्हणाले,

" पेटनसाहेब, पाहिलीत का ही अट्टल खिसेकापूची अवलाद? माझं पैशाचं पाकीट हिसकायला निघाला हा! मग आतां सांगा, फोटो कसा गेला तें?"

त्यानें असें म्हणतांक्षणींच एकदम बटाट्यांचा ढीग अंगावर कोसळावा त्याप्रमाणें माझ्या शरीरावर चहूंकडून बुक्यांचा वर्षाव झाला. शेवटीं खुद्द पेटन मध्यें पडला तेव्हां माझी सुटका झाली. तो मला हसून म्हणतो,

" टाटा, अरे कारभाऱ्यानं एक सापळा टाकला होता, त्यांत तूंच नेमका सांपडलास. दोन डिटेक्टिव्हांची टक्कर झाली म्हणायची."

मी खजील झालों आहें असें न दाखवितां त्याला गंभीरपणानें म्हणालों,

"अरेरे, पेटन! हें तूं अगदीं अन्सायन्टिफिक केलंस बुवा! एकाच कामावर दोन डिटेक्टिव्ह नेमणं म्हणजे एका रूळावरून अप् आणि डाउन गाड्या सोडण्यासारखं होतं, समजलास?"

वरून अशी ऐट आणली, तरी मनांतून मीं ओशाळलों होतोंच. कारभाऱ्याच्या खिशांत आपण असा एकदम हात घालावयास नको होता, असें माझें मलाच वाटूं लागलें. कारण त्यामुळें चारचौघांत माझ्या खिसेकापूपणाची उगीचच शोभा झाली आणि वर...! वर काय, तें पाठींतील बुक्के ओरडून

सांगतच होते. आतां खऱ्या गुन्हेगाराचा तलास लावण्यासाठीं कोणता नवा डाव टाकावा यावर विचार करण्यासाठीं मीं चहाच्या दुकानाकडे मोर्चा वळविला.

परंतु तिकडे जातांना माझें मोटरींच्या तबेल्याकडे लक्ष गेलें. पाहतों तों राजश्री लुकतुके एका मुसलमान ड्रायव्हरजवळ हळू हळू कांहीं तरी खलबत करीत आहे असें दिसलें. त्याबरोबर मी लपत छपत तबेल्याच्या पिछाडीस जाऊन त्यांचें भाषण ऐकूं लागलों. इतक्या लांबून त्यांचे सर्व शब्द मला स्पष्ट ऐकूं येणें शक्य नव्हतें. पण " पेटन ", " फोटो ", " अल्लाबक्ष ", " खुदाबक्ष ", असे कांहीं तुटक शब्द माझ्या कानावर आले. लुकतुक्यांच्या हरामखोरीविषयीं आतां संशयच राहिला नाहीं. संभाषण संपून तो जेव्हां निघून गेला, तेव्हां लागलीच मीं त्या ड्रायव्हरला गांठलें. मुलाखतबाजाच्या ऐटीनें मीं सुरवात केली, " क्यों, खुदाबक्ष, कौन है ? "

" हम है, साब ! "

" और अल्लाबक्ष ? "

" हमारा भाई ! "

" किसका शोफर है तुम ? "

" लाड साब का ! "

" किधरसे आया ? "

" अभोटाबाद ! "

" फोटो बिटो कुच देखा दो-तीन दिनमें ? "

" हां जी ! " चोर सांपडला, मी मनांत म्हणालों आणि त्याला पुढें विचारलें,

" ऐसा ? कोनसा ? "

" हमारे औरतका. " या उत्तरानें मी जरा चपापलों, आणि त्याला खोंचून म्हणालों,

" तुमारी औरत ? कहांसे लाया ये औरत ! बाररूमसे ? "

" किधरसेभी लाया, तो तुमकू क्या ? "

" ये औरत कहांसे पैदा किया इसका जबाब सीदा करो. नहीं तो..."

खुदाबक्षानें डोळे लाल केले, बाह्या वर सारल्या, मिशांना पीळ दिला आणि कंबरेचा चाकू काढून फुसकारणाऱ्या बोक्याप्रमाणें तो मान हलवून म्हणाला,

" देखो उकील ! तेरी जान की है कुछ दख्खल ? है, तो भागो पहिले यहांसे ! "

रामरावची कामगिरी मीं पत्करली होती खरी, पण अशा प्रसंगीं रामरावनें रिव्हाल्व्हर काढला असता; तो मात्र माझ्याजवळ नसल्यामुळें खुदाबक्षाच्या सूचनेप्रमाणें " भाग जाणेंच " भाग होतें. शिवाय तिकडून आमचा भालेराव ऊर्फ जिवा येतांना दिसला. त्याच्यादेखत माझी मानगुट खुदाबक्षाच्या बेचकींत न जाऊं देणें इष्ट होतें. त्यामुळें जणूं काय कांहीं झालेंच नाहीं अशा झोकानें मी मागें सरलों आणि जिवाला गांठून म्हणालों, " जिवा, गुन्हेगार हाच बरं का ! त्या टोळीचा गायफॉक्स ! त्याला नजरेआड होऊं देऊं नको. तोंवर मी लाडांना सांगूनच त्याचा बंदोबस्त करतों."

कोर्टांत जाऊन लाडांच्याजवळ जेव्हां खुदाबक्षाला गिरफदार करण्याची गोष्ट काढली, तेव्हां तोंडाला उपरणें लावून ते नुसते हसले. मीं त्यांना कळकळीनें सुचविलें, " रावबहादुर, अशी हसण्यावारी गोष्ट नका नेऊं ! तिकडे गुन्हेगार फरारी होण्याच्या तयारींत आहे." लाडांनीं आपलें हसणें थांबविलें व तेही गंभीर आवाजानं म्हणाले, " थांबा, टाटासाहेब, मी करतों सारी व्यवस्था, अगदीं काळजी करूं नका ! " या वेळीं बाररूममधील इतर मंडळीही दबून दबून हसत होती. परंतु जातिवंत डिटेक्टिव्हानें लोकांच्या हंसण्याकडे लक्ष द्यावयाचें नसतें !

मी मुकाट्यानें एका इझिचेअरवर लवंडलों आणि सिगारेटच्या धुराच्या लोटांकडे शून्य नजरेनें पाहत बसलों. पलीकडे कांहीं मंडळी ओंकारांच्या मुलीचा फोटो पाहण्याच्या नादांत होती. मीही तो सहज पाहूं लागलों, तों माझ्याकडे चमत्कारिक

तऱ्हेनें पाहून सर्वांनीं तो फोटो दडवून ठेवला. " फोटोफोबिया " असें कांहीं तरी कुजबुजून ते खी खी करीत हसूं लागले. माझ्याकडे अर्थपूर्ण नजरेनें पाहून ओंकारही म्हणाले, " अरेरे, या अविवहित तरुणाची अवस्था दिवसेंदिवस वाईट होत चालली आहे ! " त्या फोटोलंपट चोरावर हा शेरा असावा, असें समजून मी हसलों. कांहीं वेळाने रा. ब. लाड परत आले आणि म्हणाले, " ह. दादासाहेब, चला माझ्याबरोबर; सगळा बंदोबस्त करूनच आलों आहें. " मी लगेच लाडांच्या मागून निघालों व कोर्टाच्या दरवाजापर्यंत येऊन पोंचलों. बाहेर उभ्या असलेल्या एका मोटारीकडे बोट दाखवून लाड म्हणाले, " हं या, बगा आंत पाहूं ! "

मोटरीच्या भरधांव पाठलागाची वेळ आली असें पाहून माझी रामराव गेट आणखी वाढली. " भालेरावाला बोलवा बरं ! " असा हुकूम देऊन मी मोटरींत चढूं लागलों, तोंच तिच्यावरील " येरवडा मेंटल हॉस्पिटल " ही पाटी माझ्या दृष्टीला पडली. त्याबरोबर पाय मागें घेतला, धोतर वर खोवलें आणि पुढचा मागचा विचार न करतां दोन खाकी सूटवाल्या रक्षकांना हुलकावणी देऊन गांवचा रस्ता धरला. तेवढ्यांत मजा पाहण्यास जमलेले कांहीं शिपाई उद्गारले. " काय करणार ? तरण्या पोरींच्या फाद्रन माथं फिरलासा ! काल जवान चांगला व्हता पगा. "

व्ही. टी. वर येणाऱ्या पंजाब मेलप्रमाणें धापा टाकीत मी घरीं पोंचलों. जिवा एक पोस्टाचें पार्सल फोडण्याच्या उद्योगांत होता. मी श्वास घेऊन म्हणालों,

" पहिल्या फेरींतच शत्रूनं आपल्याला हात दाखवला, जिवा ! "

" ॲंटीफ्ल्यू आणूं, साहेब ? "

" नाहीं-नको ! एवढं नाहीं लागलं. पण जिवा, धाग्याला धागा जुळत चालला ! "

" म्हणजे टोळीचा सूत्रधार सांपडला, साहेब ? "

" सांपडल्यापैकींच आहे; पण खरा बिलंदर हं ! माझा कांटा काढून टाकण्यासाठीं बेट्यानं केवढा अचाट व्यूह रचला पण ? " असें म्हणून मीं जिवाला ती मोटरची हकीकत जरा खुलवून सांगितली. अगदीं प्राणावर बेतलेल्या संकटांतून कसा शिताफीनें निसटलों हें त्याला पटवून दिलें. विचार करून त्यानें विचारलें,

" कोण हा बदमाष, साहेब ? "

" दुसरा कोण ? आपला रावबहादूर लाड ! "

" घुट्क्; प्व् च् च् ! " जिवानें आवंढा गिळला.

" म्हणजे, अंदाज हुकला म्हणतोस कीं काय जिवा ? कमालच आहे मग तुझ्या......... ! "

" तसं नाहीं, साहेब; पण...पण एवढं काम आहे, साहेब ! " असें म्हणून जिवानें एका लावण्यवतीचा फोटो माझ्या हातांत दिला. " ओः ! व्हाट ए ब्यूटी ! " हे उद्गार माझ्या अगदीं जिभेवर आले होते. पण शिष्टाचारामुळें ते दाबावे लागले. मीं नुसतेंच हसून विचारलें, "हे इतके फोटो हल्लीं कोण उधळतंय्, जिवा ? "

" माझ्या आतेबहिणीचा आहे, साहेब ! लग्नाची आहे ती; म्हणून......"

" समजलों, जिवा ! ज्युनिअर वकिलांच्या सिंहेला कन्या लागलेली दिसतय् हल्लीं ! "

जिवाचें काम मीं पत्करलें खरें. पण मनांत धाकधुक चालू होती, कोर्टांतल्या शिपायांचे कालचे उद्गार मीं विसरलों नव्हतों. आज परत उपवर मुलीचा फोटो दाखवायला घेऊन गेलों, तर पडत्या फळाची आज्ञा घेऊन लाडसाहेब माझी गठडी येरवड्यास नेऊन टाकण्यास चुकावयाचे नाहींत, अशी धास्ती वाटूं लागली; पण डिटेक्टिव्ह रामराव हा अगदीं निधड्या छातीचा प्राणि असला पाहिजे, या भावनेनें मीं जिवाच्या बहिणीचा फोटो दाखविण्याचा निर्धार केला.

कोर्टीत गेलों तों रा. लुकतुके ओंकाराच्या मुलीला 'च्यूज' करणार आहेत अशी बातमी ऐकली. पेटन बिचारा एकटाच लॉ-रिपोर्ट तोंडावर उपडा घेऊन लायब्ररींत पडला होता. मन बेचैन असलें म्हणजे आमच्या वकिलांची वेळ घालविण्याची ही ठराविक पद्धत असते. सुदैवानें आज लाडांची केस चालू असल्यामुळे बाररूममध्यें लाड नव्हते, त्यामुळें मनाचा हिय्या करून मीं विशेष बोभाटा न करतां, जिवाच्या बहिणीचा फोटो चारचौघांना दाखविला.

शेवटीं ओंकारांनीं तो पाहिला. तेव्हां हलक्या आवाजांत त्यांनीं इषारा दिला, " चांगली खबरदारी घ्या बरं, टाटासाहेब, फोटोची ! ही टोळी जोंपर्यंत इथं आहे, तोंपर्यंत भयंकर धाडसच आहे हं ! "

संध्याकाळीं कोर्ट बंद होण्याच्या सुमारास जिवा आला. त्याला एका बाजूला घेऊन झालेला वृत्तांत सांगितला. इतक्यांत पेटनही तेथें आला आणि जरा चिडून म्हणाला,

" टाटा, फुकट लेका तुझी रामरावी ऐट ! या गोष्टी नुसत्या बोलायच्या नसतात महाराज ! "

" अरे हो हो ! इतका जहाल होऊं नकोस एकदम ! कारस्थानाचा महत्त्वाचा दुवा हातीं लागलाच आहे आतां ! आणखी कांहीं आंगठ्यांचे ठसे मिळाले म्हणजे..."

" काल गालफडावरच उ असते चांगले ! हं: हं: ! " असें वर्मी बोलून विषादानें हसत पेटन झटकन् निघून गेला.

" पाहिलंस ना, जिवा ! कसा उच्छाद आहे तो ? "

" होय, साहेब ! "

" मग आतां, जिवा ? "

" आपल्या तपासाची दिशा चुकली असली तर..."

" टट् टट् टुट् टुट् ! जिवा, भालेरावानं रामरावाला शिकवायचं नसतं ! जा; मुकाट्यानं दप्तर आण न् टांगा-बोलाव ! "

आम्हीं टांग्यांतून निघालों, तों पेटन कोर्टाच्या बाहेर एका दगडाच्या बांधावर डोकें धरून चिंताक्रांत बसलेला दिसला. आम्हीं त्याला बोलावलें, तरी आला नाहीं; तसाच बसून राहिला. थोड्या वेळाने आम्हीं घरीं पोचलों आणि जिवा चहाच्या तयारीला लागला. त्याच्या अपरोक्ष त्याच्या गोंडस आतेबहिणीचा तो फोटो पुन्हा एकवार पाहण्याची मला तहान लागली, म्हणून मीं दप्तर सोडलें, आणि एकदम दचकलों. " जिवा, अरे जिवा ! दुसरा डल्ला ! " पेटलेला कांकडा हातांत घेऊन जिवा धावंत बाहेर आला. कांकडा फुंकून टाकून त्याने विचारलें,

" काय झालं, साहेब ? "

" अरे, तुझ्या आतेबहिणीचा फोटो ! "

" पाहायचा आहे आपल्याला ? "

" अरे मद्दा, पाहतोस काय ? त–तो फोटोही गेला ! '

" मी दप्तरांत बांधायला विसरलो असेन, साहेब ! टेबलांतच राहिला असेल तो ! "

" तरी काय ? तितकंच भयंकर ! अगदीं चोराच्या हातांत दिल्यासारखाच आहे ! "

दोन मिनिटांत आम्हीं पुन्हा कोर्टाकडे भरधांव निघालो ! वाटेत पेटन होता तसाच सचिंत बसलेला दिसला. त्याला आम्हीं आमच्या फोटोची हकीगत सांगतांच, आश्चर्यचकित होऊन तोही आमच्याबरोबर आला. आम्ही तिघे झपाझप बाररूमकडे वळलों. रूमचें दार अजून उघडेंच होतें, हें पाहून आमच्या जिवांत जीव आला. आम्हीं याबद्दल कांहीं तरी उद्गार काढणार इतक्यांत जिवानें गंभीर मुद्रेनें एकदा शुक् केलें आणि तोंडावर बोट ठेवलें. त्याचा अभिप्राय समजून आम्हीं अगदीं मांजरपावलांनीं बाररूमच्या दाराजवळ येऊन पोंचलों. उत्साहाच्या भरांत जिवाला मागें ढकलून मी आंत डोकावून पाहूं लागलों. त्याला राग आला कीं काय कोणास कळे ! पण तो मागच्या मागें निघून गेला.

"हट् ! कसचा भालेराव हा ? भागुबाई दुसता !" असें पुटपुटून मीं पुन्हा आंत डोकावलें. पाहतों तों बाररूममध्यें एकच व्यक्ति अगदीं चोरट्या हालचालींनीं माझ्या टेबलाच्या खणाला किल्ली चालवण्याच्या खटपटींत होती. तोंडावर आलेले आश्चर्योद्गार आम्हीं शिकस्तीनें दाबले. एकदांची किल्ली बरोबर लागून ड्रावर उघडला गेला. त्यांतून त्या व्यक्तीनें जिवाच्या आतेबहिणीचा फोटो बाहेर काढला. आणि झटकन उपरण्यांत गुंडाळला. लागलीच आम्हीं आंत घुसलों, आणि त्या व्यक्तीचा हात पकडला. चोरानें धडपड केली नाहीं. संथपणें मान वळवून आमच्याकडे पाहिलें.

आम्हीं चकित झालों आणि एकदम उद्गारलों, " काय ? ओंकार ? " कोरडें पडलेलें तोंड जिभेनें ओलें करीत ते म्हणाले, " होय टाटासाहेब, ओंकार वकील ! "

" एवढे सीनियर असून हीं नीच कृत्यं ? "

" काय करूं ? मुलीचा बाप पडलों ! " केविलवाणें तोंड उपरण्यानें झांकीत ते म्हणाले.

" म्हणजे ? "

" म्हणजे असं कीं, पेटनसाहेबांच्या सिस्टरचा फोटो आमच्या मालीच्याहून कितीतरी सरस. आणि तुम्हीं दाखवलेला तर साक्षांत ऊर्वशीच ! असे फोटो आपल्या लग्नाच्या उमेदवारांनीं पाहिले, म्हणजे आमच्या मालीला हो काय प्रॉस्पेक्ट्स् राहणार ? "

" पण ओंकारसाहेब, या गरिबांच्या मुली आहेत ! "

" ते कोण पाहतंय् अलीकडे ! हल्लीं मुख्य प्रश्न फीचर्सचा ! "

" ख्खाय् ! कोण काय करील याचा नेमच नाहीं आतांशा !"

" खुशाल कांहीं म्हणा ! मुलीचा बाप होऊन पाहिल्याशिवाय हें कळायचं नाहीं ! "

पुढें आम्हीं वादांत आणि पोलिसांत शिरलों नाहीं. पेटनचा फोटोही पेटनला मिळाला. तो खूष झाला आणि " शाबास रामराव ! " म्हणून त्यानें माझी पाठ थोपटली ! खरें म्हटलें म्हणजे, मला स्वतःला माझ्या रामरावगिरीचा मागमूसही लागेना !

घरीं गेल्यावर पहिल्यानें जिवाला हाक मारून सांगितलें, " गुन्हेगार सांपडला ! "

" कोण, साहेब लाडच ना ? "

त्याला एकदम थक्क करण्याच्या इरायानें मीं म्हणालों.

" छे रे, ओंकार वकील अन् दुसरं कोण ? " पण त्याच्या चेहऱ्यावर एक सुरकुतीही पडली नाहीं !

" ए: जिवा, तुला आश्चर्य नाहीं वाटत ? "

" विशेष नाहीं, साहेब; पण माझा फोटो..."

" हं, हा घे ! अगदीं ठोकळा आहेस, जिवा ! " यावर तो कांहीं बोलला नाहीं. घरांतून एक फ्रेम आणि कांच घेऊन आला आणि तो फोटो मुकाट्यानें त्याच्यांत बसवूं लागला.

" हें काय चालवलं आहेस, जिवा ? "

" तसबीर करतों त्याची पुन्हा रामभाऊंकडे नेऊन द्यायला ! "

" म्हणजे ? रामभाऊंचा काय संबंध ? "

" त्यांचीच आहे ही तसबीर ? "

" तुझी आतेबहिण ना, जिवा ही ? "

" छे साहेब ! " निशेच्या " खास अंकांतला रजनीचा फोटो आहे हा, साहेब ! "

आतां मात्र मीच हतबुद्ध झालों. बराच वेळ डोकें खाजविल्यावर एकंदर प्रकार माझ्या ध्यानांत आला. मीं विचारलें,

" एकंदरींत तूं प्लॉट रचला होतास म्हणायचा जिवा ? "

" जाळं टाकून पाहिलं, साहेब ! "

" आणि ओंकार मासा नेमका त्याच्यांत सांपडला, अगदीं मुद्देमालासकट सांपडला ! "

" मासा मला माहित होता, साहेब ! "

" काय म्हणतोस ? "

" गुन्ह्याचा हेतु लक्षांत घेतां मला दुसऱ्या कोणाचा वहीम येईना, साहेब !"

" म्हणजे, तूं मानसशास्त्रदृष्ट्या काम केलंस, जिवा ! तूं पॉल टॉफ्ट नाहीं तर व्हिडॉक झालास म्हणायचा ! डिटेक्टिवांचा हा एक पिवळ्या लेबलच्या लिप्टन-सारखा उच्च प्रकार आहे !

" कसचा, साहेब ? मी आपला भालेराव ! "

" छट्, जिवा ! तूंच रामराव; ठोकळा खरा, पण अष्टपैलु ! "

" आपली मर्जी साहेब ! "

" देखो, जिवा ! आज तुमारे वास्ते हम टी बनाएंगे ! चलो, तैयारी करो ! "



# प्रो. वि. मा. दी. पटवर्धन
## यांचीं प्रकाशित पुस्तकें

## १ साहित्यगुदाम

**उपहासगर्भ निबंधांचा संग्रह**

जुन्या व नव्या प्रथितयश लेखकांनी याची प्रशंसा केली **केसरी मात्र तुटून पडला !** सरकारी शाळांच्या व शिक्षकांच्या लायब्ररयांकरितां विद्याखात्यानें मंजूर केलें.

## २ रत्ना

**नितांतरमणीय कादंबरी**

सौ. यमुनाबाई हिर्लेकर यांची सुंदर प्रस्तावना आणि सौ. लीलावती चौधरी यांचा प्रेमळ पुरस्कार.

## ३ त्रिकोण

**आजकालची एक हृदयस्पर्शी गोष्ट**

रा. गोपीनाथ व सौ. तळवलकर यांची जोड व गोड प्रस्तावना

**संस्कृतिसंरक्षक मंडळाच्या कचाट्यांत अजून न सापडलेलें पुस्तक**



वरीलपैकीं कोणतेही पुस्तक हवें असल्यास लेखकाकडे चौकशी करावी.